# १ प्रस्ताव

संसारांतलें शारदाबाईचें आयुष्य सुखाचें झालें नव्हतें. चौदाव्या वर्षी तिचें लग्न झालें. अठराव्या वर्षीच तिला पहिलें अपत्य झालें. पहिली मुलगी झाली म्हणून घरच्या माणसांपासून शेजाऱ्यापर्यंत सर्वांनीं तिला शिव्याशाप दिले. मुलगा होणें किंवा मुलगी होणें हें कांहीं कुणाच्या हातचें नसतें, असें कळत होतें तरीही सर्वांनीं तिचा छळ मांडला. तिच्या छळाला सुरवात झाली ती ही अशी आईची पदवी मिळाल्यापासूनच. इतक्या लवकर आपल्याला ' आई ' व्हावें लागलें याचें तिला दुःख वाटे. त्या काळांत तिच्या वयाच्या इतर बायकांनाही मुलें झालीं होतीं. मुलें झाल्याबद्दल त्या बायकांना अभिमान वाटत होता. मुलें झाल्याबद्दल—विशेषतः ज्यांना मुलगे झाले होते, त्यांचें कोडकौतुक होत होतें हें ती प्रत्यक्ष पहात होती. तरीही तिला या अ[illegible]णाचा अभिमान वाटत नव्हता. मुलगी झाल्यामुळें तिचें कोडकौतुक होत नव्हतें; म्हणून तिला अभिमान वाटत नव्हता असें मात्र नव्हे. या वयांत तिला मातृपद नको होतें.

मातृपदाचा तिला तिटकारा नव्हता. चार [illegible] अशी आयुष्यांतील तिची अपेक्षाही होती. पण इतक्या लवकर आई होण्याचें संकट ओढवल्यामुळें तिचें मन खचून गेलें होतें.

तिच्या आणि तिच्या नवऱ्याच्या वयांत सारें चार वर्षांचें अंतर होतें. बावीस वर्षांचा तिचा नवरा बी. ए. होऊन लॉ कॉलेजांत जाऊं लागला होता. ती गांवीं असे, तो मुंबईला असे. सुट्टीच्या दिवसांत तेवढा तो घरीं येई. तोच काय तो त्याचा सहवास. त्या अपुऱ्या सहवासामुळें आपली उपेक्षा होते आहे असें तिला वाटे. त्या अपुऱ्या सहवासापायीं नवराबायकोचे जिव्हाळ्याचे संबंध ज्या प्रकारें पक्के व्हावे तसे होत नाहींत असें तिला वाटे.

लग्न झालें तें लहानपणींच. लग्न झाल्यानंतर सुमारें दोन वर्षांनीं तिचा नव-ऱ्याशीं प्रत्यक्ष परिचय झाला तोही असा धांवताच. त्यावेळीं तो मुंबईला कॉलेजांत असे. असाच मधून मधून सुट्टी पडे तेव्हां घरीं येई. बारा महिने घरीं नसणारा हा सणासुदीचा पाहुणा केव्हांतरी घरीं येतो आणि त्याचा आपल्याला सहवास घडतो—अत्यंत निकट सहवास घडतो—त्या सहवासाची आत्यंतिकता वाढते न वाढते तोंच तो निघून जातो, हें पाहून तिचा जीव कासावीस होई. हें कांहीं जिव्हाळ्याचें नातें नव्हे असें तला वाटे. नवरा आणि बायको यांचे संबंध याहून जास्त निकटतेचे असावे अशी तिची अपेक्षा असे. पण ती अपेक्षा पुरी होत नव्हती.

आणि आतां हें मूल झालें. मूल झालें तें झालें पण त्याचें कोडकौतुक कोण करीना—तिच्या नवऱ्याला सुद्धां मुलगी झाल्याचें आवडलें नाहीं—हें पाहून ती दिवसेंदिवस उदास होऊं लागली.

तिचा नवरा एल्‌एल्‌ बी. झाला आणि मुंबईच्या एका प्रख्यात वकिलाच्या हाताखालीं धंद्याचे धडे घेऊं लागला. तो चांगला मिळवता झाल्याखेरीज तिला नवऱ्याकडे पाठवण्याची तिच्या सासरच्या मंडळीची तयारी नव्हती.

तिचें औदासीन्य वाढूं लागलें. नवरा घरीं आला त्यावेळीं काकुळतीला येऊन तिनें त्याची विनवणी केली. पण तिला घेऊन जाणें त्याच्या हातचें नव्हतें. वडिलांकडून मिळणाऱ्या पैशावरच अजून त्याचा चरितार्थ सुरू होता.

आणखीं एक दोन वर्षें गेलीं. पूर्वीप्रमाणेंच सुट्टींतला पाहुणा घरीं येत होता. तो निघून गेला कीं ती त्याला विसरून जात होती. तो परत आला कीं त्याची ओळख पुनः पटवून घ्यायला तिला जे दिवस जात तोंच तो परत निघून जाई.

अजून आपल्या नवऱ्याची ओळख पटत नसल्यामुळें तिचा जीव कावून जात होता. तिचा स्वभाव चिडखोर होऊं लागला होता. स्वभावांतल्या या दोषांमुळें ती सासरच्या माणसांची नावडती होऊं लागली होती. कुणीच तिच्या-बद्दल सहानुभूति बाळगीत नव्हतें. तिलाही कुणाबद्दल सहानुभूति वाटत नव्हती.

सासरचा छळ वाढत होता तसतशी ती नवऱ्याबरोबर जायला जास्त जास्त आतुर होत होती. आतां तिच्या नवऱ्यानें धंद्याचें बस्तान बरेंच चांगलें बसवलें होतें. स्वतंत्र बिऱ्हाड करून रहाण्याइतकी त्याला ताकत आली होती तरीही तो तिला घेऊन जात नव्हता. सासरचीं माणसें तिला कंटाळलीं होतीं. तिनें आतां आपल्या नवऱ्याबरोबर जावें असें त्यांनाही वाटत होतें.

पण तो तिला नेत नव्हता—नेण्याची गोष्टच काढीत नव्हतां. तिनें विचारलें तर कांहींतरी कारणें सांगून तो तिला नेण्याचें टाळीत होता.

ही परिस्थिति तिला संशयास्पद वाटली.

सुदैवानें या मुदतींत तिला दुसरें मूल झालें नव्हतें. सासुसासऱ्यांचा छळ, शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या टोंचण्या, नवऱ्याची उपेक्षा आणि स्वतःचें दुर्दैव या सर्वांशीं झगडतांना त्या मुलीबद्दल मात्र तिला अकृत्रिम जिव्हाळा उत्पन्न झाला होता. त्या मुलीच्या सहवासांतच तिला सहवासाचें सौख्य मिळत होतें. नवऱ्याच्या सहवासाची उणीव त्या मुलीच्या सहवासांत ती भरून काढीत होती. इतरांच्या जाचणीचें दुःख त्या मुलीच्या हंसऱ्या चेहऱ्याकडे पाहूनच ती सहन करीत होती. घरचा जाच जसजसा वाढूं लागला, नवऱ्याची उपेक्षा जसजशी जाणवूं लागली, तसतसें त्या मुलीचें आकर्षण तिला जास्त जास्त बांधून टाकूं लागलें. आपलें सर्वस्व त्या मुलीच्या ठायीं गुंतून पडलें आहे असें तिला वाटूं लागलें.

आणि ती मुलगीही मोठी गोड होती. आईखेरीज कुणीच तिचें कौतुक करीत नव्हतें, म्हणून ती मुलगीही आईखेरीज दुसऱ्या कुणालाही ओळखीत नव्हती. त्या मुलीच्या सहवासांत दंग झाल्यामुळें दिवसेंदिवस ती घरकामाकडे दुर्लक्ष करूं लागली. घरचीं माणसें दिवसेंदिवस जास्तजास्त चिडूं लागलीं. तीं चिडताहेत असें पाहून तिलाही चेव येऊं लागला. आणि त्या चेवाच्या भरांत ती साऱ्या सासरच्या माणसांची हेटाळणी करूं लागली.

शेवटीं चिडीला येऊन तिच्या सासऱ्यानें तिला नेऊन तिच्या नवऱ्याकडे पोहोंचवलें. मर्जीविरुद्ध घडलेल्या या गोष्टीमुळें तिचा नवराही तिची हेटा-ळणी करूं लागला. ती येऊन पोंचल्यावर बिऱ्हाड थाटणें त्याला भागच होतें. तिच्या नवऱ्यानें आधींच बिऱ्हाड थाटलें होतें—म्हणजे बिऱ्हाड कर-ण्याजोगी ऐसपैस जागा घेऊन संसारी माणसासारखा तो रहात होता. त्याचा धंदा चांगला चालला होता. यापूर्वींच शारदेला घेऊन जाणें त्याला अशक्य नव्हतें असें असूनही तो आजवर तिला कां घेऊन जात नव्हता, याचें कारण या बिऱ्हाडाचा कबजा घेतल्यावर तिला कळून आलें.

त्यानें आधींच बिऱ्हाड थाटलें होतें, पण तें बिऱ्हाड कुटुंबवत्सल माणसाचें नव्हतें. त्या बिऱ्हाडांतील गृहिणी दिवसा त्या बिऱ्हाडीं नसे, ती रात्रीं तिथें येत असे हें त्या बिऱ्हाडाचा ताबा घेतल्यानंतर थोडयाच दिवसांत शारदेला कळून आलें

पत्नी म्हणून ती तिथें आली होती, पण केवळ स्वैपाकिणींच्या जागेपलिकडे जास्त मोठा अधिकार तिला मिळवतां आला नाहीं. पत्नीचा अधिकार बळकावून कुणी दुसरीच बाई इतके दिवस तिच्या नवऱ्याची गृहिणी होऊन राहिली होती.

अधिकाराच्या जोरावर नवरा तिला स्वैंपाकीण म्हणून वागवीत होता. तक्रार करायला तिला जिव्हाळ्याचें कोणतेंच स्थान नव्हतें. सुट्टीच्या दिवसांत तरी तिला नवऱ्याच्या सहवासाचा जो लाभ सासरीं असतांना मिळत असे, त्यालासुद्धां आतां ती आंचवली होती.

या परिस्थितींतून कोणत्या प्रकारें वाट काढावी याची तिला कल्पना करतां येईना. नवऱ्याच्या त्या अनधिकारी पत्नीचा परिचय करून घेण्याचा तिनें प्रयत्न केला. त्या प्रयत्नांत तिला अनपेक्षित यश आलें.

देहविक्रय करणाऱ्या वारांगनेच्या कुलांत जन्म घेतला असूनही ती एक अंतःकरणाची सहृदय बाई होती. शारदेच्या परिस्थितीची योग्य जाणीव झाल्यामुळें तिनें यांतून मार्ग काढायचा प्रयत्न केला.

तो प्रयत्न यशस्वी झाला नाहीं.

नशिबाला दोष देत शारदा मुलीच्या तोंडाकडे पहात कसेबसे दिवस कंठीत होती. शारदेचा नवरा गणपतराव त्या मुलीकडे ढुंकूनसुद्धां पहात नव्हता याचेंच तिला मोठें वैषम्य वाटत होतें.

तिला आश्चर्य वाटे तें हेंच, कीं चंपेला—गणपतरावांच्या त्या रखेलीला—मुलीचा एवढा लळा कां ? तो लळा खरा होता कीं ढोंग होतें याचा पडताळा ती पहात होती.

खरोखरच चंपेला त्या मुलीनें अगदीं वेड लावलें होतें. यापूर्वी ठराविक वेळीं ती त्या घरीं येत असे पण आतां त्या मुलीसाठीं तिचा साराच वेळ या घरीं जाऊं लागला. साराच वेळ या घरांत रहाण्यासाठीं ती हें ढोंग तर करीत नाहीं असें शारदेला केव्हां केव्हां वाटे—पण तसा आरोप करायला कांहींच कारण नव्हतें. गणपतराव घरीं नसतांना घरीं येऊन रहाण्यांत चंपेला कोणताच फायदा नव्हता.

चंपा त्या मुलीसाठीं नुसता जीव टाकीत असे. पदरच्या खर्चानें ती तिच्यासाठीं खेळणीं, कपडेलत्ते करी. तिचें न्हाणेंधुणें करी. तिला घेऊन फिरवून आणी. कोणत्या जिव्हाळ्याच्या ओढीनें चंपा त्या मुलीसाठीं एवढी वेडी झाली होती याचें निदान शारदेला होत नसे.

चंपेला मुल नव्हतें. मुलाची तिला आवड होती. मुलगी म्हणून त्या कोंवळ्या लेकराची हेटाळणी करायला ती कुलीनकन्या नव्हती. मेल्यानंतर तिलांजली देण्यासाठीं मुलगा पाहिजे अशी जाणीव व्हायला तिला कांहींच कारण नव्हतें. उलट त्यांच्या जमातींत मुलींचींच कौतुकें केलीं जात होतीं—मुलगा तिथें आवडीचा विषयच नव्हता—त्यामुळें असो किंवा खरोखरच त्या गोड पोरीचा लळा लागल्यामुळें असो, चंपेनें त्या मुलीचा पुरा कबजा घेऊन टाकला होता.

नवरा आधींच हातचा गेला होता; आतां मुलगीही हातची जाते कीं काय—जिच्या हातीं नवरा गेला तिच्याच हातीं मुलगीही जाते कीं काय, या भीतीनें शारदा घाबरून गेली.

पण त्या मुलीनें मात्र आपल्या जन्मदात्या आईचा जिव्हाळा तोडला नव्हता. चंपा तिचें इतकें कोडकौतुक करी तरीही ती आपल्या आईला विसरत नव्हती. आई हेंच त्या पोरीचें विश्रांतीस्थान होतें.

एकाच व्यसनाच्या पकडींत सांपडून तिचा नवरा थांबला नव्हता. तत्कालीन सुशिक्षितांत प्रचलित झालेल्या दारूनेंही दिवसेंदिवस त्याच्यावर चंपेपेक्षांही जास्त पकड धरायला सुरवात केली होती.

आतां चंपेकडेही त्याचें दुर्लक्ष होऊं लागलें. चंपा ही एक कुलीन वेश्या होती. ज्याच्याशीं एकदां संबंध आला त्याला टाकून दुसरें घर करण्याची तिच्या घराण्यांत चाल नव्हती, म्हणूनच ती दुःखी झाली होती—शारदेशीं समदुःखी झाली होती.

या दुःखाच्या जाणीवेनें त्या दोघी एकमेकींशीं आणखी जवळ येऊं लागल्या. हृदय उघडें करून एकमेकींशीं बोलतांना दोघींचेंही दुःख हलकें होऊं लागलें. समदुःखाच्या जाणीवेनें सहानुभूति उत्पन्न होऊं लागली आणि त्या सहानुभूतिचें रूपांतर हृदयींच्या जिव्हाळ्यांत होऊं लागलें.

शेजारीपाजारी, ओळखीदेखीचे या प्रकरणीं शारदेला नांवें ठेवीत होते पण तिला त्याची पर्वा वाटत नव्हती. असहाय असलेल्या तिच्या जिवाला मिळालेला हा एकुलता एक आधार तोडून टाकायची तिची तयारी नव्हती. गणपतरावाच्या आश्रयाचीही आतां चंपेला पर्वा वाटत नव्हती—किंबहुना गणपतरावाच्या पगारी आश्रयापेक्षां शारदेचा लोभ आणि मुलीचा ओढा तिला जास्त मोलाचा वाटूं लागला होता.

दारुड्या गणपतरावाला या परिस्थितीची जाणीव नव्हती. भरपूर मिळत असलेल्या पैशाच्या कैफाबरोबर दारूचा कैफदेखील त्याची माणुसकी नाहींशी करून टाकीत होता. आतां दोघींचाही छळ करायला त्यानें सुरवात केली होती.

त्या छळामुळेंच त्या दोघीही अधिकाधिक जवळ येऊं लागल्या, हें सुद्धां गणपतरावाला कळून येत नव्हतें. त्याचें जग निराळें होतें. कुटुंबांत त्याचें मन रमत नव्हतें. त्याचा सारा फुरसतीचा वेळ चैनी श्रीमंतांच्या एका क्लबांत जात होता. पशुवृत्तीच्या चरितार्थापुरता तो आपल्या घरीं येई खरा पण तिथेंही शारदा ही आपली पत्नी आहे याची त्याला अजूनही आठवण नव्हती. या अन्यायाची जाणीव देण्याचें धाडस चंपा जरी पुनः पुनः करीत होती तरी त्याचा कांहीं उपयोग होत नव्हता. आपल्याला एक मुलगी आहे याची त्याला आठवणसुद्धां नव्हती. अपत्यप्रेमाची मानवी भावना त्याच्या हृदयांत मुळीं जागीच झाली नव्हती. पैसे मिळवण्याच्या हव्यासामुळें तो साऱ्या कौटुंबिक वृत्ति हारवून बसला होता.

एकमेकींच्या गळ्यांत गळा घालून दोघीही दुःखाच्या खाईत सुखाचा क्षण शोधीत होत्या. तो सुखाच्या क्षण देण्यासाठीं शारदेची छोटी मुलगी तारिणी अजाणपणें जागी राहिली होती. त्या अर्भकाच्या जागृतीकडे पाहून त्या दोघींच्या डोळ्यांपुढें येणाऱ्या काळोखीचा निरास होत होता.

शारदा ज्यावेळीं पहिल्यानें मुंबईला आली—सासरीं वाटत असलेल्या उणीवेची भरपाई करण्यासाठीं आली—त्यावेळीं अपेक्षित सुखाच्या लालचेनें तिचें अंतःकरण आसावलें होतें. आपली जागा बळकावून दुसरीच कुणी बसली आहे असें पाहून तिला धक्का बसला होता. आतां त्या दुसरीची गत आपल्या-सारखीच झाली आहे—गणपतरावांमुळेंच झाली आहे—असें दिसून येतांच तिला त्या आपल्या नवऱ्याबद्दल वाटणाऱ्या नात्याच्या धाग्यादोऱ्याची गांठ तुटून गेली असें कळून चुकलें. या माणसांत माणुसकीचा अभाव आहे अशी तिची पक्की खात्री झाली. ती आपल्या आसपास पाहूं लागली. आजुबाजूचीं कुटुंबेंही सुखी नसावींत असें तिला वाटूं लागलें. सर्वांच्याच घरांत जरी कुठल्या चंपा शिरल्या नव्हत्या तरी जिव्हाळ्याच्या बाबतींत बहुतेकांच्या ठायीं अभावच होता असें तिला दिसून आलें. लग्न झालें आहे म्हणून बायकोला बायको म्हणायची, नवराबायकोचीं सामाजिक नातीं पाळायचीं, या पलीकडे कुणाच्याच जिव्हाळ्याची मजल जात नसल्याचें तिला दिसून येऊं लागलें.

शारदा फारशी सुशिक्षित नव्हती. तिला बेतापुरतें लिहितां वाचतां येत होतें. चंपा चांगली शिकलेली होती. तिच्या सहवासानें आणि मदतीनें तिनें आपला व्यासंग वाढवला. तिला कांहीं कल्पना सुचूं लागल्या. त्या कल्पनांची अस्पष्ट स्वरूपें तिच्या अंतर्दृष्टीपुढें खेळूं लागलीं. त्या खेळत्या मुर्तींत तिला नव्या भावना दिसूं लागल्या. त्या नव्या भावनांच्या जाणीवेनें तिची स्फूर्ति जागी झाली आणि—

ती लिहूं लागली. त्या लिहिण्याला संगती नव्हती. खवळलेल्या मनाचे ते चिरडीचे उद्गार होते. त्या उद्गारांना जन्म देतांना तिला एक निस्सीम आनंद होत होता. त्या आनंदाच्या भरांत लेखणीच्या टोंकाला जें येईल तें ती लिहूं लागली होती.

मराठी वाङ्मयापलीकडे तिनें कसलेंच वाङ्मय वाचलें नव्हतें. मराठी ग्रंथांचें तिचें वाचन मात्र—चंपेच्या कृपेनें—बेफामपणांत सुरू होतें. त्या वाचनानें लिहिलेल्या शब्दाबद्दलचा जिव्हाळा तिच्या मनांत उत्पन्न झाला होता. त्या लिहिल्या शब्दाची ओढ तिला लिहायला भाग पाडीत होती म्हणूनच ती लिहीत होती. त्या तिच्या लिहिण्यांत कुठल्याही लेखकाच्या लेखनसरणीचें किंवा विचारसरणीचें यत्किंचितही अनुकरण नव्हतें.

रात्रींच्या एकांतांत वेडयासारखी ती लिहीत बसे. तावावर ताव लिहून काढी. लिहीलेलें पुनः वाचून पहावें असें केव्हां तिच्या ध्यानींमनीं सुद्धां येत नसे. आपण काय लिहिलें आहे याची तिला जाणीव नव्हती. अफाट जंगलांत मळलेल्या पायवाटेच्या अभावीं चुकलेला वाटसरू जसा काटेकुटे तुडवीत साऱ्या जाणीवा विसरून बेहोष होऊन भटकत फिरतो, तशाच वृत्तीनें तिचें हें लेखन सुरू होतें.

एके दिवशीं हें तिचें लेखन सहज चंपेच्या नजरेला आलें. सहज ती वाचूं लागली. वाचतां वाचतां ती थक्क होऊन गेली.

चंपेला इंग्रजी वाङ्मयाचा परिचय होता. वाचनाची आवड असल्यामुळें तिनें चांगल्या चांगल्या ग्रंथकारांचे नाणावलेले ग्रंथ वाचून काढले होते. डी—क्न्सीच्या ' अफिण्याची कैफियत ' या पुस्तकासारखेंच हें शारदेचें लिखाण असल्याचा तिला भास झाला.

शारदेच्या नकळत एके दिवशीं तिनें त्यांतील कांहीं लेख नकलून एका प्रख्यात मासिकाच्या संपादकाकडे पाठवले. त्या लेखावर तिनें नुसतें ' लेखिका शारदा ' एवढेंच नांव घातलें होतें.

संपादकांकडून जें पत्र आलें तें वाचून ती आश्चर्यचकित झाली. त्या संपादकानें त्या लेखांची तोंड फाटेपर्यंत स्तुति करून आणखी लेख पाठवण्याविषयीं विनंती केली होती.

ते लेख छापून आल्यावर त्या मासिकाचा तो अंक चंपेनें शारदेला दाखवला.

शारदा थक्क झाली. छापलेल्या अक्षरांत आपण वाचीत असलेलें तें लिखाण आपलेंच आहे हें तिला खरेंच वाटेना.

तें पडलेलें लिखाण घेऊन मग ती वाचूं लागली. वाचतांना तिचें तिलाच आश्चर्य वाटूं लागलें. अजाणपणें तें लेखन तिच्या हातून झालें होतें. जाणतेपणाच्या जागृतीनें तें लिखाण वाचतांना तिला आपल्या अस्मितेची जागृति आली.

त्याच जागृतीनें आतां ती लेखन करूं लागली.

लेखावर लेख क्रमशः प्रसिद्ध होत होते. ते सारे लेख संकलित करून संपादकांनीं एक ग्रंथ प्रसिद्ध केला.

तो ग्रंथ पहातांच शारदेला आत्मविश्वास उत्पन्न झाला. आजपर्यंत आपण वाचीत असलेल्या लिखाणापेक्षां हें लिखाण अगदीं निराळ्या स्वरूपाचें आहे असें दिसून येतांच तिचें तिलाच आश्चर्य वाटलें.

आणि टीकाकारही तसेंच म्हणूं लागले होते. मराठी वाङ्मयाच्या क्षितिजावर एक नवीन तारका उदय पावल्याची ग्वाही देत होते.

तिलाही तें पटलें. चंपा तर वेडीच झाली होती. शारदेच्या औरस अपत्याप्रमाणेंच तिच्या या वाङ्मयअपत्यांवरही तिचें प्रेम खिळून गेलें.

अशींच कांहीं वर्षें गेलीं. त्या घरचा संसार तसाच चालला होता. रोज दारू पिऊन गणपतराव तसेच घरीं येत होते आणि दोघींनाही तसेच मारहाण करीत होते. दोघींचाही त्यांच्याबद्दलचा तिटकारा दिवसेंदिवस तसाच वाढत होता आणि त्याबरोबरच शारदाबाईंचा लेखनाचा पसाराही वाढत होता.

संपादकांनीं खबरदारी घेतल्यामुळें शारदाबाईंचें नांव कुठेंच प्रसिद्ध झालें नव्हतें. त्या अज्ञात नांवाच्या जोरावरच त्या लिखाणाची साऱ्या साहित्यक्षेत्रांत तारीफ सुरू होती. त्या अज्ञात नांवाच्या जोरावरच चोहींकडून होत असलेल्या तारीफेचें वैभव पचवीत शारदाबाई आपला लेखनसंसार वाढवीत होती.

गणपतरावांना मात्र या प्रकाराची कांहींच दाद नव्हती. साहित्याचें त्यांना वावडें होतें. साहित्यक्षेत्रांत चाललेली कोणत्याही प्रकारची निंदास्तुति त्यांच्या

कानापर्यंत येऊन केव्हांच पोंचत नसे म्हणूनच निर्वेधपणें लेखनकार्य करणें शारदाबाईला शक्य झालें होतें.

शेवटीं एकदांचें शारदाबाईचें नष्टचर्य संपलें. एके दिवशीं अर्धांगवायूचा झटका येऊन गणपतरावांचें अवतारकृत्य आटोपलें. खोटे दुःखाश्रु गाळीत बसण्याइतका दांभिकपणा शारदाबाईच्या अंगी नव्हता—तरीही चंपेला आलेल्या दुःखाच्या उमाळयानें तिच्याही डोळयांतून एकादें टिप गळल्यावांचून राहिलें नाहीं. पत्नीला होणाऱ्या वास्तविक दुःखाची जागा चंपेच्या दुःखानें घेतली होती. गणपतरावाच्या पत्नीची जागा चालवीत होती ती तीच. शारदाबाईला गणपतरावाचा जो सहवास घडला होता तो तिच्या दृष्टीनें तिला इतका पुरातन-कालीन वाटत होता—स्वप्नांतल्या आठवणींसारखा वाटत होता—कीं त्या सहवासाच्या संपर्कानें दुःखाची जाणीव होण्याइतकी ज्वाळा तिच्या हृदयांतून बाहेर निघणें अशक्य होतें. शारदाबाईनीं दुःखाचें कोणतेंच प्रदर्शन केलें नाहीं याचें चंपेला आश्चर्य वाटलें नाहीं.

मृत्युपत्र करून ठेवण्याइतकें गणपतरावांचें वय झालें नव्हतें. त्यांनीं पैसा भरपूर मिळवला होता आणि यथास्थित उधळमाधळ करूनही भरपूर पैसा संग्रहीं ठेवला होता. त्या सर्व पैशाची शारदाबाई ही एकटीच मालकीण झाली होती. सासरच्या माणसांपैकीं कुणीच शिल्लक राहिलें नसल्यामुळें हा सारा पैसा तिला मिळाला होता.

चंपेला आतां नवा संसार थाटतां आला असता असें शारदाबाईला वाटलें पण तसें कांहीं झालें नाहीं. तारिणीला—शारदाबाईच्या मुलीला—सोडून जाणें तिला अशक्य होतें. तारिणीचा हा लोभाचा दुवा मधें नसता तरीही जातीधर्मा-प्रमाणें ती दुसऱ्या संसारांत पडली नसती. तिच्या जातींतील ज्या कांहीं घरंदाज बायका होत्या त्यांच्या अनुकरणानें तीही शारदाबाईबरोबर राहून शारदाबाई-प्रमाणेंच कुंकु पुसून वैधव्याच्या दशेंत आयुष्य घालवायला तयार झाली होती.

दोघींचें आतां एकच ध्येय होतें—तारिणीला समर्थ करणें. त्या एकाच ध्येयावर लक्ष ठेवून नव्या ईर्षेनें नव्या आयुष्याच्या नव्या पाउलवाटेवर आतां त्या दोघीही पुढें जाण्यासाठीं उभ्या राहिल्या होत्या.

पूर्वीची परिस्थिती आतां उलटली होती. पूर्वी शारदा निराश्रित होती. आश्रिताची पदवी चंपेकडे होती—किंबहुना चंपेच्या कृपेमुळेंच शारदा अजूनपर्यंत घरच्याघरीं राहायला समर्थ झाली होती.

आतां ती परिस्थिती बदलली होती. पण तो बदल दोघींनाही जाणवत नव्हता. सुखदुःखाच्या सहानुभूतिनें दोघीही एकजीव झाल्या होत्या. दुजा-भावाचा मागमूससुद्धां कुठें शिल्लक राहिला नव्हता.

तारिणीचें शिक्षण दोघींच्या नजरेखालीं सुरू झालें होतें.

दिवसेंदिवस तारिणी सज्ञान होऊं लागली होती. स्वतःच्या परिस्थितीची जाणीव बऱ्याच अल्पवयांत जागृत झाल्यामुळें बालवयांतच तिला प्रौढत्व येऊं लागलें होतें.

पूर्वपरिस्थितीच्या अनुषंगानें तिच्या बरोबरीच्या मुली तिची जी हेटाळणी करीत तीमुळें ती एकप्रकारें एकलकोंडी बनली होती. दोन्ही आयांवर सकृद्दर्शनीं जरी तिचें सारखेंच प्रेम असल्याचें दिसून येई, तरीही औरस आईबद्दलचा तिचा ओढा मात्र विलक्षण होता. पण ही आपली मनाची ओढ त्या दोघींच्या—विशेषतः चंपेच्या—लक्षांत येऊं नये म्हणून स्वाभाविकरीत्या त्या दोघींशींही आपण सारख्याच वृत्तीनें वागत असल्याचा बेमालूम बहाणा करीत करीत, बालपणाची मर्यादा ओलांडून तारिणी आतां कॉलेजच्या आवारांत एक तरूणी म्हणून वावरूं लागली होती.

---

# २ नवी नोरा

---

" हा कॉलेजच्या अब्रूचा प्रश्न आहे. " मधुकर म्हणाला, " यावेळीं तुम्हीं जर माघार घेतली तर ती नामुष्की होईल. "

" तें मला कळतं, " तारिणी म्हणाली, " पण असल्या कोणत्याही कार्य-क्रमांत भाग घ्यायचा नाहीं हा माझा निश्चय आहे. कॉलेजांत इतक्या मुली आहेत, माझ्यामुळेंच अडेल असं मला मुळींच वाटत नाहीं. "

इब्सेनच्या 'डॉल्स हाऊस' या नाटकाचा प्रयोग करण्याचें ठरलें होतें. मराठी विद्यार्थ्यांनीं आपल्या वाङ्मयमंडळाच्या वार्षिक सम्मेलनाच्या वेळीं इंग्रजी नाटक करण्याची केलेली ही योजना पुष्कळांनाच आवडली नव्हती. मूळ ही कल्पना कुणी कशी काढली याचा पत्ता जरी लागत नव्हता तरीही कॉलेजच्या प्रिन्सिपलसाहेबांना ही योजना पसंत पडली होती. मराठीच्या प्रोफेसरांचाही

विरोध नव्हता. प्रिन्सीपलसाहेबांच्या इच्छेविरुद्ध जाऊन झगडायची मराठीच्या प्रोफेसरांची तयारी नव्हती.

ज्या विद्यार्थ्यांना ही योजना पसंत नव्हती त्या विद्यार्थ्यांत तारिणी प्रमुख होती. कॉलेजच्या आवारांत वारंवार सभा घेऊन तिनें मराठी भाषेवरील या आक्रमणाच्या मोठ्या जोराच्या भाषेनें निषेध केला होता.

तिला वाटलें, म्हणूनच कुणी तरी क्लृप्ति काढून हा डाव टाकला असावा. ती म्हणाली, " वाटेल तर हें नाटक मराठी भाषेंत करा—मी मोठ्या हौसेनं त्यांत भाग घेईन. पण मराठी वाङ्मयमंडळाच्या सम्मेलनासाठीं इंग्रजी नाटक करून मराठी भाषेचा उपमर्द झालेला मीं मुळींच सहन करणार नाहीं—अन् त्यांत भाग तर घेणार नाहींच नाहीं. "

खुद्द प्रिन्सिपलसाहेबांनीं या कामीं तिला गळ घातली त्यावेळीं ती म्हणाली, " इंग्रजीच नाटक करायचं तर मग आहेत कीं कितीतरी खिश्चन मुली आपल्या कॉलेजांत ! नोराची भूमिका करायची त्यांतल्या पुष्कळांना हौस आहे—त्यांनाच करूं द्या कीं तें काम. इंग्रजी नाटक करायचं, भाषा इंग्रजी आणि पोषाख महाराष्ट्रीय—तें कांहीं बरं दिसायचं नाहीं. पुरुषांचे पोषाख मुळीं इंग्रजी आहेतच. बायकांना पोषाख बदलायला लावण्यापेक्षां, ख्रिश्चन मुलीनं हें काम केलेलं बरं, असं नाहीं का आपल्याला वाटत ? "

तिचा युक्तिवाद बरोबर होता. प्रिन्सिपलसाहेबांना तो पटत होता. पण ते हट्टाला पेटले होते. आपण एकादी सूचना करावी आणि विद्यार्थ्यांनीं ती फेटाळून लावावी, हें त्यांना पटत नव्हतें. अधिकाराचा तो अपमान होता असें त्यांना वाटत होतें.

आणि मराठी भाषेचा तो अपमान होतो आहे असें तारिणीला वाटत होतें. मराठीच्या प्रोफेसरचा पाठिंबा नव्हता तरीही तारिणी हट्ट धरून बसली होती. आपल्या मताच्या विद्यार्थ्यांना गोळा करून तिनें तेंच नाटक मराठी भाषेंत करायचें ठरवलें.

नाटकाचें भाषांतर कुणी करावें हा प्रश्न निघाला. कुणातरी ' प्रथितयश ' लेखकाकडे जाऊन त्याच्याकडून हें रूपांतर करून घ्यावें असें कित्येकांनीं सुचवलें. तारिणीला तें खपलें नाहीं. कुणीतरी विद्यार्थ्यानेंच तें भाषांतर करावें असा तिचा आग्रह होता.

कुणीही विद्यार्थी त्या कामासाठीं पुढें येईना असें पाहून तिनें स्वतःच तें

काम पत्करलें. या नाटकाचें मराठी भाषांतर त्यावेळीं कुणीच केलें नव्हतें. मूळ नाटक नॉर्वेजियन भाषेंतलें—त्याचीं इंग्रजींतील भाषांतरेंही एकापेक्षां जास्त लेखकांनीं केलेलीं—तीं भाषांतरें ताडून पाहतांना तारिणीला त्यांत फरक दिसून येऊं लागला. कुणाचें भाषांतर ग्राह्य धरावें याचा प्रश्न पडला. प्रत्येक भाषांतरांत स्वतःच्या दृष्टीनें जें योग्य दिसेल त्याचीच निवड करून स्वतःच्या आवडीप्रमाणें भाषांतर करायचें, असें तिनें ठरवलें.

मराठीचे प्रोफेसर या कामीं तिला मदत करायला मुळींच तयार नव्हते. तितका त्यांचा अधिकार होता कीं नाहीं हा प्रश्न होता तो वेगळाच. मराठी लेखक या नात्यानें त्या प्रोफेसरनीं अजूनपर्यंत कोणतेंच लेखनकार्य केलें नव्हतें. तारिणीनें त्यांची सल्ला विचारली ती नुसती औपचारिकतेनेंच.

जबरदस्त ईर्ष्येनें तिनें हें काम हातीं घेतलें होतें. रात्रीचा दिवस करून ती मांडी मोडून लिहीत बसली आहे असें पाहून तिच्या आईलाही आश्चर्य वाटलें. कॉलेजांतल्या गोष्टी ती आईजवळ फारशी बोलत नसे. एक प्रख्यात लेखिका या नात्यानें शारदाबाई जरी आतां सर्वत्रांना परिचित झाली होती तरीही कॉलेजच्या वातावरणाची तिला यत्किंचितही कल्पना नव्हती.

आजपर्यंत कोणत्याही प्रकारचें मराठी लिखाण करण्याची संवय तारिणीला नव्हती. अभ्यासापलीकडे उगीच कांहींतरी लिहिण्याचा उनाड प्रयत्न करण्याची तिला आवड नव्हती. आईच्या लेखनाबद्दल तिला मोठा अभिमान होता. तिच्या विशुद्ध मराठीबद्दल सर्वत्र जी तारीफ होत असल्याचें तिच्या कानीं येई, त्याला अनुसरून मराठी भाषेचें तितकेंच बिनडाक वळण काबूंत आल्याखेरीज कोणतेंच लिखाण न करण्याचा तिनें निश्चय केला होता.

संमेलनामुळें उत्पन्न झालेल्या या प्रसंगांतून तो निश्चय ढांसळून पडण्याची परिस्थिति उत्पन्न झाली आणि म्हणूनच ती कांहींतरी मराठी लेखन करते आहे हें पाहून शारदाबाईला आश्चर्य वाटलें.

तारिणीनें प्रत्यक्ष सांगितल्यावांचून त्या लिखाणावर नजर टाकायची तिची इच्छा नव्हती. मुलीच्या शिक्षणाकडे ती कूर्मदृष्टीनें पहात होती. स्वतःची परिस्थिति आठवून तिनें आपल्या मुलीला पूर्ण स्वातंत्र्य दिलें होतें. तें स्वातंत्र्य देतांना ती तिच्या वर्तनाविषयीं उदासीन नव्हती. करड्या नजरेनें वागवण्याची जरूरी न वाटण्याइतकी तारिणी स्वतःच एक नमुनेदार मुलगी होती म्हणूनच आपणहून शारदाबाईनें तिच्या लिखाणावर नजर टाकण्याचें टाळलें

तारिणी सारखी लिहीत बसली होती. सारखी लिहीत होती. प्रत्येक लिहिलेलें वाक्य उच्चारून पाहून तें पुन्हां पुन्हां दुरुस्त करीत होती. त्यामुळें त्या लेखनांत तिला कितीतरी खोडाखोड करावी लागत होती. सकृत्दर्शनी तें काम तिला जितकें सोपें वाटलें होतें त्यापेक्षां प्रत्यक्ष भाषांतर करतांना ती अगदीं मेटाकुटीला आली. आईला तें भाषांतर दाखवावें असें तिला पुनः पुनः वाटे पण तें भाषांतर मुळाशीं ताडून पहाणें तिच्या आईला शक्य नसल्यामुळें, मनांत आलेला विचार तसाच दाबून ठेवून ती आपलें काम चालू ठेवीत होती.

नाटकाचा प्रयोग करायचा म्हटलें तर भाषांतर जितक्या लवकर होईल तितक्या लवकर होणें अत्यंत आवश्यक होतें. बहुसंख्य विद्यार्थ्यांचा या कामीं तिला जरी पाठिंबा होता तरीही तिनें पत्करलेल्या जबाबदारीबद्दल फारच थोड्यांना सहानुभूति वाटत होती. या कामीं तिची फजिती व्हावी अशी इच्छा करणारे विद्यार्थी कांहीं थोडेथोडके नव्हते. बहुधा साऱ्याच विद्यार्थिनी विरोधी होत्या. ज्या एकाच विद्यार्थीनीचा तिला पाठिंबा होता तीही तिच्यासारखीच एक कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या अप्रिय व्यक्तींच्या यादींतील होती. यापूर्वी या शरयूचा आणि तिचा फारसा परिचय नव्हता. तसें पाहिलें तर कोणत्याच विद्यार्थी किंवा विद्यार्थिनीशीं तिनें जिवाभावाचें नातें कधींच जोडलें नव्हतें.

हीं असलीं नातीं जोडलीं जातात तीं तशाच प्रसंगाच्या वेळीं—त्यांतलाच हा एक प्रसंग चालून आला होता. तिनें कुणाची सहानुभूति मागितली नव्हती. आणि स्वयंस्फूर्तीनें पुढें आलेला सहानुभूतीचा हात झिडकारून टाकण्याइतकी तिची वृत्ति अनुदार नव्हती.

शरयूनेंच तिला विचारलें त्यावेळीं ती म्हणाली, " स्वतंत्र लेखन करण्यापेक्षां यथातथ्य भाषांतर करणं अन् तसं भाषांतर करतांना आपल्या भाषेचं स्वरूप निर्मेळ ठेवणं किती कठीण आहे, याचा पहिलाच अनुभव मी घेतेंय. कुणी तरी तें वाचून पहावं—सर्वांसमोर जायच्यापूर्वी आधीं कुणीतरी सहानुभूतिनं वाचून पहावं—असं मला वाटत होतं. आईला दाखवलं असतं तर तिनं माझ्या चुका दुरुस्त केल्या असत्या. पण मूळ नाटक कांहीं तिला वाचतां यायचं नाहीं. मुळाशीं ताडून पहाणं शक्य नसलं तरीही मराठी भाषेच्या निर्भेळपणाच्या दृष्टीनं त्याच्यावरून हात फिरवायला एक माझी आईच समर्थ आहे हें मी जाणतें. पण त्यापूर्वी कुणीतरी एकदां तें वाचून पहावं—आईला सुद्धां त्यांत खोड काढतां येऊं नये इतकं निर्भेळ होण्यासाठीं वाचून

पहावं—असं मला वाटत होतं. तूं आपण होऊनच हें काम पत्करलंस याचं मला मोठं कौतुक वाटलं. याच दृष्टीनं तें वाचून पहा. इतर कुणाचीही मला पर्वा नाहीं. कचित् भाषांतरांत दोष राहिला तरीही मला त्याची खंत वाटायची नाहीं — मी कांहीं कुणी कसलेली लेखिका नाहीं—पण मराठी भाषेचा त्यांत खून पडला आहे असं माझ्या आईनं म्हणतां कामा नये. या दृष्टीनं माझे दोष दाखवायचे असले तरच हें वाचयाला घे. ”

शरयूला क्षणभर विचार पडला. दुर्दैवानें तिची मातृभाषा कोंकणी होती. तिचें कुळ कुलीन नव्हतें. तिच्या घराण्यांत मराठीपेक्षां गुजराती भाषेचाच प्रभाव जास्त होता. मराठी आईच्या पोटीं जरी तिचा जन्म झाला होता तरी तिचा ‘ जनक ’ एक गुजराती होता. त्याच्याशीं बोलतांना ती गुजरातींत बोले. गुजराती वाङ्मयाचा अभ्यास करायला तिला हेंही एक कारण झालें होतें. मराठीं वाङ्मयमंडळाची जरी ती एक सभासद होती, तरी मराठी भाषा हा तिच्या अभ्यासक्रमांतील विषय नव्हता.

तरीही तिनें तें काम पत्करलें. परिक्षेचे पेपर तपासावे त्या रीतीनें तें भाषांतर ताडून पहाण्यासाठीं कुणाची तरी मदत घेणें अवश्य होतें. मराठी वाङ्मय-मंडळाचा चिटणीस मधुकर हा जरी मराठी भाषेचा एक लेखक म्हणून मिरवीत होता तरीही या प्रसंगीं मराठीच्या अभिमानाला पारखा होऊन, इंग्रजी नाटक करण्याचा अभिमान धरून तो बसलेला असल्यामुळें, त्याची मदत घेणें शरयूला इष्ट वाटलें नाहीं.

आणखी एकच विद्यार्थी होता. तो एक साधासीधा, भित्रा, एकलकोंडा विद्यार्थी म्हणून समजला जात होता. तो सर्वांच्या थट्टेचा विषय होता. पुस्तकांतला किडा म्हणून त्याची साऱ्या कॉलेजांत प्रख्याती होती. कोणत्याही ‘ स्पोर्टस् ’ मधें तो भाग घेत नसल्यामुळें जरी सर्वांच्या तिटकाऱ्याला पात्र झालेला होता तरी शरयूचा आणि त्याचा फार दिवसांपासूनचा स्नेह होता.

त्याचें नांव गोपीनाथ. तो आणि शरयू एकाच इमारतींत दोन वेगवेगळ्या ब्लॉक्समधें रहात असल्यामुळें दोघांचेंही एकमेकांकडे जाणें येणें होतें. गोपीनाथचा बापही एक सज्जन गृहस्थ असल्यामुळें शरयूच्या घराकडे कमीपणाच्या नजरेनें पहाणारा नव्हता. म्हणूनच या दोन विद्यार्थ्यांच्या सलोख्याला कुठूनही विरोध झाला नाहीं.

या सलोख्यापायीं कॉलेजांत सुद्धां त्या दोघांची थट्टा होई. त्या थट्टेची

दोघेंही पर्वा करीत नसत. या स्नेहाचें कदाचित् जास्त निकटच्या नात्यांत रूपांतर होईल अशी त्या उभयतांच्या वडील माणसांना अपेक्षा नव्हती असें नाहीं. दोन्हीं बाजूंनीं कुठेंच विरोध नव्हता. दोघांचे स्वभावधर्म एकमेकांना मिळते होते. मनें पटत होतीं आणि त्याबरोबरच सलोखाही वाढत होता.

तारिणीला माहीत नसलें तरी गोपीनाथ हा शारदाबाईच्या वाङ्मयाचा एक अकृत्रिम भक्त होता. शरयूला तें माहीत होतें म्हणूनच तिनें हें भाषांतर तपासण्याच्या कामीं त्याची मदत घेतली. किंबहुना तें भाषांतर सारें गोपीनाथनेंच तपासून पाहिलें असें म्हणणें जास्त योग्य झालें असतें.

आपल्या म्हणण्याप्रमाणें त्यानें वेगळ्या कागदावर ठिकठिकाणीं सूचना करून ते कागद त्या त्या भागाला टांचले आणि अशा प्रकारें ताडलेलें तें हस्तलिखित ज्यावेळीं तारिणीनें वाचून पाहिलें त्यावेळीं तिलाही त्या सूचना पटल्या. मराठी भाषेच्या निर्भेळपणाची शरयूची एवढी कांटेकोर दृष्टि पाहून ज्यावेळीं तारिणीनें आश्चर्य व्यक्त केलें त्यावेळीं शरयू म्हणाली, " खरं सांगायचं तारिणी, म्हणजे मूळ इंग्रजी वाचण्यापलीकडे मी यांत कांहींच केलेलं नाहीं. तपाशीत होता तो गोपीनाथ. या साऱ्या सूचना त्याच्याच आहेत. "

क्षणभर तारिणीला वाईट वाटलें. शरयूनें त्या दुरुस्त्या सुचवल्या आहेत असें वाटून झालेल्या आनंदावर विरजण पडल्यासारखें तिला वाटलें. गोपीनाथचा आणि तिचा परिचय नव्हता—परिचय करून घेण्याची तिची इच्छाही नव्हती. तसें पाहिलें तर ती कुठल्याच पुरुष विद्यार्थ्याशीं मोकळ्या मनानें बोलायला सुद्धां तयार नसे. शरयूचा आणि गोपीनाथचा असलेला स्नेहसुद्धां तिच्या दृष्टीनें तिला पसंत नव्हता—तरीही या विशिष्ट प्रसंगामुळें एका बैठकींत बसून गोपीनाथशीं विचारविनिमय करायला ती तयार झाली. तो शारदाबाईच्या वाङ्मयाचा एक भक्त आहे असें कळलें तेव्हां तिच्या मनांतील अढीही पुष्कळ प्रमाणांत कमी झाली.

तिघेंही एका जागीं बसलीं.

ही बैठक तारिणीच्या घरींच झाली होती. उभ्या आयुष्यांत पहिल्यानेंच तारिणी एका पुरुष विद्यार्थ्याला घरीं घेऊन आल्याचें पाहून शारदाबाईला आश्चर्य वाटलें. थोडेंसें वाईटही वाटलें. शरयूला ती ओळखीत नव्हती. पण चंपेचें आणि शरयूच्या आईचें दूरचें कांहीं तरी नातें लागत होतें. त्यामुळें चंपेच्या निर्वाळ्यावर नवीन जडलेल्या शरयूच्या या स्नेहाला तिनें विरोध केला नाहीं.

चार पांच दिवस ही बैठक सारखी सुरू होती. शेवटीं एकदाचें पुस्तक तयार झालें.

शारदाबाईंना तें कुणी दाखवावें हा प्रश्न सर्वांपुढें उभा राहिला. दोघींनींही तें काम गोपीनाथवर सोंपवलें.

भाषांतर ताडून पाहण्याचा प्रश्न नव्हता. प्रश्न होता तो नुसत्या लेखनाचा— लेखनांतील मराठी भाषेच्या नाट्यानुकूल मराठी रचनेचा. शारदाबाईच्या करड्या नजरेला तें कितपत पसंत पडेल याची सर्वांनाच शंका असल्यामुळें ज्यावेळीं तिनें तें पसंत असल्याचें सांगितलें त्यावेळीं तिघांचाही आनंद गगनांत मावेना.

या चर्चेपायीं शारदाबाईंना गोपीनाथचा चांगलाच परिचय झाला. आपल्या वाङ्मयाचा भक्त कुणा लेखकाला आवडत नाहीं ?

मराठीच्या प्रोफेसरना नाटक दाखवावें कीं काय याच्याबद्दल बरीच भवति न भवति झाली. वाङ्मयमंडळाच्या कार्यकारी मंडळानें मतें घेऊन नाटक करायचें ज्यावेळीं ठरवलें त्यावेळीं अर्थातच ते प्रोफेसर आपल्या इनामदारीच्या अध्यक्षस्थानीं होते. आपल्यापरीनें विरोध करायचा लंगडा प्रयत्न त्यांनीं केला होता पण बहुमतापुढें तो टिकला नव्हता.

इंग्रजी नाटकाच्या तालमी सुरू होत्या. कुणा एका मराठी विद्यार्थिनीनेंच तें काम शेवटीं पत्करलें होतें. तें तिला झेंपत नव्हतें. तरीही प्रिन्सिपलसाहेब स्वतः बैठक मारून बसून तें नाटक यशस्वी करण्याचा अट्टाहासानें जिवापाड प्रयत्न करीत होते.

इकडे मराठी नाटकाला कुणी योग्य दिग्दर्शक मिळत नव्हता म्हणून तारिणी खचल्यासारखी झाली होती. गोपीनाथनें एक युक्ति काढली. ती युक्ति सर्वांनाच जरी पसंत पडली नाहीं, तरी त्याखेरीज दुसरा कांहीं उपाय कुणाला सुचवतां न आल्यामुळें ही तालीम घेण्यासाठीं शारदाबाईंना बोलवायचें सर्वानुमतें ठरलें.

गोपीनाथनें तो प्रस्ताव केला तेव्हां शारदाबाई म्हणाली, " मी नाटकं पाहिलेलीं असलीं तरी तीं कशीं बसवलीं जानात याची मला कल्पना नाहीं. तें काय जें तुमचें ' तंत्र ' म्हणून म्हणतात तें माझ्या माहितीचं नाहीं. मी ओळखतें ती साधीसुधी मराठी भाषा. ती मराठी भाषा वाचेनं उच्चारण्याच्या कामीं जेवढं कांहीं मला सांगतां येईल तें सांगायचा मी प्रयत्न करीन.

भावनांचं दिग्दर्शन कसं करावं याची मला कल्पना नाहीं. पण माणसानं प्रदर्शित केलेल्या भावना कुठं बरोबर आहेत आणि कुठं चुकल्या आहेत, एवढंच मला सांगतां येईल. त्या दुरुस्त कशा करायच्या तें तुमचं तुम्हीच पहात असाल तर ही जबाबदारी मी पत्करतें."

वाटेल त्या अटी कबूल करण्याची त्या सर्वांची तयारी होती. दिग्दर्शक न मिळाला तरी कुणीतरी जाणक निरीक्षक त्यांना पाहिजे होता. कॉलेजच्या अधिकारी वर्गांतील माणसांत कुणालाच त्यांची सहानुभूति नव्हती. प्रिन्सिपल-साहेबांना विरोध करून जें हें नाटक बसवलें जात होतें त्याला मोडता घालणारे मात्र पुष्कळच होते.

नाटकाची वांटणी झाली त्यांत गोपीनाथच्या वांट्याला डॉक्टरचें काम आलें. त्याच्या स्वभावाला अनुरूप अशीच ती भूमिका होती. बाकीचीं कामें करणारे विद्यार्थीही ठाकठीक होते. मुख्य असलेल्या दोन स्त्रीभूमिका तारिणी आणि शरयू यांनीं पत्करल्या होत्या. शरयूचीं लहान भावंडें नोराचीं मुलें म्हणून आणलीं जाणार होतीं.

एका लेखिकाविद्यार्थिनीची आई दिग्दर्शक आणि ती लेखिकाच स्वतः त्यांत काम करीत असलेली—कॉलेजच्या वातावरणांत हा प्रसंग अपूर्व होता. एकच नाटक इंग्रजी आणि मराठी अशा दोन्ही भाषांत एकाच वेळीं होणार होतें, हाही प्रसंग तितकाच अपूर्व होता.

नाटकाच्या या दोन्ही फडांत चुरशीचा सामना सुरू झाला होता. इंग्रजीचे एक नाणावलेले प्रोफेसर असलेले, इब्सेनच्या नाटकाचे मार्मिक दर्दी म्हणून प्रख्यात असलेले प्रिन्सिपलसाहेब एका फडाचे दिग्दर्शक. तर दुसऱ्या बाजूला इंग्रजी भाषेचा गंधही नसलेली आणि नाटक बसवण्याच्या कामीं यत्किंचितही माहिती नसलेली शारदाबाई दिग्दर्शक, असा हा विजोड सामना होता.

शारदाबाईला तें नाटक आवडलें होतें. तिच्या स्वतःच्या परिस्थितीशीं त्या नाटकांत जरी साम्य नव्हतें, तरी कोसळलेल्या संसाराच्या शिल्पांतील व्यंगें शोधण्याचा तिनें आजवर जो अभ्यास केला होता, त्या अभ्यासाच्या अनु-रोधानें नोराची भूमिका तिला जितकी आकर्षक तितकीच हृद्य वाटली होती.

उभ्या आयुष्यांत तिनें कॉलेजच्या या अपरिचित वातावरणांत प्रवेश करण्याचा केव्हांच प्रयत्न केला नव्हता. आणि आतां ज्या परिस्थितींत हा प्रवेश करणें तिला भाग पडलें ती परिस्थितीही अशा प्रवेशाला फारशी अनुकूल

नव्हती. सक्तीनें अनुकूल झालेल्या व्यक्तींच्या अंतःकरणांतसुद्धां प्रतिकूलतेची ठिणगी कळत नकळत कुठेंतरी तेवत होती.

ती सर्व परिस्थिति नजरेआड करून हें नाटक यशस्वी करण्याचा चंग बांधण्याची जबाबदारी शारदाबाईवर येऊन पडली होती.

प्रतिकूल परिस्थितीशीं झगडण्यांत तिनें आपलें आयुष्य वेंचलें होतें. प्रतिकूल परिस्थिति असल्याशिवाय कोणतेंही कार्य तिच्या हातून ईर्ष्येनें होत नसे. म्हणूनच या प्रतिकूल परिस्थितीमुळें तिची ईर्ष्या जागी झाली आणि देहभान विसरून ती या नाटकाच्या निदर्शनाला प्रवृत्त झाली.

दोहींकडच्या तालमी कड्याकुलपें लावून सुरू होत्या. ठराविक मंडळी-खेरीज इतर कुणाला त्या जागीं प्रवेश मिळत नव्हता. मराठीच्या प्रोफेसरना-सुद्धां बंदी करण्यांत आली होती, त्यामुळें तेही बिचारे खवळले होते. पण इरेला पेटलेल्या मुलांपुढें त्यांचें कांहीं चालत नव्हतें.

तालमीच्या वेळीं शारदाबाईबरोबर चंपाही केव्हां केव्हां येत असे. तारिणी चंपेला 'धाकटी आई' म्हणून म्हणे. या धाकटया आईच्या येण्यापायीं टिंगल-बाज विद्यार्थ्यांना नवें खाद्य मिळालें होतें. दोन्ही नाटकांच्या फडाबाहेर असणाऱ्या या टोळक्यानें तारिणी आणि शरयू या दोघींच्या नांवाची गोपीनाथच्या नांवाशीं जोड देऊन उघडउघड बदनामी करायला सुरवात केली होती. या कामीं मधुकरही त्यांना सामील झाला होता. नाटकाच्या प्रयोगाच्या वेळीं या नवीन नटनटींना नामोहरम करण्यासाठीं एक जथा बनवण्यांत आला होता. त्याला वरिष्ठांचेंही सहाय्य नव्हतें असें म्हणतां आलें नसतें.

शेवटीं एकदांचें नाटक बसून तयार झालें. मुंबईत आलेल्या कुठल्यातरी एका नाटकमंडळीच्या सहाय्यानें रंगी तालमीची व्यवस्था करण्यांत आली. या रंगी तालमीसाठीं कॉलेजांतल्यापेक्षां कॉलेजच्या बाहेरच्याच मंडळींना आमंत्रण देण्यांत आलें होतें. त्यांत मराठी भाषेचे बरेचसे लेखक आणि वृत्तपत्रकारही आले होते.

रंगी तालमीनें या प्रेक्षकांचें तितकेसें समाधान झालें नाहीं. प्रत्येक जण आपल्या कामाविषयीं साशंक होता. आत्मविश्वासाचा अभाव प्रत्येकाच्या ठायीं दिसून येत होता. सर्वांत जास्त घाबरली होती तारिणी. स्वतः लिहिलेलीं वाक्यें स्वतः उच्चारण्यापायीं तिला एक प्रकारचा संकोच वाटत होता—अनिश्चितपणा

वाटत होता. त्या अस्वस्थपणामुळें तिची भूमिका या रंगी तालमींत हिणकस ठरली. जाणत्या प्रेक्षकांनीं उघडउघड जरी तसें सांगितलें नाहीं तरीही एक लेखक म्हणाले, " लेखिका कांहीं नटी होऊं शकत नाहीं. या मुलीच्या लेखणींत सामर्थ्य आहे पण वाणींत जोर नाहीं. वाणी आणि लेखणी सदोदित सारख्याच जोरानं चालतात असं कांहीं नाहीं. हिच्यापेक्षां जास्त निर्भय असलेल्या एकाद्या मुलीला ही भूमिका दिली असती तर बरं झालं असतं. "

त्या उद्गारामुळें तारिणी खचली नाहीं. शरयूला मात्र फारच वाईट वाटलें, कारण सर्वजण तिचीच तारीफ करीत होते. गोपीनाथच्या कामाबद्दलही असेच निराशेचे उद्गार निघत होते.

या निर्णयामुळें नाटकाच्या पुरस्कर्त्या विद्यार्थ्यांचा बराचसा उत्साहभंग झाला.

पण तारिणी खचली नव्हती. संकोचानें आपली भूमिका आपण वठवीत असल्याची तिला जाणीव होती. ती अंदाज घेत होती—पायाखालची जमीन चांचपडून पहात होती. आपलें शक्तिसर्वस्व तिनें या रंगी तालमींत खर्ची घातलें नव्हतें. म्हणूनच प्रयोगाच्या वेळीं कोणत्या निश्चित स्वरूपांत अभिनयाचा विकास झाला पाहिजे याचा निश्चित अंदाज आतां तिला झाला होता.

गोपीनाथ कांहींच बोलत नव्हता. त्याला उत्साह येण्यासाठीं शरयू ज्या वेळीं कांहीं तरी गुळमुळित बोलूं लागली त्यावेळीं तो म्हणाला, " माझ्या कामाची मला पर्वा नाहीं. नाइलाज म्हणून हें काम मी पत्करलें आहे. तें बिघडलं तरी प्रयोगाचं फारसं नुकसान होणार नाहीं. काम चांगलं झालं पाहिजे तें तारिणीचं. तुम्ही इतर माणसं घाबरलां असाल पण मी मात्र स्वाभिमान-पूर्वक सांगतों, कीं प्रयोगाच्या दिवशीं तारिणी सर्वांना दिपवून टाकील. "

गोपीनाथचे हे उद्गार शरयूला तेवढेसे पटले नाहींत. तिच्या कामाची तारीफ झाल्यामुळें जरी तिला आनंद वाटत होता तरीही तारिणीच्या कामा-बद्दलचा जाणक माणसांचा निर्णय पाहून ती खचून गेली होती. शारदाबाई कांहींच बोलत नव्हती.

पुन्हां एकदां कच्ची तालीम घेण्यांत आली. त्या तालमींत नकला बरोबर आहेत कीं नाहींत हें पहाण्यापलीकडे कुणालाच कांहीं सांगण्यांत आलें नाहीं. नाटक बसवतांना तिची नजर फक्त मराठी भाषेपुरती होती. मूळ लेखकाच्या अनस्यूत भावनांचा आविष्कार करण्यापुरतें प्रत्येक भूमिकेला अनुलक्षून कॉलेजांतील व्याख्यानाप्रमाणेंच एक व्याख्यान देण्यापलीकडे तिनें इतर दिग्दर्शकांसारखी

संथा देण्याचें रांगडें दिव्य केलें नव्हतें. म्हणूनच या कच्च्या तालमींत कुणाला कांहीं उपदेश करण्याच्या भानगडींत ती पडली नाहीं.

संमेलनाच्या पहिल्या दिवशीं रात्रीं इंग्रजी नाटकाचा प्रयोग झाला. त्या प्रयोगाला सर्व भाषा जाणणारे लोक हजर होते. इंग्रजी भाषेंतला हा प्रयोग प्रिन्सिपलसाहेबांनीं बसवला असल्याचें कार्यक्रमपत्रिकेंत लिहिलें असल्यामुळें सर्वांनींच त्याची तारीफ केली. एकाच मराठी लेखकानें मात्र विरोधी मत दिलें. तो म्हणाला, "हा प्रयोग अगदींच विपर्यस्त स्वरूपांत झाला. मूळ लेखकाची भाषा जितकी स्वाभाविक तितकाच पात्रांचा अभिनय कृत्रिम होता. ही असली अभिनयपद्धति शेक्सपीअरच्या नाटकाला शोभून दिसली असती. प्रत्येक पात्रानं अस्वाभाविकतेची अगदीं पराकाष्ठा केली. म्हणूनच त्याला अभिनय म्हणायचं असेल तर खुशाल म्हणा ! नाटकापेक्षां सर्कशीचाच प्रयोग आपण पहातों आहों असं मला वाटलं."

सर्वांचें एकमत झालेलें असतां या एकाच लब्धप्रतिष्ठ लेखकाच्या विरोधाला तिथें कोण विचारणार होतें ? एका विक्षिप्त माणसाचें तें मत आहे असें धरून चालून सर्वांनीं तिकडे दुर्लक्ष केलें.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं मराठी प्रयोग झाला. रंगी तालमीला आलेले सारे प्रेक्षकही या वेळेला हजर होते.

तारिणीनें सर्वांनाच आश्चर्यचकित केलें. रंगी तालमीची ती साशंक वृत्ति यावेळीं तिच्याठायीं राहिली नव्हती. आत्मविश्वासाच्या निस्सीम जोरावर ती आपली भूमिका वठवून दाखवीत होती. प्रिन्सिपलसाहेबांना मराठी भाषा जरी कळत नव्हती, तरी मूळाच्या अनुरोधानें ते या प्रयोगाकडे पहात असल्यामुळें त्यांना प्रत्येकाच्या अभिनयाची पूर्ण कल्पना येत होती.

नाटकाचा प्रयोग अतिशय रंगला. शेवटच्या अंकांत तारिणीनें आपल्या अभिनयकौशल्याची कमाल केली. गोपीनाथचा संयमात्मक अभिनय कित्येक वेंचक अशा प्रेक्षकांनाच तेवढा हृदयगम्य झाला. सर्वसामान्य प्रेक्षकांच्या दृष्टीनें गोपीनाथ जरी फारसा कुणाच्या नजरेंत भरला नाहीं, तरी त्याच्याबद्दल कुणी वाईट उद्गारही काढले नाहींत.

शरयूचें काम चांगलेंच झालें होतें. पण तारिणीनें मात्र सर्वांना दिपवून टाकलें होतें. मराठीचे प्रोफेसर शेजारीं बसलेल्या माणसांजवळ खवचटपणानें मधून मधून असमाधानाचे उद्गार जरी काढीत होते तरी त्यांच्या त्या उद्गारांना जोड द्यायला त्यांना कुणीच साथीदार मिळाला नाहीं.

प्रिन्सिपलसाहेबानीं मात्र मनाचा खरा मोठेपणा दाखवला. प्रयोगाच्या शेवटीं भाषण करतानां ते म्हणाले, " हा प्रयोग आमच्या इंग्रजी प्रयोगापेक्षां जास्त कौशल्यपूर्ण झाला हें कबूल करायला मला यत्किंचितही संकोच वाटत नाहीं. या प्रयोगाचं दिग्दर्शन इंग्रजी भाषेचा मुळींच गंध नसलेल्या एका महिलेनं कसं केलं, याचंच मला आश्चर्य वाटतं. ज्या खांचाखोंचा माझ्या कसलेल्या नजरेलासुद्धां दिसल्या नव्हत्या, त्या या प्रयोगांत स्पष्टपणें निदर्शित झाल्यामुळं मराठी भाषा मला कळत नसूनही या प्रयोगापासून नाट्यशिक्षणाचे नवे धडे मला मिळाले आहेत, हें मी मोठ्या अभिमानानं कबूल करतों. या प्रयोगाचे इंग्रजी आणि जर्मन रंगभूमीवर झालेले प्रयोग मी पाहिले आहेत. त्यांच्याशीं तुलना करतांना हा प्रयोग कोणत्याही दृष्टीनं कमी दर्जाचा झालेला नाहीं. काल एका लेखकानीं मारलेला शेरा आज मला पटला. शेक्सपीअर आणि इब्सेन यांच्या नाटकांचीं तंत्रं एकमेकांपासून कशीं भिन्न आहेत याचं प्रात्यक्षिक मला दाखवून दिल्याबद्दल मी या नाटकाच्या दिग्दर्शक महिला, नटी, नट आणि पर्यायानं साऱ्या मराठी वाङ्मयमंडळाचा अत्यंत आभारी आहें. "

प्रिन्सिपलसाहेबांचे ते प्रांजल उद्गार ऐकून मराठीच्या प्रोफेसरची दांतखिळी बसली. निंदा करायला आतां कुणालाच तोंड राहीलें नव्हतें. टिंगल करण्यासाठीं आलेला जथा जागच्या जागीं गारठून गेला होता. लेखिकेप्रमाणेंच एक अभिनेत्री म्हणून प्रत्येकांनीं त्या दिवशीं तारिणीचा जो गौरव केला, तो पाहून शारदा-बाईप्रमाणेंच चंपेचें हृदयही समाधानाच्या उल्हासानें भरगच्च होऊन गेलें.

## ३ लेखिका

लेखिका या नात्यानें शारदाबाईची यापूर्वीच जरी प्रख्याती झाली होती तरी सार्वजनिक जागीं आणि प्रसंगीं यापूर्वी ती फारशी मिसळली नव्हती. आयुष्याच्या उत्तरकालांत का होईना पण या नाटकामुळें तिला सार्वजनिक जागीं प्रामुख्यानें येणें भाग पडलें आणि त्यामुळेंच बऱ्याच प्रतिष्ठित लोकांचा तिला परिचय झाला.

एकलकोंड्या जीवनांत ती आजवर समाधान मानीत होती. उघड्या

प्रख्यातीचा कैफ यापूर्वी तिनें अनुभवला नव्हता. या वेळीं तो अनुभव घेणें घडलें—नाइलाजानें घडलें—नाटकाची दिग्दर्शक म्हणून जरी हा प्रसंग तिच्यावर आला होता तरीही लेखिका या नात्यानेंच सर्वत्रांनीं तिचें स्वागत केलें होतें. ती लेखिकेची भूमिका जशी मानाची होती तशीच हक्काची होती—दिग्दर्शन करण्याचा डाग तिला उगीच लागला होता.

आयुष्यांत हा अनुभव तिला नवा होता. लोकप्रियतेची प्रत्यक्ष चटक लागणें किती विलक्षण असतें, त्या चटकेचें व्यसनांत कसें भावांतर होतें, याचा प्रत्यय तिला हळुहळू येऊं लागला.

शारदाबाईच्या या लोकप्रियतेबरोबरच तारिणीही प्रख्यात होऊं लागली होती. लेखनाची चटक किती विलक्षण असते याचा अनुभव यापूर्वी तिला नव्हता. लेखनाच्या आवडीपायीं जे विद्यार्थी परीक्षा बुडवीत होते त्यांना यापूर्वी ती दोष देत असे. आज ती वृत्ति तिच्या ठायीं राहिली नव्हती. आज ती स्वतःच त्या चटकेला बळी पडूं लागली होती. सुरवात भाषांतरानें झाली खरी पण त्या भाषांतरीकरणाचा अभिमान बाळगणें तिला गौण वाटूं लागलें. स्वतंत्र लिखाण करायला तिनें सुरवात केली. कविता आणि लघुकथा लिहून लेखिका म्हणवून घेण्यांत तिला कमीपणा वाटत होता—म्हणजे कविता आणि लघुकथा लिहिणें तिला कमदर्जाचें वाटत होतें असें मात्र नव्हे—कवितेची आणि लघु-कथेची व्याप्ति आकुंचित आहे, त्या आकुंचित लेखनापेक्षां आपल्या लेखनाची व्याप्ति मोठी असली पाहिजे असें तिला वाटूं लागलें.

लेखनाची सुरवात—भाषांतरित कां होईना—नाटकानें झालेली असल्या-मुळें पहिल्यानें नाटकच हातीं घ्यावें असें तिला वाटलें. पण जसजशी त्या विषयाचा ती अभ्यास करूं लागली तसतसें तिला वाटूं लागलें, कीं नाटक लिहिण्याची जबाबदारी पत्करण्याइतकें सामर्थ्य आपल्या अंगीं नाहीं.

म्हणूनच तिनें कादंबरीला हात घातला. हें लेखन करण्यासाठीं जरी तिनें अभ्यासाकडे प्रत्यक्ष दुर्लक्ष केलें नव्हतें तरीही यापूर्वी जितकें अंतःकरण ती अभ्यासांत गुंतवीत होती तितक्याच निष्ठेनें अभ्यास करण्याइतकें लक्ष्य तिच्या वृत्तींत राहिलें नव्हतें.

शारदाबाईच्या तें ध्यानीं आलें. पत्करलेल्या विद्यार्थ्यांच्या बाण्याला आपल्या मुलीकडून हा विक्षेप होत आहे असें तिला वाटलें. कोणत्याही बाबतींत ती जशी तिला उत्तेजन देत नसे तशीच तिचा मनोभंगही करीत नसे.

त्या नित्याच्या वृत्तीला अनुसरून पूर्वीप्रमाणेंच तारिणीकडे कूर्मदृष्टिनें पहात ती स्वस्थ राहिली होती.

पण या कामीं दोन व्यक्ती तारिणीला उत्तेजन देऊं लागल्या होत्या. एक तिची मानीव आई चंपा आणि दुसरा गोपीनाथ. या प्रकरणीं शरयू तटस्थ होती. नाटकाचा प्रयोग होऊन गेल्यावर या बाबतींत शरयूला विशेष जिव्हाळा वाटत नव्हता. ती तात्कालिक हूल तिच्या दृष्टीनें जशी आली तशीच आज गेली होती. तो प्रासंगिक अनुभव विसरून शरयू पुन: आपल्या अभ्यासाकडे वळली होती.

गोपीनाथच्या वृत्तींत मात्र एकदम फरक पडला होता. पुस्तकांतला किडा म्हणून प्रख्यात झालेला हा विद्यार्थी आतां तारिणीच्या मागून हिंडूं लागला होता. तारिणीच्या लेखनकार्यांत जरी त्याची प्रत्यक्ष मदत होत नव्हती तरी त्याच्या उत्तेजनाच्या जोरावरच तिचें लेखनाचें कार्य अव्याहत सुरू राहिलें होतें.

रोज जेवढें कांहीं लिहून होई तेवढें एकदां गोपीनाथला दाखवल्याशिवाय तारिणीला चैन पडत नसे आणि तें वाचण्यासाठीं तोही अत्यंत आतुर झालेला असे. तिच्या लेखनांतले दोष काढण्यासाठीं त्याचें हें वाचन होत नव्हतें—दोष शोधण्याची त्याची दृष्टीच मुळीं नाहींशी झाली होती. तारिणी जें जें कांहीं लिही तें तें त्याला अचुक वाटे आणि म्हणूनच तारिणीही त्याच्या या उत्तेजनासाठीं तितकीच आतुर होऊं लागली होती.

चंपेचें तसें नव्हतें. वाचक या नात्यानें तिनें जरी पुष्कळसें वाचन केलें होतें तरी परीक्षकाची काकदृष्टि तिच्याठायीं नव्हती—तरीही ती रसिक होती. रसिकतेला कुठेंही विघात झाला तर तो तिला खपत नसे. गोपीनाथइतक्याच तन्मयतेनें जरी ती तारिणीचें लिखाण वाचीत असे, तरीही लेखनांत आलेली यत्किंचित रुक्षता ती चट्कन ओळखून काढी आणि तारिणीच्या नजरेला आणी.

शेवटीं एकदांची ती कादंबरी पुरी झाली. पुस्तक बरेंच मोठें झालें होतें. मोठयाशा कथांइतक्या कादंबऱ्या त्यावेळीं जरी लिहिल्या जात नव्हत्या तरीही चार साडेचारशें पानांची कादंबरी देखील त्यावेळीं क्वचितच लिहिली जात होती. म्हणूनच ती कादंबरी प्रसिद्ध केली जाईल कीं नाहीं याबद्दल तारिणीला शंका वाटत होती. तिच्या आईचीं पुस्तकें जो प्रकाशक प्रसिद्ध करीत असे त्याला ती कादंबरी दाखववावी असें चंपा आणि गोपीनाथ यांना वाटत होतें. पण तसें करायचें म्हणजे पुस्तक एकदां शारदाबाईच्या नजरे-खालून जाणें अवश्य होतें.

शारदाबाईला पुस्तक कुणी दाखवावें हाच प्रश्न सर्वांना बिकट वाटत होता. तारिणी घाबरत होती, चंपेला धीर होत नव्हता, तेव्हां शेवटीं गोपीनाथनेंच तें काम पत्करावें असें ठरलें. पुस्तकाचीं लिखितें घेऊन तो शारदाबाईकडे आला आणि म्हणाला, " एक महत्त्वाची कामगिरी करणं माझ्याकडे आलं आहे. तारिणीनं एक कादंबरी लिहीली आहे. ती एकदां तुमच्या नजरेखालून जावी अशी माझी इच्छा आहे. "

" असं तुम्हाला वाटतं का ? " शारदाबाई म्हणाली, " नि तारिणीला काय वाटतं ? "

गोपीनाथ क्षणभर घुटमळला आणि म्हणाला, " तारिणीला काय वाटतं तें मला माहीत नाहीं. मला वाटलं, मी तसं सुचवलं नि तिनं सम्मति दिली. तिला काय वाटतं तें मी विचारलं नाहीं. किती झालं तरी ती तुमची मुलगी—आपण लिहीलेलं पुस्तक तिनं तुम्हाला दाखवायचं नाहीं तर दाखवायचं कुणाला ? "

" तें खरं आहे. " शारदाबाई म्हणाली, " पण तें तिनं दाखवायचं. मला गंमत वाटते ती हीच, कीं माझ्या मुलीसाठीं मध्यस्थी करायला तिसऱ्याला कां तसदी पडावी ? "

" तसा मी परका का आहें ? " गोपीनाथ म्हणाला, " आपला परिचय नवा असला तरी परकेपणाची भावना ठेवून कांहीं मी इथं येत नाहीं. तशा माझ्या फारशा कुणाशीं ओळखी नाहींत. उगीच ओळखी जोडायची मला संवय नाहीं. मी एकलकोंडा आहें असं सारे समजतात—तें खरंही आहे—तशीच मनाची ओढ वाटल्याशिवाय मी कुठं संबंध जोडीत नाहीं. "

" असं होय ! " शारदाबाई म्हणाली, " मग ही तुमची मनाची ओढ कुठं आहे ? "

" या घराशीं ! "

" या घराशीं म्हणजे कुणाशीं ? या घरांत मी आहें, माझी सवत चंपा आहे, नि ही माझी मुलगी तारिणी आहे. आम्ही तिघंही या घरचीं माणसं आहोंत. यांपैकीं कुणाचा ओढा तुम्हाला इथं ओढून आणायला समर्थ झाला ? माझ्या मुलीसाठीं माझ्याकडे मध्यस्थी करायला येण्याइतका अधिकार कुणाच्या ओढ्यामुळं तुम्हाला लाभला ? "

गोपीनाथला उत्तर सुचेना. हा अव्यापारेषु व्यापार आपण केला नसता तर बरें झालें असतें असें क्षणभर त्याला वाटलें. कोणत्याही विशिष्ट हेतूनें आपण

हें काम पत्करलें होतें कीं काय असा त्यालाच प्रश्न पडला. ती चंपेची सूचना होती. स्वतःला संकोच वाटणारी जबाबदारी कुणावर तरी टाकावी म्हणून चंपेनें ती कामगिरी त्याच्यावर सोंपवली होती. पण तसें स्पष्टपणें शारदाबाईला सांगणें त्याला कठीण गेलें.

तो कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून शारदाबाई म्हणाली, " बरं, बरं ! मी पहातें वाचून. तसा तुम्हाला संकोच वाटायला नको. तारिणी माझी मुलगी आहे. माझ्याइतकीच अभिमानी आहे याची कल्पना मला आहे. तिनं स्वतः मला हें पुस्तक दाखवलं नसतं. बरं झालं तुम्ही हें काम पत्करलं तें ! "

जड पावलांनीं गोपीनाथ निघून गेला. शारदाबाईला हवा होता तो परिणाम त्याच्यावर झाला होता. निष्कारण लघळपणा करणारा तो मुलगा नव्हता हें शारदाबाईला माहीत होतें, असें असूनही एखाद्या लघळ माणसालाच शोभण्यासारखी ही वृत्ती त्यानें दाखवलेली पाहून शारदाबाईचें मन साशंक झालें होतें आणि म्हणूनच तिनें या पहिल्या प्रसंगाला आपल्या मनाची थोडीशी चुणुक त्याला दाखवली.

हा संवाद झाला त्यावेळीं तारिणी तिथें नव्हती. चंपाही नव्हती. त्या प्रसगीं काय झालें तें गोपीनाथनें त्या दोघींना कळवलेंही नाहीं.

ती गोष्ट गोपीनाथच्या मनाला लागली होती. गोंडा घोळवीत येणाऱ्या कुत्र्याला अचानक फटका बसला म्हणजे तो जसा केंकाटत निघून जातो त्याचप्रकारें आपण तिथून पाय काढला असें गोपीनाथला वाटूं लागलें होतें, म्हणूनच तो या बाबतींत कुणाकडेसच कांहीं बोलला नाहीं.

शारदाबाईनें तें हस्तलिखित वाचून पाहिलें. तारिणीला बोलावून ती म्हणाली, " मी हें वाचलं. बरं आहे. ठीक आहे. अगदींच कांहीं नक्कल केली नाहींस कुणाची—स्वतःची बुद्धि खर्ची घातली आहेस—" तारिणीची मुद्रा उजळून उठली. शारदाबाईच्या तें ध्यानीं आलें. ती पुढें म्हणाली, "—तरीपण माझं तितकंसं समाधान झालं नाहीं. समाजाची अजून तुला ओळख नाहीं. समाजाबद्दल तूं ज्या कल्पना केल्या आहेस त्या वास्तवापेक्षां काल्पनिकच जास्त आहेत. कदाचित् इंग्रजी वाङ्मयाचा सुद्धां तो परिणाम असूं शकेल. कथानक चांगलं आहे. संवाद चांगले आहेत. वर्णनं ठीक आहेत—पाल्हाळिक वर्णनं मला आवडत नाहींत—वर्णनं ठीक आहेत पण सारं वातावरण मला अनोळखी वाटतं. उद्यां हें पुस्तक प्रसिद्ध झालं तर कदाचित तुझी तारीफही होईल.

पण तशी तुझी तारीफ झाली तर मला मात्र मोठं दुःख होईल. अवास्तव लेखनाची मला मोठी चीड आहे—" तारिणी अस्वस्थ झाली असें पाहून ती म्हणाली, "—अवास्तव लेखनाची मला मोठी चीड आहे. ध्येयवाद पाहिजे पण त्या ध्येयवादासाठीं वस्तुस्थितीचा विपर्यास होतां कामा नये. या कादंबरींत तो तसा झाला आहे. वस्तुस्थिति तुला मुळीं माहितच नाहीं तिथं विपर्यास झाला म्हणून तुला दोष कसला द्यायचा ?"

मोठ्या संकोचानें तारिणी म्हणाली, " कुठं दुरुस्ती करतां येईल का ? "

" नाहीं. " शारदाबाई म्हणाली, " दुरुस्ती करतां यायची नाहीं आणि आतां हें दुरुस्त कर असंही मी म्हणणार नाहीं. एकदां हें पुस्तक प्रसिद्ध होऊं दे. त्याचा काय परिणाम होतो तें आपण पाहूं. परिणाम कसाही झाला तरी झालंय हें लेखन अवास्तव झालं आहे एवढं मात्र केव्हांच विसरूं नकोस. राहूं दे हें हस्तलिखित इथंच. काय करायचं तें मी करीन. "

सारें कांहीं सुसंगत झालें. पण झाल्या प्रकाराबद्दल तारिणीला समाधान वाटलें नाहीं. गोपीनाथनें जशी आपली हकीकत तिला सांगितली नाहीं त्याचप्रमाणें या भाषणाचाही तिनें गोपीनाथकडे उल्लेख केला नाहीं. चंपेलाही कांहीं सांगितलें नाहीं.

तें पुस्तक प्रसिद्ध झालें असें पाहून गोपीनाथला आनंद झाला. सर्वांनीं तिचें अभिनंदन केलें पण पहिलें अभिनंदन गोपीनाथकडूनच झालें होतें. शरयू मात्र अगदीं आश्चर्यचकित झाली. झाल्या गोष्टीचा तिला मागमूससुद्धां नव्हता. साऱ्या गोष्टी माहीत असतांना गोपीनाथनें आपल्याला कांहींच सांगितलें नाहीं याचें मात्र तिला वाईट वाटलें.

वर्तमानपत्रांनींसुद्धां त्या पुस्तकाची तारीफ केली. शारदाबाईच्या लेखनांतील कलात्मकतेची उणीव तिच्या मुलीनें भरून काढली असेंही कित्येक परीक्षकांनीं म्हटलें होतें. कॉलेजच्या आवाराबाहेर पाय टाकण्यापूर्वींच एक यशस्वी लेखिका म्हणून कीर्ति मिळाल्याबद्दल कांहीं वर्तमानपत्रांनीं तिची तारीफ केली होती.

'डॉल्सहाऊस'च्या तिच्या भाषांतरालाही आतां मागणी आली. तें भाषांतर छापून निघण्याची कल्पना तिच्या मनांत मुळींच नव्हती. ही अनपेक्षित मागणी आल्याचें पाहून तिलाही आश्चर्य वाटलें. लेखिका आणि अभिनेत्री या दोन्ही नात्यांनीं तिची पुन्हां प्रशंसा होऊं लागली. त्या प्रशंसेनें ती हुरळून गेली नाहीं. तिच्या आईनें तिला आधींच सावध केलें होतें. तो उपदेश ती विसरली नव्हती.

सर्वांत आनंद झाला होता तो चंपेला. जणूं काय तें आपलेंच पुस्तक आहे अशा भावनेनं तारिणीचें वैभव हातीं घेऊन ती स्वतः मिरवीत होती.

चंपेच्या या आनंदाचें तारिणीला कौतुक वाटत होतें. ती चंपेला म्हणाली, " असं पहा, हें पुस्तक मी लिहिलं, लोकांनीं त्याची तारीफ केली पण आईला काय वाटतं तें तूं विचारलंस का तिला ? "

" तिला कशाला विचारायला हवं ? " चंपा म्हणाली, " प्रत्येकाला खोड ठेवायची तिला संवय आहे. तूं तर मुलगीच. तुझ्या लेखनाकडे पहातांना तिची दृष्टि असणार वडील माणसाची. तूं म्हणशील, मीही वडील माणूस आहें—तें खरं आहे—पण माझं आपलं भाबडं मन आहे. माझ्या मुलीनं नांव गाजवलं याचं कौतुक मला वाटायचं नाहीं तर कुणाला ? "

" छान ! " तारिणी उद्गारली, " तुझ्या मुलीनं होय ? आणि मी माझ्या आईची मुलगी नव्हे वाटतं ? "

" तिला कुठं आहे आईचं काळीज ? " चंपा म्हणाली, " ती अगदींच रुक्ष आहे. असल्या रुक्ष माणसाच्या हातून इतकं सुंदर लिखाण कसं होतं याचंच मला आश्चर्य वाटत असतं. परिस्थितीनं तिला मारलं आहे. कोंवळ्या अंतःकरणावर दुःखाच्या फटक्यांनीं एक प्रकारचं कवच वाढलं आहे. तें कवच फोडल्याशिवाय आंतला गोडवा ती कुणाच्या हातीं लागूं देत नाहीं, असा विलक्षण स्वभाव झाला आहे तिचा ! म्हणून ती मोकळ्या जिभेनं तुझी तारीफ करीत नाहीं. तोच गोपीनाथ पहा, तुझं पुस्तक माथ्यावर घेऊन साऱ्या मुंबई-भर हिंडतो आहे !—"

" पण शरयू काय म्हणाली ? " तारिणीनें विचारलें.

" ती बिचारी काय म्हणणार ? " चंपा म्हणाली, " तुझ्यावर तिची भारी श्रद्धा आहे. तिला तर तें आवडलंच पण त्याहीपेक्षां तिला जो आनंद झालाय तो तुझं नाटक प्रसिद्ध होणार याचा. नाटकांत फोटो घालण्यासाठीं पुन्हा एकदां सर्वांनी रंगलं पाहिजे असा आग्रह आहे तिचा. गोपीनाथसुद्धां तसंच म्हणतोय. आतां तें डेप्युटेशन येणार आहेच तुझ्याकडे. "

ही हकीकत ऐकून तारिणीच्या मनावर मोठा विलक्षण परिणाम झाला. नाटक प्रसिद्ध होणार हें तिला माहीत होतें. पण फोटो घालण्याची कल्पना तिच्या मनांत केव्हांच आली नव्हती. त्या कल्पनेनें तिला कसेसेंच वाटलें. नाटकांत काम करण्यासाठीं ती जी सरसावली होती ती प्रासंगिक ईर्ष्येमुळें. ती

ईर्षा आतां निघून गेली होती. कुणातरी माणसाशेजारीं पत्नी म्हणून— नाटकापुरता का होईना—पत्नी म्हणून आपला फोटो यावा हें तिच्या मनाला पटेना. शरयू आणि गोपीनाथ ज्यावेळीं तो प्रस्ताव घेऊन तिच्याकडे आलीं त्यावेळीं तिनें आपलें मन त्या दोघांसमोर उघडें केलें.

गोपीनाथ म्हणाला, " मला आश्चर्य वाटतं तुझं तारिणी, असल्या खुळ्या भावना तुझ्या अंतःकरणांत वावरत असतील असं नव्हतं मला वाटलं ! फोटो असला म्हणून काय बिघडलं ? "

" तें खरं आहे. " तारिणी म्हणाली, " पण माझी ही आपली खुळी समजूत आहे. नाटकांत काम करण्यापलीकडे ज्या माणसाची माझी ओळख सुद्धां नाहीं, त्याचा फोटो माझा पति म्हणून कायम ठशानं छापला जावा हें कांहीं माझ्या मनाला पटत नाहीं. तुझा आतां परिचय झाला आहे, स्नेहसंबंध जुळले आहेत, परकीपणा राहिलेला नाहीं—त्या जागीं तूं असतास तर कदाचित मी त्या फोटोला नकार दिला नसता. हें फोटोचं वेड डोक्यांतून काढून टाक. पुस्तक प्रसिद्ध होतं आहे तेवढंच पुरेसं आहे. प्रकाशकाकडे ठराव केला त्यावेळीं फोटोचा प्रश्न कांहीं आला नव्हता. या असल्या भलत्या कल्पना उगीच त्या प्रकाशकाच्या डोक्यांत घालूं नका. "

त्या भाषणाचा गोपीनाथप्रमाणेंच शरयूच्याही मनावर परिणाम झाला. ते परिणाम भिन्न प्रकारचे होते. त्या भाषणामुळें त्या दोघांच्या मनांत एका नव्या बीजाची पेरणी झाली होती.

गोपीनाथ हुरळून गेला होता. शरयू अस्वस्थ झाली होती. तारिणीला या परिणामाची कल्पनासुद्धां नव्हती.

या क्षुल्लक प्रसंगांतून पुढें आणखी नवे विलक्षण प्रसंग निर्माण होतील अशी त्या तिघांनाही कल्पना नव्हती.

' त्या जागीं तूं असतास तर '—हा तारिणीचा एकच उद्गार गोपीनाथच्या मनांत सारखा घोळत राहिला होता. त्या जागीं आपण असतों तर, तारिणीनें तसा फोटो घ्यायला आपण तयार आहों, असें कां म्हणावें हेंच त्याला कळेना.

तारिणीच्या मनांत आपल्याविषयीं कांहीं विशिष्ट प्रकारची भावना उत्पन्न झाली आहे कीं काय याचा अंदाज घेण्यासाठीं आतां तो सरसावला होता.

---

# ४ दुरावा

शरयू आणि गोपीनाथ या दोघांचा जो घरोबा होता त्याची चांगलीशी कल्पना तारिणीला नव्हती. दोघें शेजारीं आहेत एवढाच तिचा समज होता. शेजारीं असल्यामुळें एकमेकांचे संबंध जितके घरोब्याचे असायचे तितकेच या दोघांचे आहेत अशी तिची कल्पना होती.

पण वस्तुस्थिति अगदीं वेगळी होती. शरयूचा जन्म जरी कुलीन घराण्यांत झालेला नव्हता तरीही गोपीनाथच्या बापाच्या उदार वृत्तीमुळें त्या दोन घराण्यांत एकमेकांकडे जाण्यायेण्याबरोबरच अत्यंत जिव्हाळयाचे संबंध निर्माण झाले होते. शरयू आणि गोपीनाथ या दोघांत जें आकर्षण उत्पन्न झालें होतें त्याची गोपीनाथच्या बापाला पूर्ण जाणीव होती. या आकर्षणाचें रूपांतर उद्यां लग्नांत झालें असतें तर गोपीनाथच्या बापानें विरोध केला नसता. शरयूच्या आईचा विरोध असणें शक्यच नव्हतें. चंपेलासुद्धां या दोघांच्या या संबंधांची पुरेशी जाणीव नव्हती. तिनें आपल्यापरीनें कांहीं अटकळी बांधल्या होत्या. कांहीं तरी पडद्याआडचे संबंध उत्पन्न झाले आहेत असा तिचा अंदाज होता. पण या दोन घराण्यांत शरीरसंबंध घडून येईल याची मात्र तिला मुळींच अटकळ नव्हती.

म्हणूनच शरयू अस्वस्थ झाली होती. तारिणीनें तसे उद्गार कां काढावे याची तिला कल्पना येत नव्हती. असे उद्गार काढण्याइतका गोपीनाथचा आणि तारिणीचा परिचयसुद्धां झाला नव्हता असें शरयूला वाटत होतें. तिकडे गोपीनाथ जसा एक प्रकारच्या विवंचनेंत पडला होता तशीच इकडे शरयूही जास्त जास्त अस्वस्थ होत चालली होती.

त्या दिवसापासून त्या दोघांत कुठेंतरी दुरावा उत्पन्न झाला आहे असें त्यांचें त्यांनाच वाटूं लागलें. पूर्वीची खेळीमेळीची भावना जाऊन आतां त्या दोघांमध्यें संकोच उत्पन्न झाला होता. दोघेंही एकमेकांपासून कांहींतरी चोरून ठेवीत होतीं.

तो प्रकार दोघांनाही जाणवत होता. दोघांचींही मनें क्षुब्ध झालीं होतीं. पण सहज पडलेली ही गांठ उकलायला त्या दोघांपैकीं कुणीच पुढें येईना—आणि त्यामुळें त्या दोघांतला संकोच दिवसेंदिवस वाढत जात होता.

या प्रकरणांत गोपीनाथ अपराधी होता. शरयूचा संकोच दूर करण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं तो आतांसा तारिणीकडे जास्त येरझारा घालूं लागला होता. अशा वेळीं जातांना शरयूलाही त्यानें हांक मारली असती तर शंका घेण्याला तिला जागा राहिली नसती. पण तो जात असे तो एकटाच जात असे—क्वचित् शरयूला चुकवून एकटाच जात असे.

या गोष्टीची शरयूला चुटपुट लागून राहिली होती. होत असलेल्या प्रकाराचा निवाडा करून घेण्यासाठीं तारिणीला विचारावें कीं गोपीनाथला विचारावें, याचा विचार करतां करतां शेवटीं एके दिवशीं तिनें स्पष्टपणें गोपीनाथलाच विचारलें. कदाचित् असला संशय अयोग्य असला तर तारिणीला विचारणें चुकीचें झालें असतें असें वाटल्यावरून ती गोपीनाथला म्हणाली, "अलीकडे तुला काय झालंय गोपी ? असा मला चुकवून कुठं जात असतोस ? एक दिवस आमच्या-कडे येतां आलं नाहीं तर तुझा जीव कासावीस होत असे. आतां चार चार दिवस तूं इकडे फिरकत सुद्धां नाहींस. असला कसला नाद लागला आहे तुला ! "

"कसला नाद नव्हे शरयू ?" गोपीनाथ म्हणाला, "मी एक जबाबदारी अंगावर घेतली आहे. लेखक म्हणून कांहीं मी कधीं मिरवीत नव्हतों. पण टीकाकार या नात्यानं मी थोडंबहुत लिखाण केलं आहे. त्याचं कौतुकही झालं आहे. तें कौतुकच मला नडलं. एक पुस्तक प्रसिद्ध झाल्यामुळं तारिणीला आतां बराच आत्मविश्वास उत्पन्न झाला आहे. दुसरं पुस्तक लिहायला हातीं घ्यायचं तिनं ठरवलं आहे. त्याची आगाऊ चर्चा करीत असतों आम्हीं. शारदाबाईही भाग घेतात त्यांत—"

"असं का ?" शरयू जरा फणकाऱ्यानें म्हणाली.

"हें पहा शरयू—" गोपीनाथ थोडयाशा काकुळतवाणीनें म्हणाला, "भलतीच कल्पना करूं नकोस. संशय हा माणसाचा वैरी आहे. या संशयापायीं आजवर केवढे तरी अनर्थ झाले आहेत. मी कांहीं तिथं एकटाच नसतों. केव्हां शारदाबाई असतात तर केव्हां चंपूताई असतात. कुणी ना कुणी तरी तिथं असतंच—"

"कां आलं हें तुझ्या मनांत ?" शरयू गंभीरपणानें म्हणाली, "संशयाचं मी नांव तरी काढलं होतं का ? तूं कुठं जातोस याची कांहीं मला कल्पना नव्हती. मग तिथं शारदाबाई असतात कीं चंपूताई असतात हा प्रश्न आला

कशापायीं ? मला कांहीं तरी संशय आला आहे असा अंदाज करून तूं जें हें बोलतोयस त्यांतूनच तुझ्या मनांतलं पाप बाहेर येतं आहे. मला सांगून कां जात नाहींस तिकडे ? कां मला घेऊन जात नाहींस ? मला संशय येऊं नये असं खरोखरच जर तुला वाटत असेल तर चंपूताई आणि शारदाबाईपेक्षां मीच तुझ्याबरोबर येणं जास्त चांगलं नाहीं का ? "

गोपीनाथचा चेहरा उतरला. निष्कारण उतावीळपणा करून पेंचांत आल्याची त्याला जाणीव झाली. त्याचें मन त्याला खात होतें यांत शंकाच नव्हती. बुद्धिपुरस्सर तो शरयूला चुकवीत होता. तिनें त्याला विचारलें नसतें तर शरयूकडे कांहींच बोलल्याशिवाय तो असेच आणखी कित्येक दिवस राहिला असता.

काय उत्तर द्यावें याचा विचार करीत तो थांबला आहे असें पाहून शरयू म्हणाली, " खोटं बोलूं नकोस गोपी. खोटं बोलण्यापेक्षां मुळींच कांहीं न बोलणं बरं. सारे जण तुला एकलकोंडा म्हणतात—तूं तसा आहेसच—कधीं कुठं तूं मिसळत नाहींस. तुझं तोंड उघडतं काय तें आमच्या घरीं आलास म्हणजे. आजवर या गोष्टीचा मला मोठा अभिमान वाटत होता. तुझे बाबा आम्हाला कमी लेखीत नाहींत म्हणूनच तूं इथं येतोस—इथं येतोस म्हणूनच मन मोकळं करून बोलतोस. मीही केव्हां संकोच धरला नाहीं तुझ्याकडे. माझ्या आईलासुद्धां कांहीं संकोच वाटत नाहीं त्याबद्दल. आज प्रसंगच आला म्हणून बोलतें, आमच्या जातीच्या धर्माला अनुसरून कांहींतरी करावं कीं मला संसारांत लोटावं, याचा विचार माझी आई कित्येक दिवस करीत होती. मलाच तिनं एके दिवशीं अगदीं स्पष्ट विचारलं आणि मला काय वाटत होतं तें मीही तिला स्पष्टपणें सांगितलं. तिला त्याचा अंदाज होताच. लग्नच व्हायचं तर तें कुणा कुलीनाशीं व्हावं अशी तिची फार इच्छा होती. आमच्या जातींतले कांहींजण आहेत पण त्यांच्याबद्दल माझ्या आईला मुळींच आदर नाहीं. आणखीही कांहीं आहेत आमच्या जातींतले—ते इतके मोठे आहेत कीं शरीर-संबंधासाठीं डोळे वर करून त्यांच्याकडे बघणं आम्हाला तरी शक्य नाहीं—म्हणूनच मी सांगितलं तें ऐकून आईला आनंद झाला—"

" तूं सांगितलंस तिला ? " गोपीनाथ संकोचून म्हणाला, " खरोखरच तूं घाई केलीस शरयू ! "

" कां ! " शरयू म्हणाली, " आतां मन बदललं आहे का तुझं ? असं

वाटायला काय झालंय ? माझी कांहीं चूक झाली आहे, कीं तुझं लक्ष कुठं दुसरीकडे गेलंय ? काय, झालं आहे तरी काय ? ”

“ छे छे ! ” गोपीनाथ म्हणाला, “ तसं कांहींच झालेलं नाहीं. आपलं ठरलंय ते अगदीं निश्चित आहे. पण आईला सांगण्यांत तूं जरा घाई केलीस असं मला आपलं उगीचच वाटलं. एकदां प्रश्न निघाला कीं त्याचा चट्कन निकाल होणं बरं असतं. वडील माणसांना असंच वाटत असतं. ती कांहीं त्यांची चूक नाहीं. पण इतक्या लवकर संसारांत पडायची माझी तयारी नाहीं. आधीं मला माझ्या पायावर उभं राहायची तयारी केली पाहिजे. ”

“ असं का ? ” शरयू म्हणाली, “ असं कधीं बोलला नव्हतास यापूर्वी ! ”

“ तें खरं आहे. ” गोपीनाथ उसनें अवसान आणून म्हणाला, “ तें अगदीं खरं आहे. पण ही गोष्ट तूं आपल्या आईला सांगून टाकलीस असं यापूर्वी तूं तरी मला कुठं सांगितलं होतंस ? ”

“ सांगायला कशाला हवं होतं ” शरयू म्हणाली, “ मी कांहींतरी सांगितल्याशिवायच का माझ्या आईनं तुझ्या बाबाकडे बोलणं काढलं ? नुसत्या अटकळीवरच का आमच्या दोघांच्या वडील माणसांनीं ती चर्चा केली ? सारी कांहीं चर्चा उघड उघड झाली ती तुला माहीत आहे, मग आईला सांगण्यांत मी घाई केली असं आतांच कां तुला वाटूं लागलं ? ”

“ मला देखील तोच प्रश्न पडला आहे, ” गोपीनाथ म्हणाला, “ सारी चर्चा होऊन गेल्यावर मला असं कांहीं वाटायला नको होतं. उगीच कांहीं तरी कल्पना मनांत आली आणि सहज मी बोलून गेलों—अगदीं चुकून बोलून गेलों. असं कां बोललों तें आतां माझं मलाच कळत नाहीं.—” क्षणभर थांबून तो म्हणाला, “ मला क्षमा कर शरयू, मी असं बोलायला नको होतं. ती माझी चूक होती. तसं बोलल्याचा आतां मला पश्चाताप होतो आहे. ”

गोपीनाथच्या त्या उत्तरानें शरयूचें समाधान झालें नाहीं. उलट झालेलें असमाधान अधिक वाढलें. गोपीनाथच्या मनांत कांहींतरी विकल्प उत्पन्न झाला आहे, तो आपल्या नजरेला येऊं नये म्हणून तो नुसती चाळवाचाळव करतो आहे, क्षमा मागण्याचा आव आणून आपली फसवणूक करतो आहे, असंच शरयूला वाटलं.

आजवर ती मोठ्या उल्हासानें वावरत होती. आपल्या भाग्यांत दुर्लभ असलेलें स्थळ आपल्याला मिळणार याचा तिला आनंद वाटत होता. त्या

आनंदाच्या भरांत निमग्न होऊन ती स्वतःला धन्य मानून घेत होती. तिच्या जोडीच्या तिच्या जातींतल्या इतर मुलींना तिचा मत्सर वाटत होता हें तिला माहीत होतें. हा संबंध आतां चोरटा राहिला नव्हता. तिच्या जातींत तो सर्वत्रांना माहीत झाला होता. कित्येकांना त्याचा अभिमान वाटत होता, तर जातीचा धर्म टाकून भलत्याच दरिद्री प्रपंचांत पडण्याच्या या वृत्तीबद्दल तिला आणि तिच्या आईला कित्येक दोष देत होते. त्या सर्वांना झिडकारून तिची आई या संबंधाबद्दल अभिमानानें शेखी मिरवीत होती.

म्हणूनच गोपीनाथच्या या उद्गाराबद्दल तिला एवढें वाईट वाटलें. या प्रकाराचा एकदां निकाल लावून घ्यायचा तिनें निश्चय केला. सारी हकीकत तारिणीला सांगितल्याशिवाय ही अचानक पडलेली गांठ उकलली नसती.

मनाचा निश्चय करून तिनें झालेली सारी हकीकत जेव्हां तारिणीला सांगितली तेव्हां तिलाही आश्चर्य वाटलें. तारिणीलाही एक प्रकारचा संशय आला होता. नव्या पुस्तकाची चर्चा करण्यासाठीं तिनें आपण होऊन गोपीनाथला केव्हांच बोलावलें नव्हतें. तो रोज येत असे, सहज गोष्टी निघत आणि तितकीच सहज चर्चा होई. त्यानें शरयूला सांगितल्याप्रमाणें ती जबाबदारी कुणीच त्याच्या अंगावर टाकली नव्हती. गोपीनाथकडून कांहींतरी प्रतारणा होते आहे असें तारिणीला वाटलें खरें पण तिनें शरयूकडे तसें बोलून दाखवलें नाहीं. उलट ती म्हणाली, " आम्ही चर्चा करतों—बसल्या बसल्या चर्चा करतों. नवं पुस्तक लिहायचा अजून कांहीं मी निश्चय केला नाहीं. एकदां या परीक्षेच्या दिव्यांतून पार पडल्याशिवाय मी दुसरं पुस्तक लिहूं नये असं आईला वाटत असावं अशी माझी कल्पना आहे. तरीही आम्ही चर्चा करूं लागलों म्हणजे तीही या चर्चेत भाग घेते. अमुक एक गोष्ट कर किंवा अमुक करूं नकोस, असं आजवर तिनं मला केव्हांच सांगितलेलं नाहीं. तिनं पूर्ण स्वातंत्र्य दिलं आहे मला. त्या स्वातंत्र्याचा गैरफायदा मी केव्हांच घेणार नाहीं. अगदीं बारकाईनं मी तिचं मन अजमावीत असतें. मोठा खोल आहे तिचा स्वभाव. म्हणूनच तिचं मन अजमावयाला मला देखील फार कठीण जातं. पण या बाबतींत मात्र माझी खात्री आहे. एकदां डिग्री घेतल्याशिवाय यापुढं मी कांहींच लिहूं नये असं तिचं खास मत आहे. ही सारी आमच्या चंपामाईची हूल आहे. भलताच अभिमान बाळगते ती माझ्याबद्दल. परीक्षा पास व्हायच्याऐवजीं मी आणखी एक पुस्तक लिहून माझी आणखी कीर्ति व्हावी, असं वाटत

असतं तिला. तशी ती दूरदर्शी असती तर आज कां तिची अशी आबाळ झाली असती ? माझ्यापायीं आजवर तिनं किती मोठा स्वार्थत्याग केला आहे ! किती देह झिजवला आहे माझ्यासाठीं ! आज माझं म्हणून जें कांहीं आहे तें सारं तिला बळकावून बसतां आलं असतं—पण माझ्यापायीं ती आपला स्वार्थ विसरली होती. आज ती आमच्या आश्रयाला आहे पण तिनं मनांत आणलं असतं तर स्वत: गबर होऊन आम्हालाच तिची पायधरणी करावी लागली असती किंवा दारोदार भीक तरी मागावी लागली असती. अशी खुळी आहे तुम्हा लोकांची जात ! म्हणूनच मला तुझी मोठी भीति वाटते—" बोलतां बोलतां तारिणीचा गळा दाटून आला. चंपेवर तिचें फार प्रेम होतें. चंपाही तिच्यासाठीं सारा जीव टाकून बसली होती. म्हणूनच तिच्या समाधानासाठीं पुस्तक लिहिण्यासाठीं चर्चा करायचा ती नुसता आव आणीत होती. उघडपणें शरयूला तसें सांगणें तिला इष्ट वाटलें नाहीं म्हणूनच बोलतां बोलतां तिनें असें विषयांतर केलें.

तारिणीचें तें भाषण ऐकतांना शरयूलाही गहिंवर आला होता. तशाच दाटल्या वाणीनें ती म्हणाली, " मोठी विलक्षण माणसं आहांत तुम्हीं. मला कांहींच कल्पना नव्हती. आमच्या जातीचा प्रश्न आला कीं प्रत्येकजण शिव्याशाप देतो. त्यांतून कुलीन बायकांची जात तर आमच्या जातीच्या नांवानं बोटं मोडीत असते. पण इथं तर हा अगदींच विलक्षण प्रकार पहातेंय मी. चंपूताईचं न् माझ्या आईचं दूरचं कांहीं नातं आहे वाटतं. अशा लांबून लांबून मावसबहिणी होतात वाटतं त्या. मधून मधून ती येतेही आमच्याकडे. पण तिथं यांतलं कधींच कांहीं बोलत नाहीं. म्हणूनच मला आजवर कांहीं कल्पना नव्हती. पण गोपीनाथनं हें मला कां सांगू नये ? "

" त्याला कुठं ठाऊक आहे ? " तारिणी म्हणाली, " तो यायचा तसा येतो, बोलायचा तसा बोलतो नि निघून जातो. मला वाटतं, आमच्या घरचा हा प्रकार सुद्धां त्याला माहीत नसेल. माझ्या जन्मापूर्वी फार चर्चा होत असे आमच्याबद्दल—आई तसं सांगत असे—पण आतां कुणाच्याच ध्यानीं कांहीं येत नाहीं—इतकीं आम्ही एकमेकांत मिसळून गेलों आहोंत. "

" तेंही खरंच आहे, " शरयू म्हणाली, " आम्हाला तरी कुठं काय कल्पना होती ? बरं झालं आतां हें कळलं—अन् बरं झालं कीं माझी ही हकीकत तुला कळली. कॉलेजांत पोरं थट्टा करतात. ती थट्टा थट्टेवारी नेऊन मी आजवर

दिवस काढले. मी थट्टेवारी नेत होतें म्हणूनचं तुला कांहीं कळलं नाहीं. गोपीनाथही कधीं कुठं या गोष्टीचा उल्लेख करीत नाहीं. कॉलेजच्या वातावरणांत ज्या प्रेमाच्या गोष्टी निघतात तसला कांहीं आमचा हा संबंध नाहीं. लहानपणापासून आम्ही एकाजागीं खेळलों—एकाजागीं वाढलों—तो एकलकोंडा—मलाही कुणी जवळ येऊं देत नव्हतं—जगावेगळे झालेले दोन जीव एका जागीं आले. एकमेकांचीं सुखदुःखं एकमेकांशीं बोलूं लागले. त्यानं हृदयाची ओढ वाहूं लागली, ' मी तुझ्यावर प्रेम करतें, तूं माझ्यावर प्रेम कर ' असली वेडगळ भाषा आम्ही कधींच बोललों नाहीं. बोलतां बोलतां गोष्टी निघत—बोलतां बोलतां मन मोकळं होई—बोलतां बोलतांच त्यानं एक दिवस बोलून टाकलं,—प्रेम आहे म्हणून नव्हे, लग्न करायचं म्हणून—मीही होय म्हटलं—" एक मोठा सुस्कारा सोडून ती एक क्षणभर थांबून म्हणाली, " अन् आतां हें असं होऊं लागलं ! " तिच्या डोळ्यांतून टच्कन् पाणी आलं.

" कांहीं भिऊं नकोस शरयू , " तारिणी म्हणाली, " माझी मी अगदीं सावध आहें. प्रेमाच्या गोष्टी मी माझ्या कादंबरींतून लिहिल्या आहेत खऱ्या पण हीं प्रेमाचीं ढोंगं मला आवडत नाहींत. हें माहीत होतं म्हणूनच माझ्या आईला माझी ती कादंबरी आवडली नाहीं. ढोंगाचा तिला मोठा तिटकारा आहे. लेखक म्हणून लोकप्रियता मिळवण्यासाठीं सुद्धां माणसानं आपल्या मनाविरुद्ध कांहीं लिहूं नये असं ती रोज म्हणत असते. मलाही तें पटतं. तरीही मी ढोंग केलं. माझं पुस्तक लोकांना आवडावं म्हणूनच मी त्या प्रेमाच्या गोष्टी लिहिल्या—अगदीं माझ्या मनाविरुद्ध लिहिल्या. आतां मला पश्चात्ताप होतो आहे ! अन् म्हणूनच मी सध्यां कांहीं लिहायचं नाहीं असा निश्चय केला आहे. "

हें विषयांतर झाल्यामुळें शरयू आपलें दुःख क्षणभर विसरली. जें कांहीं बोलायचें होतें तें आतां बोलून झालें होतें. तारिणीला अज्ञात असलेल्या साऱ्या गोष्टी आतां शरयूनें सांगून टाकल्या होत्या. त्या आत्मनिवेदनाच्या पायीं पूर्वी दूर असलेलीं दोघींचीं अंतःकरणें आतां अगदीं जवळ आलीं होतीं. एक प्रकारचा आंतरिक जिव्हाळा दोघींच्या अंतःकरणांत त्या दिवशीं नव्यानेंच उद्भवला. स्त्रीजातीला स्वाभाविक असलेल्या वात्सल्याची ती एक लहानशी चुणुक होती.

शरयू निघून गेल्यावर तारिणी स्वतःशींच विचार करूं लागली. यापूर्वी

गोपीनाथबद्दल तिचा कोणत्याच प्रकारचा पूर्वग्रह नव्हता. एक कॉलेजांतला विद्यार्थी, प्रसंगवशात त्याची ओळख झाली, त्या ओळखीचें स्नेहांत रूपांतर झालें—ज्याप्रकारें आजवर तिनें कोणत्याच विद्यार्थ्याशीं कसलेंच नातें जोडलें नव्हतें, तें अकृत्रिम स्नेहाचें नातें सहजासहजी जोडलें गेलें.

एक नवा संबंध जोडला गेला पण तो दुःखाला कारणीभूत होणार कीं काय अशी शंका तिला उत्पन्न झाली. आजवर कोणत्याच पुरुषाशीं तिचा परिचय झाला नव्हता—परिचय करून घेण्याचा तिनें प्रयत्न केला नव्हता—परिचय करून घेण्याचा जे कुणी प्रयत्न करीत त्यांना ती झिडकारीत आली होती. म्हणूनच या परिचयाबद्दल तिची कांहीं विशिष्ट भावना झाली होती.

त्या भावनेवर आघात झाला असें तिला वाटलें. पुरुषांचा परिचय नसल्यामुळें पुरुषीवृत्तीचा आणि भावनेचा तिला अनुभव नव्हता—अंदाजही नव्हता. तसा अंदाज घेण्याचा तिला कधीं प्रसंग आला नव्हता. अकल्पित रीतीनें तिच्या आयुष्यांत हा एक नाट्यप्रसंग निर्माण झाला असें तिला वाटलें. गोपीनाथच्या वृत्तीबद्दल तिला संशय येऊं लागला. शरयूची फसवणूक करायची नवीनच वृत्ति त्याच्या ठायीं उत्पन्न झाली आहे कीं काय अशीही तिला शंका आली. शरयूला सोडून त्याची नजर आपल्याकडे तर वळूं लागली नसेल ना, असेंही तिला क्षणभर वाटलें.

ज्या तिच्या उद्गारामुळें गोपीनाथच्या वृत्तींत हा फरक पडला होता ते उद्गार अगदीं सहजासहजीं तिच्या तोंडून निघून गेले होते, म्हणूनच आज तिला ते आठवत नव्हते. त्या उद्गारांचा हा परिणाम आहे असें जर तिला कळलें असतें तर कोणत्या वृत्तीनें ते उद्गार आपल्या तोंडून निघाले याची सहीसही फोड करून तिनें गोपीनाथचा भ्रम दूर केला असता. पण ते उद्गार काढल्याची जाणीवच तिच्याठायीं नसल्यामुळें गोपीनाथची ही वृत्ति पुरुषसुलभ प्रवृत्तींतून निघाली आहे असें तिला वाटलें आणि त्याच अंदाजानें ती पुढले बेत आखूं लागली.

स्त्रीसुलभ जिज्ञासा तिच्या हृदयांत जागी झाली होती. तरूण स्त्री तरूण पुरुषाला अगदीं हातोहात खेळवीत असते—उंदराला मारण्यासाठीं मांजर जसें त्याला खेळवीत असतें त्याच कठोर स्वार्थाची ती वृत्ति असते—तीच वृत्ति आज तारिणीच्या हृदयांत जागी झाली होती. गोपीनाथच्या स्वभावाचा तिला अंदाज घ्यायचा होता. शरयूबद्दलचें त्याचें प्रेम कोणत्या प्रकारचें होतें हें

निश्चित ठरण्यासाठीं त्याला घटकाभर खेळवून पाहण्याची लहर तिच्या अंतः-करणांत उगवली. त्या वृत्तींत दुष्टपणा नव्हता, तसाच दुराग्रहही नव्हता. कांहीं वेळ त्याला जरा नाचवावें, अंदाज घ्यावा आणि त्याची खरी वृत्ति उघडकीला आली, कीं तितक्याच खेळीमेळीनें सारा प्रकार त्याला उघड करून सांगावा असा तिचा इरादा होता. त्याची फजिती व्हावी असें तिला वाटत नव्हतें, त्याचप्रमाणें शरयूचा घात व्हावा असेंही तिला वाटत नव्हतें. शरयूच्या कल्याणासाठींच ती हा डाव खेळणार होती. आपण एक नाटक लिहीत आहोंत, त्या नाटकांतील कांहीं नाट्यप्रसंग आपण आंखले आहेत आणि त्या आंखणीप्रमाणेंच ते घडून येणार आहेत अशी कल्पना करून तिनें हा खेळ खेळायचें ठरवलें होतें.

माणसाच्या कल्पनेंतून निर्माण होणारे प्रसंग माणूस ज्यावेळीं वाङ्मयाच्या द्वारें आंखतो त्यावेळीं त्या निर्मितीचा तो स्वतःच विधाता असतो. निसर्गाशीं झगडतांना माणूसप्राण्याचा हा विधातेपणा केव्हां केव्हां कसा पांगळा पडतो याची तिला कल्पना नव्हती. म्हणूनच बालसुलभ वृत्तीनें हा खेळ खेळायला ती प्रवृत्त झाली होती.

पण हा खेळ विस्तवाशीं होता हें तिला माहीत नव्हतें.

---

## ५ बदल

अलिकडे गोपीनाथचा नूर एकदम बदलला होता. शरयूला जरी त्यानें अगदींच तोडून टाकलें नव्हतें तरी पूर्वीप्रमाणें तो आतां तिच्याकडे फारसा येत जात नव्हता. शरयूसुद्धां या त्याच्या वर्तनाची फारशी पर्वा करीत नव्हती. आपल्यापरीनें तिनें आपल्या मनाशीं कसलीतरी खूणगांठ बांधली होती आणि तिला अनुसरून ती वागत होती.

तारिणीपेक्षां गोपीनाथ अलिकडे शारदाबाईच्या बैठकींतच जास्त वेळ असे. आजपर्यंत नव्या विचाराच्या नव्या माणसाशीं शारदाबाई फारशी मिसळली नव्हती. इंग्रजीचा संपर्क नसल्यामुळें या नव्या लेखकांचा परिचय होणें देखील तिला मुष्किलीचें झालें होते. गोपीनाथबरोबर असे कांहीं नवे लेखक आले तेव्हांच तिला ही जाणीव उत्पन्न झाली.

हे नवे लेखक ज्या ज्या लेखकांचीं नांवें घेत, ज्या ज्या पुस्तकांतील कथांचा किंवा अवतरणांचा उल्लेख करीत, ते लेखक आणि ती पुस्तकें तिला सर्वस्वी अपरिचित होतीं. आपण ज्या व्यक्तीशीं बोलत आहों त्या व्यक्तीला इंग्रजी भाषा येत नाहीं याची या लेखकांना मुळींच दखलगिरी नसे. जशी कांहीं साऱ्या लोकांची इंग्रजी ही मातृभाषा आहे अशी कल्पना करून ते बोलूं लागले कीं शारदाबाईची त्रेधा उडे.

तिनें एक दोन वेळ त्यांना सुचवलें. ती सूचना मिळाल्यावर कांहीं वेळ केवळ मराठींत बोलायचा त्यांनीं प्रयत्न केला. पण शेवटीं गाडें मूळपदावर येई. शारदाबाईला असें दिसून आलें, कीं या लोकांना वाक्येंचीं वाक्यें इंग्रजींतून बोलल्याशिवाय आपले कांहीं विचार प्रदर्शित करतांच येत नाहींत—त्यांनीं मराठी बोलायचा प्रयत्न केलाच तर चाळीस टक्के इंग्रजी शब्द वापरल्याशिवाय त्यांना बोलतांच येत नाहीं.

या नव्या जवानांच्या सहवासांत शारदाबाईला दिसून आलें, कीं स्वतःच्या बुद्धीनें विचार करायची शक्ति या लोकांत राहिलेलीच नव्हती. कुठल्यातरी लेखकाचे, तत्त्वज्ञाचे, नाटक किंवा कादंबरीकाराचे विचार सांगितल्याशिवाय त्यांना कांहीं बोलतांच येत नसे. नवीन विचारसरणीसाठीं परदेशी वाङ्मयाचा अभ्यास केल्याशिवाय कोणत्याही प्रकारचें लेखन करतांच येत नाहीं असा या नव्या लेखकांचा ठाम सिद्धान्त होता. जेवढें म्हणून कांहीं नवीन आहे तेवढें सारें परदेशाच्या कुठल्यातरी भागांतून आलें आहे—परदेशी विचाराच्या अधिष्ठानावर आधारलेलें आहे—असाच त्यांचा दावा होता.

शारदाबाईला तें पटत नव्हतें. परदेशी वाङ्मयाचा तिनें मुळींच अभ्यास केला नव्हता. परदेशी विचारसरणीचा तिला यत्किंचितही परिचय नव्हता. मराठी भाषेंत जीं जीं कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं होतीं तेवढीं सारीं तिनें वाचलीं होतीं. गुजराती आणि हिंदी वाङ्मयाचा देखील तिनें चांगलाच अभ्यास केला होता. या साऱ्या वाङ्मयांतून जेवढे कांहीं परदेशी विचार आले होते तेवढेच तिच्या परिचयाचे होते. नव्या नव्या तत्वज्ञानांचीं परदेशी वाङ्मयांतील पुस्तकें वाचल्याशिवाय जें जें कांहीं कळत नाहीं, तेवढेंच तिला माहीत नव्हतें.

आणि अशीं पुस्तकें तर फार होतीं. त्या अशा अधिकृत पुस्तकांचीं मराठी भाषेंत भाषांतरें झालेलीं नव्हतीं. म्हणूनच या नव्या लेखकांशीं बोलतांना तिची

वाचा कुंठीत होई. नवे नवे पारिभाषिक शब्द ऐकून तिचा जीव घोंटाळयांत पडे. त्या लेखकांशीं आपल्यापरीनें संभाषण चालू ठेवण्याचा प्रयत्न ती ज्या-वेळीं करीत असे त्यावेळीं आपल्यांत कांहींतरी उणीव आहे असें तिला तीव्रतेनें जाणवल्यावांचून रहात नसे.

असें होतें तरीही तिचें वाङ्मय प्रतिगामी स्वरूपाचें आहे असा आरोप तिच्यावर कुणीच केला नव्हता. इंग्रजी वाङ्मयाच्या अभ्यासाच्या अभावीं तिच्या वाङ्मयांत कोणतीच उणीव आली नव्हती. आजवरच्या टीकाकारांनीं तिच्या लेखनावर टीका करतांना ही उणीव कधींच दाखवून दिली नव्हती. या उणीवेपायीं आपली बुद्धि पांगळी पडली आहे असें स्वत: लेखन करतांना देखील सुद्धां तिला कधीं जाणवलें नव्हतें—किंबहुना तिला इंग्रजी येत नाहीं हें सुद्धां पुष्कळशा टीकाकारांना माहीत नव्हतें. इंग्रजीच्या ज्ञानाच्या उणीवेमुळें तिच्या वाङ्मयावर कोणताच दुष्परिणाम झालेला नसल्यामुळें हे टीकाकार या बाबतींत अंधारांत राहिले होते.

गोपीनाथच्या संसर्गानें या बैठकी जसजशा वाढूं लागल्या तसतशी ही उणीव तिला आत्यंतिकतेनें भासूं लागली. एक या बैठकी तरी बंद केल्या पाहिजेत किंवा इंग्रजीचा अभ्यास करून हीं नवीं पुस्तकें तरी वाचलीं पाहिजेत असें तिला वाटूं लागलें.

आणि तसें करणें तर शक्य नव्हतें. या उतारवयांत इंग्रजी शिकायला आरंभ करून मोठमोठाले ग्रंथ अभ्यासण्याइतकें त्या भाषेवर प्रभुत्व मिळवायला जसा तिला अवधी नव्हता तसेंच सामर्थ्यही नव्हतें. गोपीनाथच्या परिचयानें निष्कारण आपल्या आयुष्यांत ही नवी खळबळ उत्पन्न झाली असें शारदाबाईला वाटूं लागलें.

या बैठकींत तारिणी ज्यावेळीं भाग घेई त्यावेळीं या वक्त्यांशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य तिच्या अंगी आहे असें पाहून शारदाबाईला मोठा अभिमान वाटे. मुख्य प्रश्न होता तो हाच, कीं या वादविवादामुळें कुणाचा कांहीं फायदा होत होता कीं नाहीं ! कोणत्याही प्रकारचे वादविवाद न करतां शारदाबाईनें आजवर आपलें लिखाण केलें होतें, तरीही त्यांत कोणतेंच वैगुण्य आलें नव्हतें. परदेशी वाङ्मयाचा परिचय झाला असून तारिणीनें जें पुस्तक लिहिलें, त्याच्यांत शारदा-बाईच्या दृष्टीनें अवास्तवतेचें जें बीज दिसत होतें तें या परदेशी वाङ्मयाच्या अभ्यासानेंच उत्पन्न झालें आहे कीं काय अशी शंका तिला येऊं लागली.

ज्या ज्या वेळीं ह्या बैठकी बसत त्या त्या वेळीं तारिणीनें त्या बैठकींना हजर रहावें असा गोपीनाथचा प्रयत्न असे. त्याच्या पूर्वीच्या स्वभावांत आतां केवढा तरी फरक पडला होता. पूर्वीचा एकांडेपणा जाऊन चारचौघांत मिसळण्यासाठीं तो आतां जिवाचें रान करीत होता.

ही चार चौघांची बैठक स्वतःच्या घरीं भरणें शक्य नसल्यामुळें आतां त्याचा सारा मुक्काम पुष्कळसा वेळ शारदाबाईच्या घरींच होत असे. परीक्षा जवळ आली असल्यामुळें तारिणी या बैठकींना हजर रहायचें जरी टाळीत असे तरी कांहीं ना कांहीं तरी प्रश्न उकरून काढून गोपीनाथ तिच्या अभ्यासाच्या खोलींतून तिला बोलावून आणी आणि बैठकींत भाग घ्यायला जवळ जवळ सक्ति करी. अशावेळीं तीही त्याला विरोध करीत नसे. स्वतःच्या उणीवेच्या जाणिवेनें यावेळीं शारदाबाईही गोपीनाथच्या बोलावण्याला दुजोरा देई, तेव्हां तारिणीचा नाईलाज होई.

बैठकींत जाणाऱ्या वेळाची भरपाई करण्यासाठीं तिला जास्त वेळ अभ्यास करावा लागे. अशा वेळींही गोपीनाथ तिच्या मदतीसाठीं धांवून येई. अभ्यासाच्या निमित्तानें अशा दोघांच्याच बैठका रोज होऊं लागत. त्या अशा बैठकीच्या वेळीं अभ्यासाखेरीज दुसरा कोणताच विषय जरी निघत नसे, तरीही गोपीनाथच्या जोडीदारीची दिवसेंदिवस तारिणीला जरुरी भासूं लागली.

यापूर्वी गोपीनाथला जें तिचें उत्तेजन मिळत होतें त्यांत तिचा अंतस्थ हेतु होता. त्या हेतूचा हळुहळु लोप होऊं लागला आणि गोपीनाथच्या सहवासाची तिला स्वाभाविक जरुरी भासूं लागली.

गोपीनाथनें शरयूशीं प्रतारणा केली होती हें ती मुळींच विसरली नव्हती. शरयूसुद्धां मधून मधून तिला भेटायला येत असे. पण त्यावेळीं गोपीनाथच्या कोणत्याच गोष्टी बोलत नसे कीं त्यांच्या बैठकींत भाग घेत नसे. ती अशी दूर कां रहाते म्हणून तारिणीनें कधींच गोपीनाथला विचारलें नाहीं कीं गोपीनाथनेंही तिला या बैठकींत ओढण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं.

त्या तिघांचा हा असा खोखोचा डाव सुरू होता. प्रत्येकजण प्रत्येकाला फसवीत होता आणि त्याबरोबरच नकळत स्वतःची फसवणूक करीत होता.

तितक्याच नकळत शारदाबाईदेखील या साऱ्या लपंडावांत अकारण भागिदार होऊन बसत होती.

चंपेच्या संसारी नजरेला हे सारे प्रकार येत होते. खरें पाहिलें तर या

गोपीनाथच्या टोळक्याच्या बैठकींत भाग घेण्याइतकें सामर्थ्य आणि ज्ञान तिच्याठायीं होतें. वाचेनें ती अबोल होती. त्या बैठका सुरू असल्या म्हणजे पलीकडल्या खोलींत बसून ती सारें कांहीं ऐकत असे. त्या ऐकण्याचा परिणाम तिच्या मनावर होई. शारदाबाईला खूष करण्यासाठीं गोपीनाथ हा बैठकीचा अड्डा जमवतो आहे असाच तिचा समज झाला होता. त्या समजाच्या अनुरोधानें या चर्चेला जेवढी किंमत द्यायची तेवढीच ती देत असे. तिला वाटे, शारदाबाईची उणीव ओळखून तिचा एकप्रकारचा पाणउतारा करण्या-साठींच गोपीनाथ हा घाट घडवून आणीत होता. आपल्या न्यूनाची जाणीव झाली, कीं भरपाईसाठीं शारदाबाई आपल्याकडेसच ओढली जाईल असें वाटून गोपीनाथ हे खेळ खेळत होता असें चंपेला वाटे. इंग्रजी भाषेच्या ज्ञानाच्या जाणिवेमुळें शारदाबाई जेव्हां पेचांत आल्यासारखी दिसे तेव्हां पुढें सरसावून आपण तिचा कड घेऊन भांडावें, असें देखील चंपेच्या मनांत येई. पण तितक्याच निग्रहानें अशावेळीं ती संयम दाखवीत असे.

अलिकडे चंपेने एक नवा उद्योग सुरू केला होता. या चर्चेच्या अनुरोधानें ज्या ज्या नव्या ग्रंथाचा उल्लेख होई त्यांचीं नांवें टिपून घेऊन ते ग्रंथ वाचायला तिनें सुरवात केली होती. शारदाबाईच्या तें ध्यानीं आलें. पैशाची मालकीण जरी शारदाबाई होती तरी जमाखर्चाचा सारा व्यवहार चंपेच्या हातीं होता. कोणत्या कामासाठीं तिनें किती पैसे खर्च केले हें पहाण्याची तसदी शारदाबाई केव्हांच घेत नसे. पण नवीं नवीं पुस्तकें आणून मोठ्या रात्रीपर्यंत जेव्हां ती वाचीत बसूं लागली तेव्हां शारदाबाईची जिज्ञासा जागी झाली. तिनें विचारलें तेव्हां चंपा म्हणाली, " मी आतां विद्वान व्हायचं ठरवलं आहे. तीं सारीं मोठीं मोठीं माणसं इथं येतात, मोठमोठ्या गोष्टी बोलतात जगाच्या उलाढालींतलीं व्यंग काढीत बसतात, तें पाहिल्यापासून मला देखील थोडीशी चीड येऊं लागली आहे. तुला इंग्रजी येत नाहीं, तरी तूं लिहितेसच आहेस. मला इंग्रजी चांगलं येतं पण मी अलिकडे वाचनाकडे सुद्धां दुर्लक्ष करून बसलें आहें. खूपखूप वाचावं असं पूर्वी वाटे. पण त्या साऱ्या गोष्टी कादंबऱ्या. आतां ही नवीं नवीं तत्वज्ञानं बोललीं जाऊं लागलीं आहेत—बोलतांना हे लोक तुला पदोपदीं अडवतात तें पाहून माझं रक्त सळसळून उठतं. मी त्यांच्या खिजगणतींत नाहीं. मी कोण आहें हें त्यांना माहीत आहे. माझ्यासारखीला इंग्रजी भाषेचा एवढा संस्कार असेल अशी

त्यांना कल्पना नाहीं. अन् मला वाटतं कीं ही कल्पनाही त्यांना येऊं द्यायची नाहीं. आतां माझ्यापरीनं मीही विद्वान् व्हायचं ठरवलं आहे—लेखिका व्हायचं ठरवलं आहे. वाचीतच कां—मी हल्लीं लिहीतसुद्धां असतें—स्वतंत्र नव्हे—भाषांतर. निवडक निवडक पुस्तकं मी आणलीं आहेत, अन् त्यांचं सारांशरूपानं भाषांतर करतें आहें. परिभाषेचे इंग्रजी शब्द त्या भाषांतरांतून मी तसेच ठेवून दिले आहेत—"

"कशाला हे उपद्याप करते आहेस ?" शारदाबाई म्हणाली, "संसाराचा हा बोजा उचलून घेतला आहेस तेवढा पुरे नाहीं का झाला ?"

"तुझ्यासाठीं !—" चंपा गहिंवरून म्हणाली, "तुझ्यासाठींच चालला आहे माझा हा उपद्याप. मला बघवत नाहीं—खोटया विद्वत्तेचा टेंभा मिरवणारीं हीं पोरं इथं रोज गोळा होतात, रोज चर्चा करतात—ती चर्चा करतांना तुझा पाणउतारा करावा असा जो त्यांचा डाव असलेला मला दिसतो, त्याची चीड आली आहे मला ! इंग्रजी शिकल्याशिवाय इंग्रजी कसं कळतं तें या चटोर पोरांना एकदां दाखवून द्यायचंय मला. तारिणीलासुद्धां कळत नाहीं. ती देखील त्यांच्यांतच मिसळते. त्यांच्यासारखीच बोलते. चार चौघांत आपल्या आईला कमीपणा येतोय हें सुद्धां तिला कळत नाहीं. माझ्यानं तें पहावत नाहीं. काय करायचंय इंग्रजी पुस्तकं वाचून. स्वतंत्र विचाराच्या जोरावर आजवर तूं जें कांहीं लिहीलं आहेस, ते काय थोडं आहे ? त्यांत काय नवे विचार नाहींत ? त्यांत काय नव्या जाणिवा नाहींत ? स्वतंत्र बुद्धीची झळाळी काय कमी दिसतेय तुझ्या लिखाणांतून ? मला माहीत आहे, हें सारं चांगलं कळतं आहे या लोकांना—म्हणूनच त्यांना तुझा मत्सर वाटतो—"

"यांना ?" शारदाबाई हंसून म्हणाली, "यांना ? अन् माझा मत्सर ? काय वेड्यासारखं बोलते आहेस !"

"हो, हो, मत्सरच वाटतो." चंपा दांतओंठ खाऊन म्हणाली, "म्हणूनच तुझा असा पाणउतारा करताहेत हे. ज्ञानाचा सारा गाभा काय तो इंग्रजी भाषेंतच आहे—इंग्रजी नाहीं म्हणजे ज्ञान नाहीं—असा जो आज सिद्धांत होऊन बसलाय, तोच खुंटा हालवून बळकट करायचा आहे या लोकांना ! तो खुंटा मुळांतूनच उपटून काढायचा आहे मला ! दिपवून टाकलं पाहिजे या लोकांना ! काजवे आहेत हे सारे. इवल्याशा प्रकाशानं लुकलुकून पुर्णिमेचं चांदणं गिळूं पहाताहेत अन् हें आपल्या तारूला कसं कळत नाहीं याचंच मला आश्चर्य वाटतं. कशाला

हा अड्डा मांडलायस उगीच. बरीं चांगलीं सुखांत होतों. एकमेकांच्या तोंडाकडे पहात समाधानानं रहात होतों. तूं लिहीत होतीस, तारू आपला अभ्यास करीत होती, मी हा संसार संभाळीत तुम्हा दोघींची आई होऊन बसलें होतें. तें उसनं आईपणच नडतंय मला. पोटच्या गोळ्याकडे तूं पहात नाहींस ! कशाला येतोय हा गोपीनाथ इथं ? कुठं होता हा यापूर्वी ? तें मेलं नाटक झालं नि हा एकजण घरांत घुसला !—"

" कुणी मत्सरी असलं तर ती तूंच आहेस !" शारदाबाई म्हणाली, " प्रत्येक ठिकाणीं तुला संशय दिसतो. काय झालं गोपीनाथ आला म्हणून ? समज, त्याच्या मनांत कांहीं असेलही—तारिणीबद्दल त्याला कांहीं वाटत असेल—तर काय बिघडलं त्यांत ? चांगला बुद्धिवान आहे, कुटुंबवत्सल घरांत वाढलेला आहे. मला तरी त्याच्यांत कांहीं व्यंग दिसत नाहीं. दुसरं असं पहा, लेखिका म्हणून माझी प्रसिद्धि झाली आहे. साहित्यसंमेलनांतून जरी मी मिरवूं लागलें नाहीं, तरी गेल्या पांचसहा वर्षांत माझ्या नांवाशिवाय साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांचीं भाषणं पुरीं होत नाहींत. बोलतां येत नाहीं, व्याख्यानं देण्याइतका धीर नाहीं, म्हणूनच या सभासंमेलनांना मी जात नाहीं. तेवढीच उणीव आहे माझ्याठायीं. हीं माणसं इथं जमतात, खूपखूप बोलतात, खूपखूप चर्चा करतात—मलाही त्यांच्याबरोबर बोलावं लागतं—अन् बोलावं लागतं म्हणूनच मला आणखी विचार करावा लागतो. विचार करतांना विचार वाढतात. लहान लहान फांद्यांचे मोठे वृक्ष होतात. त्या वृक्षांची वाढ करायची आहे मला. पाणउतारा कसला त्यांत ? ती उणीव आहेच ! नाहीं म्हणून चालायचं नाहीं. ती उणीव भरून निघायचेच हे उपाय आहेत. यापुढं व्यासपीठावर उभं रहायचंय मला त्याची ही अशी पूर्वतयारी चालवली आहे मी. अभ्यास करायचा म्हणजे कुणाच्या तरी पायाजवळ बसावं लागतं. मी बायकोमाणूस—एक विधवा—त्यांतून विद्वानांच्या दृष्टीनं अशिक्षित—तो डाग धुवून काढायचा आहे असं मी म्हणत नाहीं—पण तो डाग लावायची कुणाला छाती होऊं नये एवढं मोठं व्हायचं आहे मला ! म्हणूनच मी हा पाणउतारा सहन करतें आहें. आतां ही कामगिरी पत्करलीयस—केवढा आनंद झाला मला ! तारिणीला सांगावं म्हणून पुनः पुनः मनांत येई. पण हा माझा स्वभावच आड येतो. याचना करणं मोठं कठीण जातं मला. तुला म्हणूनच तें कळलं आणि म्हणूनच तूं या उद्योगाला लागलीस. किती

किती उपकारांच्या ओझ्याखालीं मला चिरडून टाकायचा विचार आहे तुझा ?—" तिचा गळा दाटून आला.

चंपेलाही भडभडून आले. शारदाबाईला घट्ट कवटाळून ती म्हणाली, "आपण दोन कां आहोंत ? एकच जींव आहे ना आपणा दोघांचा ? एकाच जिवासाठीं ना आपण दोघं झगडत जगून राहिलों आहों ? उपकाराचं नांव काढशील तर तुझ्या पायाशीं डोकं आपटून प्राण देईन—" पुढें तिच्या तोंडांतून शब्द निघेना !

एकमेकांच्या मिठींत त्या दोघीही कवटाळल्या गेलेल्या असतांना तारिणी आंत आली. तें दृश्य पाहून जागच्याजागीं थबकली. चट्कन तिच्या तोंडून घाबरट उद्गार निघाला, " काय झालं ? "

दोघी दोन बाजूला झाल्या. आसवांच्या हिऱ्यामोत्यांनीं खचलेल्या त्या दोघींच्या चेहऱ्यावर हंसण्याचा प्रकाश चमकला. त्या प्रकाशाच्या चमकेनें अगदीं नकळत—अगदीं निष्कारण तारिणीचे डोळे ओलावले. काय झालें तें तिला माहीत नव्हतें. तिनें विचारलेल्या प्रश्नाचें तिला उत्तर मिळालें नव्हतें. नुसत्या पहात दोघीही उभ्या राहिल्या होत्या.

तारिणी घाबरली आणि तिनें परत विचारलें, " काय झालं ? "

" कांहीं नाहीं झालं ! " चंपा म्हणाली, " मोठ्या माणसांना केव्हां केव्हां पोरपण येतं—त्यांतलाच प्रकार आहे हा ! जुन्या आठवणी जाग्या झाल्या कीं जुनीं आसवं डोळ्याशीं येतात. तीं असलीं पुराणीं आसवं दिसलीं तरी हंसऱ्या मुलांनी घाबरूं नये. लहानपणीं नव्हतीस का पहात असंच ? तेव्हां कुठं कांहीं घाबरली नाहींस ? तेव्हां कुठं कां विचारलं नाहींस ? "

" तेव्हां मी लहान होतें. " तारिणी म्हणाली, " मला कांहीं कळत नव्हतं."

" अन् आतां तरी काय कळतंय ? " चंपा डोळे पुसून हंसत हंसत म्हणाली, " लहानपणीं होतीस तितकीच खुळी आहेस अजून. एवढी कुठं पोपटपंची केली, चार परीक्षा दिल्या अन् इंग्रजी बोलतां येऊं लागलं कीं माणूस कांहीं शहाणं होत नाहीं. पोपटाचीच अक्कल ती ! तीच तुझी आई पहा, शिकली आहे का इंग्रजी ?. दिल्या आहेत का कुठल्या परीक्षा हिनं ? पण तिचींच पुस्तकं तुम्हांला शिकावीं लागताहेत ना आज ? वेडी आहेस ! जा आतां. आज पाह्यलंस म्हणून तुला वाटलं—पण आमचं हें रोजचंच चाललं आहे. "

" नाहीं !—" तारिणी म्हणाली, " मला फसवूं नकोस. खास कांहीं तरी

झालंय. तुझा चेहरा हा असा झालेला—आईचा चेहराही तेंच सांगतोय—किती हंसून दाखवलंत तरी अंतरांतला पाझर कांहीं कुठं लपत नाहीं. दाबून ठेवला तरी फुटून बाहेर पडतो आहे तो. काय झालं आहे आई ?"

"खरोखरच कांहीं झालं नाहीं !" शारदाबाई म्हणाली, "त्या आपल्या आमच्या कर्मकथा चालल्या आहेत. जुन्या आठवणींचा जाळ तेवला कीं गारठलेलं मन असंच पाझरूं लागतं !"

तारिणीचें समाधान झालें नाहीं. दोघीही आपल्यापासून कांहींतरी चोरून ठेवताहेत असा तिला संशय आला.

हे असले देखावे तिनें पाहिले होते—पण ते फारा वर्षांपूर्वी. त्यावेळीं त्या दोघीही अपंग होत्या. भविष्यकालाविषयीं साशंक होत्या. कुणाचाच आधार नसल्यामुळें एकमेकांना कवटाळून सुखादुःखाचीं टिपें गाळीत त्या दिवस कंठीत होत्या.

आतां ते दिवस गेले होते. भविष्यकालाविषयीं शंका राहिली नव्हती. संपत्ती पूर्वीचीच होती. पण आतां कीर्तिचीही जोड लाभली होती. मुलगीही कीर्तिमान होईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. मग या वेळीं यांनीं कां हीं आसवें गाळावीं ?

तिची खात्री होती, कीं ते आनंदाश्रु नव्हते. आनंदाचा म्हणायला तसा कोणताच प्रसंग आज घडून आला नव्हता. मग कां हीं आसवें ? कां ह्या गळ्यांतल्या मिठ्या ? कोणत्या दुःखाच्या भारानें ?

स्वतःच्या मनाचा ठाव ती घेऊं लागली. आपल्याकडून कांहीं चूक झाली का ? कुठें उपेक्षा झाली का ? कुठें अंतराय पडला का ? मग कां हें असें झालें ?

त्या दिवसापासून ती अस्वस्थ झाली—सावध झाली. डोळ्यांत तेल घालून प्रत्येक हालचाल बारकाईनें पाहूं लागली.

त्याच वेळीं चंपेचा उद्योगही तिच्या नजरेला आला—पण तो काय उद्योग होता याची अचुक कल्पना तिला आली नाहीं. तिनें सांगितल्याशिवाय विचारण्याइतका चौकसपणा दाखवून, नकार मिळाला तर मानहानी होईल या भयानें ती उगीच राहिली.

पण चंपा अहोरात्र वाचते आहे, अहोरात्र कांहींतरी लिहिते आहे हें पाहून ती चकित झाली. लेखनाच्या रोगाचे जंतू या साऱ्या घरांतच शिरले का ? मायलेकीबरोबर स्पर्धा करण्यासाठीं का चंपा लेखक व्हायचा प्रयत्न करते आहे ?

तिच्या मनाची चलबिचल झाली. चंपेच्या या नव्या अवताराचें रहस्य तिला उमगेना. विचारायचेंही धैर्य होईना.

अशा मनाच्या खळबळीच्या अवस्थेंत या तीन बायकांच्या संसारांत गोपीनाथखेरीज आणखी एक पांचवी व्यक्ति पदक्षेप करती झाली.

---

## ६ पालट

वाङ्मयमंडळाचा चिटणीस मधुकर एके दिवशीं अकस्मात् तारिणीच्या घरीं आला तेव्हां ती आश्चर्यचकित झाली. नाटकाचा प्रयोग झाल्यापासून ज्या माणसानें आपल्याशीं एकप्रकारचें वैर धरलें होतें, येईल ती संधी साधून पदोपदीं कॉलेजांत आपला पाणउतारा करायचा प्रयत्न केला होता, भलभलत्या कंड्या पिकवायलाही ज्यानें कमी केलें नव्हतें, तो हा मधुकर घरीं आलेला पाहून तिला आश्चर्यापेक्षां कौतुकच जास्त वाटलें.

आल्याबरोबर त्यानें एकदम आपलें बदललेलें धोरण स्पष्टपणें बोलायला सुरवात केली. तो म्हणाला, " विश्वास ठेवा कीं ठेवूं नका, आजपर्यंत माझ्या हातून जें जें कांहीं घडलं त्याजबद्दल मला पश्चात्ताप होतो आहे, हें मीं अगदीं खुल्या दिलानं आज सांगतों आहें. ती चुरस होती. त्या चुरशीपायीं हट्टाला पेटून मी तुमची बदनामी करीत होतों. तुम्ही चिडून जावं, माझ्याशीं वादविवाद करावा, उलट वाद घालायची संधी मला मिळावी आणि मग त्या वादांत तुमचा पाणउतारा करावा असा माझा उद्देश होता, हें सांगायला आज मला मुळींच लाज वाटत नाहीं. त्या माझ्या वागण्याची प्रतिक्रिया झाली नाहीं. माझ्यावर उलटा डाव करायचा तुम्ही केव्हांच प्रयत्न केला नाहीं. माझी अपेक्षा फुकट गेली. मला जास्त चीड येऊं लागली, तेव्हां मी तुमची बदनामी करायला सुरवात केली. तीही नुसती ईर्ष्याच होती. तरीही तुम्ही बधलां नाहीं. आतां मला त्याची लाज वाटूं लागली आहे. मनाला झालेला पश्चात्ताप उघड बोलून दाखवण्यासाठीं आज मी मुद्दाम आलों आहें. "

" काय कारण झालं हा पश्चात्ताप व्हायला ? " तारिणीनें अगदीं शांतपणें विचारलें, " अन् बोलावं असं तरी कां वाटलं तुम्हांला ? "

" कां वाटलं ! " स्वतःशींच बोलल्यागत मधुकर म्हणाला, " कां पश्चात्ताप झाला ! ती दुष्टाव्याची लहर आली होती तसाच हा पश्चात्ताप झाला आहे असं मात्र समजूं नका. चुरशीनं ती वृत्ति उत्पन्न झाली होती. ती चुरस संपली—चुरस संपली तरीसुद्धां आमच्या झालेल्या फजितीबद्दल कुठंतरी डूख राहिला होता मनांत. माझ्या वागण्याकडे दुर्लक्ष करून अगदीं बेफिकिरीनं तुम्हीं जेव्हां राहूं लागलांत तेव्हां माझी मलाच लाज वाटली. ती तुमची कादंबरी प्रसिद्ध झाली, मी ती वाचली, मला ती फार आवडली, त्याचवेळीं येऊन तुमचं अभिनंदन करावं असं मला सारखं वाटत होतं. पण अभिमान आड येत होता. त्यानंतर तें नाटकही प्रसिद्ध झालं. मुळापेक्षांसुद्धां तें भाषांतर किती सुंदर झालं आहे हें वाचतांना जेव्हां मला दिसून आलं, तेव्हां तर मी मेल्याहून मेला झालों. फुकट तुमच्याशीं विरोध केला असं वाटलं. इंग्रजी प्रयोगाचा हट्ट सोडून मराठी प्रयोगांत सामिल झालों असतों तर किती छान झालं असतं, असं सुद्धां वाटलं. पण त्यावेळीं मी मत्सरानं जळत होतों. एक लेखक म्हणून मी मिरवीत होतों. उगीचच माझ्या लेखनाचा अभिमान धरीत होतों. आतां हीं तुमचीं पुस्तकं पाहिलीं तेव्हां तो माझा अभिमान जिथल्या-तिथं गारठून सारखी मनाची टोंचणी सुरू झाली. केवढा गाढवपणा केला मी, असं सारखं वाटूं लागलं. खरोखरच केवढी संधी घालवली ही मी ! त्याचवेळीं मी तुमच्याशीं सहकार्य केलं असतं तर आज आपला सलोखा केवढा तरी वाढला असता. निदान तें वैर तरी उत्पन्न झालं नसतं. मनोदेवतेची डांचणी सुरू झाली कीं माणूस एक मुर्दाड तरी बनतो किंवा पांगळा तरी पडतो. ते दोन्ही अनुभव मी घेतले. आधीं मुर्दाड झालों होतों, आतां पांगळा पडलों आहें. मनांत आलं, एकदां जावं—मन मोकळं करून बोलावं—मग तुम्हांला बरं वाटो कीं वाईट वाटो ! या इथल्या वाङ्मयाच्या प्रपंचांत खोट्या मत्सरा-पायीं मला दूर रहाणं भाग पडलं आहे, तें पाहून माझं मन मला खातं आहे. जें सांगायचं तें सांगितलं—" बोलतां बोलतां तो गहिंवरून आला.

त्याची ती मनस्थिति पाहून तारिणीच्या मनावर चांगलाच परिणाम झाला. तीसुद्धां सद्‌गदित झाली होती. पण आपला हा दुबळेपणा त्याला दिसून येऊं नये म्हणून मन आणि वाणी घट्ट करून ती म्हणाली, " तुम्हीं उगीच मनाला लावून घेताहांत मधुकर ! खरोखरच माझ्या मनांत एवढंसुद्धां वैषम्य आलं नव्हतं. एकमेकांची बदनामी करायचे प्रकार कॉलेजच्या प्रपंचांत काय थोडे-

थोडके होतात ? मला तरी वाटतं, त्या बदनामींत अंतःकरणाचा पीळ नसतो. पोरकटपणाची ती एक कुरापत असते. याच नजरेनं मी या कॉलेजांतल्या उठाठेवींकडे पहात आलें आहें. झालं गेलं विसरून जा. मी विसरून जाईन असं म्हटलं असतं—पण जिथं मी कांहीं हिशेबींच घेतलं नव्हतं तिथं विसरून जायचं काय ?"

"थँक यू सो मच !" मधुकर भरल्या शब्दानीं म्हणाला, "खरोखरच मी तुमचा फार आभारी आहें—"

"आतां कांहींच बोलूं नका." तारिणी म्हणाली, "औपचारिक भाषण मला मुळींच आवडत नाहीं. ही आभारप्रदर्शनाची परदेशी वृत्ति माझ्या आईला तरी मुळींच पसंत नाहीं. तिच्या मताचा माझ्या मनावर परिणाम झालाय. आतां मागल्या गोष्टी कांहींच काढायच्या नाहींत."

तारिणीनें शारदाबाईशीं मधुकराचा परिचय करून दिला. त्यानें सारा पाढा पुन्हां शारदाबाईपुढें वाचला. तिच्याशीं बोलतांना तो मोठ्या अदबीनें बोलत होता त्याचा शारदाबाईवरही परिणाम झाला.

चंपेला मात्र हा सारा प्रकार आवडला नव्हता. सारी हकीकत तिला माहीत होती.

मधुकर बोलत होता तो अगदींच जरी लबाडीनें नव्हे, तरीपण त्याच्या त्या भाषणांत कांहींना कांहीं तरी डाव होता असें तिला वाटलें. तिनें तारिणीकडे तसें बोलून दाखवलें नाहीं. तारिणीच्या काय किंवा शारदाबाईच्या काय, मनावर जो परिणाम झाला होता तो ध्यानीं घेऊन ती स्वस्थ बसून राहिली. या वेळीं आपलें बोलणें त्या दोघींनाही पटणार नाहीं असें तिला वाटलें.

आणि तें खरें होतें. विशेषतः मनोभावनेची जी उत्कटता त्यावेळीं मधुकरानें दाखविली होती, पुन्हा पुन्हा जे गहिंवराचे कढ त्याला येत होते, ते इतके स्वाभाविक होते, कीं त्यांत लबाडीचा कांहीं अंश आहे असें कुणी सांगितलें असतें तरी तें त्या दोघींना पटलें नसतें.

तसें पाहिलें तर मधुकराच्या या वर्तनांत लबाडी मुळींच नव्हती. खरोखरच त्याला पश्चाताप झाला होता. पण तरुणांच्या हृदयांत स्वभावतःच दुराग्रह जागा असतो. मनांत उत्पन्न झालेल्या उच्च भावनेवर तो दुराग्रह परिणाम करणारा होऊं नये असाच प्रयत्न त्यानें केला होता. त्या प्रयत्नापोटीं कांहीं स्वार्थ होता कीं काय हें मात्र त्याला सांगतां आलें नसतें. स्वार्थाची प्रत्यक्ष जाणीव त्याच्या

अंतःकरणांत सुस्पष्टपणें उत्पन्न झाली नव्हती. गोपीनाथ तारिणीच्या घरीं वारंवार जातो, बरेचसे तरूण लेखक तिथें गोळा होतात, मोठमोठ्या विषयांवर रोज चर्चा चालतात, एकांडा शिलेदार असलेला गोपीनाथ आतां चार माण-सांत मिसळून तारिणीच्या कुटुंबांत आप्तासारखा वागतो आहे, हें पाहून त्याला कसेंसेंच वाटत होतें. ही गोपीनाथची जागा आपल्याला पटकावतां आली असती, अकारण ईर्ष्येला बळी पडून ती आपण घालवली—घालवली ती घालवली पण वर आणखी वैषम्य वाढवायचा प्रयत्न करून आपण जास्त जास्त दुरावत चाललों, ही आपली चूक झाली असें वाटून त्याला खंत वाटूं लागली होती. या घरांत घरोबा मिळवण्यांत कांहीं विशेष होतें असें एक लेखक या नात्यानें उत्पन्न झालेल्या वृत्तीमुळें त्याला वाटत होतें. अधिष्टित लेखकांचा अड्डा तारिणीच्या घरीं जमावा, गोपीनाथ तिथें असावा आणि आपल्याला तिथें जातां येऊं नये, हीच गोष्ट त्याच्या मनाला लागून राहिली होती. म्हणूनच त्यानें हा योग जुळवून आणला. स्वार्थाची कांहीं भावना निर्माण झाली असेल तर ती एवढीच, असा तो आपल्या मनाचा समज करून घेत होता.

तरीही त्याच्या मनाचें समाधान होत नव्हतें. ' आणखी कांहींतरी आहे—आणखी कांहीं तरी आहे—' पुन्हा पुन्हा त्याच्या मनाच्या तळकोपऱ्यांतून कुणीतरी त्याला सांगत होतें. तें ' आणखी कांहींतरी ' काय आहे याची स्पष्ट कल्पना करायला तो भीत होता. पण तें ' आणखी कांहीं तरी ' कुठें तरी लपून-छपून राहिलें होतें यांत तिळमात्र शंका नव्हती.

चंपेची नजर होती ती निराळीच. तिची भूमिका अतिवत्सल मातेची होती. तारिणी हेंच आपलें सर्वस्व—तें आपलें सर्वस्व कुणीतरी हिरावून नेईल अशी भीति तिला पदोपदीं वाटे. तारिणी आपली—ती आपलीच राहिली पाहिजे—ती कुणाची तरी झाली तर आपले प्राण कासावीस होतील—देहालासुद्धां सोडून जातील—असें तिला सारखें वाटत होतें. कृपणाच्या धनाप्रमाणें ती तारिणीला जपत होती. आपल्या हयातींत तरी ती कुठें खर्ची पडूं नये म्हणून ती सारखी तळपत राहिली होती.

असें जरी होतें, तरी ही वृत्ति ती त्या दोघींनाही दिसूं देत नव्हती. ती वृत्ति म्हणजे सुद्धां तिच्यालेखीं एक कृपणाचें धन झालें होतें.

ही हकिकत शरयूला कळली त्यावेळीं तिला फार आश्चर्य वाटलें. मधुकर

एवढा कमीपणा पत्करील अशी इतरांप्रमाणें तिलाही कल्पना नव्हती. ती हकीकत तिनेंच जेव्हां गोपीनाथला सांगितली तेव्हां तो अगदीं सुन्न झाल्या-सारखा तिला दिसला. क्षणभर तो कांहींच बोलेना असें पाहून तिनें विचारलें, " कां ? असा धक्का कसला बसला तुला ? "

" धक्का कसला बसायचा त्यांत ? " गोपीनाथ म्हणाला, " आश्चर्य वाटलं असं मी म्हटलं असतं पण यांत आश्चर्य वाटण्याजोगं कांहीं नाहीं. माणसाचीं मतं केव्हां कशीं बदलतात तें सांगतां यायचं नाहीं. पण तीं इतक्या लवकर बदलतात असं मात्र मला वाटलं नव्हतं. "

" इतक्या लवकर म्हणजे ? " शरयूनें विचारलें.

" इतक्या लवकर म्हणजे असं—" गोपीनाथ बराच गंभीर होऊन म्हणाला, " दोनच दिवसांपूर्वीची गोष्ट—दहापांच मंडळी गोळा झालेली असतांना त्या सर्वांच्या देखत त्यानं उघडउघड माझी टिंगल केली. शारदा-बाईच्या घरीं मी जातों याबद्दल त्यानं भलते धागेदोरे जुळवून माझ्यावर तितकेच भलभलते आरोप केले—"

" कसले आरोप केले ? " शरयूनें मधेंच विचारलें.

" आणखी कसले आरोप करणार ? " गोपीनाथ हिरवापिवळा होऊन म्हणाला, " कॉलेजांत आणखी कसले आरोप केले जातात ? सर्वांनीं मिळून माझी अगदीं हुर्रेवडीं केली. शब्दानं शब्द वाढेल म्हणून मी त्यांना कांहींच उत्तर दिलं नव्हतं, त्याचा त्या सर्वांनींच विपर्यास केला. एवढ्यानंच कांहीं थांबलं नाहीं—" असं म्हणून तो थांबला.

क्षणभर वाट पाहून तो बोलत नाहीं असं पाहून शरयू म्हणाली, " मग काय झालं पुढं ? "

" तुला माहीत नाहीं ? " गोपीनाथनें विचारलें, " कीं नुसता माझा अंदाज पहाते आहेस ? "

" मला काय माहीत असायचं ? अन् कसल्या बाबतींत ? " शरयूनें म्हटलें.

पुन्हां गोपीनाथ क्षणभर थांबला, " एवढ्या थरावर प्रकरण आलं तरी तुला माहीत नाहीं म्हणतेस. बरं. बरं. तुला कांहींच माहीत नाहीं असं मी धरून चालतों. अन् आतां माहीत नाहीं तर तुला सांगायचं कशाला उगीच ? "

" अशी कोड्याची भाषा काय बोलतोस ? " शरयू जरा चिडून म्हणाली, " खरोखरच मला कांहीं माहीत नाहीं. "

"मग ऐक तर—" गोपीनाथ म्हणाला, "दोनच दिवसांपूर्वी मधुकर माझ्या बाबांना भेटायला आला होता. जे आरोप त्यानं त्यावेळीं माझ्यावर केले होते त्याच आरोपांच्या धोरणानं तिखटमीठ लावून माझ्या बाबांना त्यानं कांहींतरी बनाव बनवून सांगितला. बाबांनीं मला विचारलं त्यावेळीं आहे ती खरी हकिकत मी त्यांना सविस्तर सांगितली. मी तुझ्याशीं प्रतारणा करतां आहें असा बाबांचा समज झाला होता—" तो क्षणभर थांबला आणि शरयूच्या डोळ्याला डोळा देऊन म्हणाला, " खरं सांग, यांत तुझा कांहीं हात नाहीं ?"

एकदम चिडून शरयू म्हणाली, " माझा हात ? कोणत्या बाबतींत ? माझा काय संबंध या प्रकरणांत ?"

" नाहीं—नाहीं !—नाहीं !"—गोपीनाथ घाबरटपणें म्हणाला, " उगीचच मला तसं वाटलं. अंदाजानं मी धागेदोरे जुळवीत गेलों. मी तारिणीच्या मागं घोंटाळतों आहें—नव्हे, तारिणीचं माझं लग्न व्हायचं ठरलं आहे, असं मधुकरनं माझ्या बाबांना सांगितलं. तें ऐकून बाबा अशा कांहीं प्रकारें बोलले, कीं मला वाटलं, या प्रकरणाची आधीं तुझ्याकडे चर्चा करून मग त्यांनीं मला तसं विचारलं असावं. म्हणूनच मला शंका आली. म्हटलं, कदाचित् तूं मधुकरची गांठ घेऊन त्याला विचारलं असशील—त्याला कांहीं बोलली असशील—त्या बोलण्यावरून त्यानं कांहीं अटकळी बांधल्या असतील अन् त्या अटकळींच्या जोरावरच शारदाबाईकडे जाऊन त्यानं ही नवी आघाडी उघडली असेल ! असं आपलं सहज मला वाटलं. नसेल तसं तर माझं कांहीं म्हणणं नाहीं. पण चोवीस तासांत माणसाचं मन एकदम इतकं पालटेल असं कुणाला कसं वाटावं ?"

शरयू कांहीं वेळ सुन्न होऊन स्वस्थ राहिली होती. सात्त्विक संतापानें तिच्या अंगाचा भडका उडाला होता. असा भलताच आरोप गोपीनाथनें आपल्यावर केला हें पाहून तिला जितकें वाईट वाटलें तितकाच उद्वेग उत्पन्न झाला. मोजक्याच चार शब्दांत सणसणीत उत्तर देऊन एकदम तोडून टाकावें असें तिच्या मनांत आलें होतें. पण तितक्याच निश्चयानें मनांतला तो उद्वेग आवरून धरून ती म्हणाली, " इतकं तुझं मन क्षुद्र असेल असं मला वाटलं नव्हतं गोपी. प्रत्यक्ष लग्न झालं नाहीं एवढंच—पूर्वी लहानपणीं मुलांमुलींचीं लग्नं होत होतीं, पतिपत्नीच्या नात्याची जाणीव न धरतां तीं एका जागीं रहात होतीं, तसंच हें आपलं आहे असं मी समजत होतें. मी हट्ट धरला असता तर कदाचित् यापूर्वीच आपलं लग्न झालं असतं. पण इथं कुणाचीच घाई

नव्हती. गुजराती लोकांसारखा हा ' विवाह ' झाला होता. लग्न व्हायचं तेवढं राहिलं होतं. यापलीकडे दुसरी कसलीही कल्पना केव्हांही माझ्या मनांत आली नाहीं—असं असतांना मी काय म्हणून असल्या भलत्या उठाठेवी करीन ? मला संशय आला असता तर मींच नसतं का तुला विचारलं ? कुणाची चोरी होती का तिथं ? इथं आपण शेजारींशेजारीं रहातों आहोंत. तिथं गेलों तरी आपण एकाच बैठकींत बसत होतों. मी फारशी येत नव्हतें खरी, पण तूं कांहीं तिथं अगदीं एकटाच नव्हतास. तिथं तारिणीच्या दोन्ही आई आहेत, इतर चार मंडळी जमताहेत, अशा वेळीं संशय घ्यायला मला जागा आहे कुठं ?—" एक मोठा आंवढा गिळून ती म्हणाली, "—असं असतांना सुद्धां तुला माझा संशय आला ? काय वाटलं तुला ? मधुकरला मी चिथावणी दिली असं वाटलं ?—"

" नाहीं ग !—" गोपीनाथ काकुळतीला येऊन म्हणाला, " मला तसंच कांहीं नाहीं वाटलं, मी आपला सरळ धागेदोरे जुळवीत गेलों. तूंच हें सांगितलंस म्हणून मला तसं कांहींतरी वाटलं. चोवीस तासांत मधुकरसारख्या माणसाचं मन इतकं कसं पालटलं ? "

गोपीनाथची ती केविलवाणी काकुळत शरयूला आवडली नाहीं. त्यानें केलेला आरोप तिच्या मनाला लागून राहिला होता, तरीही विषय जास्त चिघळूं नये म्हणून ती म्हणाली, " एवढंच ना ? जाऊं दे तर ! आतां तो विषयच नको. पण ही सारी हकीकत तारिणीच्या कानीं घातली पाहिजे. तिला सावध केलं पाहिजे. मधुकरला पश्चात्ताप झाला आहे असं तिला वाटतंय पण खरोखरच जर हा त्याचा डाव असेल तर तिला वेळींच सावध करणं हें आपलं कर्तव्य आहे. तुला नाहीं असं वाटत ? "

" अर्थात् वाटतं ! " गोपीनाथ म्हणाला, " कांहीं काळजी करूं नकोस. मी स्वतःच सारी हकीकत तारिणीला सांगतों. प्रत्यक्ष असं तुला कांहींच माहीत नाहीं तेव्हां तूं तरी कशाला या भानगडींत पडावंस ? "

गोपीनाथचे तेही उद्गार शरयूला आवडले नाहींत. कुठेंतरी कांहींतरी भानगड आहे असेंच तिला वाटलें. गोपीनाथ आपल्यापासून कांहींतरी चोरून ठेवतो आहे, कसली ना कसली तरी प्रतारणा करतो आहे, असा तिला संशय आला. मधुकरवर त्यानें केलेले आरोप खरे होते कीं खोटे होते याचा एकदां नीट छडा लावावा असेंही तिला वाटलें.

गोपीनाथच्या आधीं आपणच ही हकीकत जाऊन तारिणीला कळवावी असें तिच्या मनांत आलें होतें. पण घाईघाईनें कपडे करून गोपीनाथ तसाच निघून गेला असें जेव्हां तिनें पाहिलें तेव्हां तिला तें मोठें चमत्कारिक वाटलें. इतकी घाई करण्याइतकी ही कांहीं एकादी बिकट आपत्ती नव्हती. तसेंच त्याच्या मागोमाग जावें असेंही क्षणभर तिला वाटलें. पण इतका क्षुद्रपणा दाखवण्याइतकी ती मनानें दुबळी नव्हती म्हणूनच ती स्वस्थ राहिली.

तसेच चार दोन दिवस निघून गेले. ती तारिणीकडे गेली नाहीं कीं तारिणीही तिच्याकडे आली नाहीं. तसें पाहिलें तर तारिणी तिच्या घरीं क्वचितच येत असे. जायची काय ती ती स्वतःच ! तसें तिचें जाणेंही निश्चित नसे. गोपीनाथ जसा अगदीं बिनचूक रोज तारिणीच्या घरच्या बैठकीला हजर राही, तितकी आतुरता तिनें कधींच दाखवली नव्हती. दिखाऊपणाचा तिला तिटकारा होता. अलीकडे नवीनच उत्पन्न झालेली गोपीनाथची ही नवीन वृत्ति तिला तितकीशी आवडत नव्हती.

गोपीनाथ आणि शरयू या दोघांचें लग्न जरी ठरलेलें होतें—फार पूर्वीपासून ठरलेलें होतें—तरीही आजच्या आधुनिक युग्मांप्रमाणें एकमेकांच्या हातांत हात घालून गांवभर मिरवणें त्या दोघांनाही पसंत नव्हतें. ही मिरवण्याची वृत्ति ज्या ज्या कुणाच्या ठायीं दिसून येई त्यांना तीं दोघेंही नांवें ठेवीत. म्हणूनच आपल्याला बरोबर घेऊन गोपीनाथ तारिणीकडे जात नाहीं अशी तक्रार तिनें कधींच केली नव्हती. किंबहुना या क्षणापर्यंत तसली कांहीं कल्पना तिच्या मनांतसुद्धां आली नव्हती. पण यावेळीं तारिणीला भेटायला गोपीनाथ एकटाच गेला तें पाहून पहिल्यानेंच तिला वैषम्य वाटलें.

तारिणीच्या घराकडून परत आल्यावर झालेली हकीकत गोपीनाथ आपल्याला सांगेल असें शरयूला वाटलें होतें पण त्यानें तिची भेट घेण्याचें टाळलें, हीही गोष्ट शरयूच्या मनाला लागून राहिली. झालेली हकीकत त्याला विचारावी असें तिच्या मनांत आलें होतें पण तो कमीपणा घ्यायला तिचें मन तयार होईना. या प्रकरणांत गोपीनाथ कांहींतरी गफलत करतो आहे असा संशय तिला आल्यावांचून राहिला नाहीं.

त्यानंतर त्या विषयाची चर्चा कुणीच केली नाहीं. सारे व्यवहार पूर्ववत सुरू होते. मात्र शरयूनें हे कांहीं दिवस तारिणीच्या घरीं जायचें अजीबात वर्ज्य केलें होतें.

---

## ७ तपास

त्या दिवशीं चंपा शरयूच्या घरीं आली होती. मधून मधून ती अशी येत असे तशीच यावेळींही आली असावी, असें पहिल्यानें शरयूला वाटलें होतें. पण नंतर तिला कळून आलें, कीं ती मुद्दामच तिला भेटण्याकरितां आली होती.

आली त्या वेळीं चंपा बराच वेळपर्यंत शरयूच्या आईबरोबर शिळोप्याच्या गोष्टी बोलत बसली होती. पण शरयू निघून बाहेर जाते आहे असें पाहून चंपेनें तिला हांक मारून थांबवलें. शरयूला एका बाजूला घेऊन ती म्हणाली, " आज मी सहज आलें होतें खरी—पण म्हटलं, एकदां तुझीही चौकशी करावी. अलीकडे आमचं घर कां वर्ज्य केलं आहेस तूं ? "

" वर्ज्य कसलं केलं आहे ? " शरयू म्हणाली. " यापूर्वी तरी मी कुठं अशी रोज येत होतें ? "

" पण केव्हां तरी येत होतीस. " चंपा म्हणाली, " आज कित्येक दिवसांत आली नाहींस. तारिणीला विचारलं तेव्हां ती म्हणाली, कीं परीक्षेच्या अभ्यासांत तूं गुंतली असशील. मला कांहीं तसं वाटलं नाहीं. परीक्षेचा अभ्यास असला म्हणून काय झालं—चार आठ दिवसांत माणसानं एकदांसुद्धां कां येऊं नये ! तो मधुकर यायची सुरवात होणं अन् तूं यायची बंद होणं, या दोन गोष्टींचा कांहींतरी संबंध असावा असं मला आपलं उगीचच वाटलं. तो मधुकर येऊं लागल्यापासून गोपीनाथदेखील बावरून गेल्यासारखा दिसतो. मोठा बडबड्या आहे तो मधुकर अन् माहिती देखील खूपच आहे बेट्याला ! शारदाबाईची फार मर्जी बसली आहे त्याच्यावर. तारिणी देखील अभ्यासांत गुंतलेली असते. तेव्हां या बैठकींत ती फारशी नसते. गोपीनाथ अन् ती सारखीं अभ्यासांत गढलेलीं असतात. आलाच तर मधून मधून गोपीनाथ बैठकींत बसायला येतो. पण बोलतां बोलतां तो मधुकर त्याची अशी हुर्रेवडीं उडवतो, कीं परवांपासून त्यानं बैठकींत बसायचं चुकवायला सुरवात केली आहे. अन् आतां हे परीक्षेचे दिवस जवळ आलेले, फर्स्ट क्लास मिळवायची तारूची धडपड सुरू आहे, अन् कुणीतरी जोडीदार असल्याशिवाय अभ्यास चांगला होत नाहीं असं तारूला वाटतं. मला आश्चर्य वाटतं तें हेंच, कीं या मधुकरला परीक्षेची काळजी मुळींच नाहीं कशी ! तुला काय वाटतं !—"

चंपा सारखी बोलत होती त्यावेळीं शरयू मुकाट्यानें ऐकत होती. ती नुसतीच ऐकत नव्हती. सहज असो कीं बुद्धिपुरस्सर असो, चंपा बोलत असतांना कांहीं कांहीं विशिष्ट शब्द अशा खोचदार पद्धतीनें उच्चारीत होती, कीं त्याचा परिणाम शरयूच्या मनावर होत होता. ऐकतां ऐकतां तिचें विचाराचें चक्र सुरू झालें होतें. त्या चक्रांत हजार प्रकारच्या हजार कल्पना भरडून निघत होत्या. आपण ऐकत आहों कीं विचार करीत आहों हेंच तिला कळत नव्हतें. चंपेनें एकदम तिला उद्देशून प्रश्न केला तेव्हां ती चट्कन् भानावर आली. विचाराच्या भ्रमांत गुंतल्यामुळें चंपेला काय उत्तर द्यावें हें तिला चट्कन् सुचलें नाहीं म्हणून ती म्हणाली, " कोणत्या बाबतींत ? "

" या सगळ्या प्रकरणांत. "

" कोणत्या प्रकरणांत ? "

" वाऱ्याशीं बोलत होतें का मी ? प्रत्येक गोष्ट चांगली फोड करून सांगत होतें. तरीसुद्धां तुला कसं कळलं नाहीं ? "

" खरोखरच मी अभ्यासांत गुंतलें आहें हल्लीं. मी कांहीं तारिणीसारखी हुशार नाहीं. क्लास तर राहोच पण कशीबशी पास झालें कीं मिळविली. म्हणून सारं लक्ष मला अभ्यासाकडे घालवावं लागतं. सारखं तेंच घोळत असतं मनांत म्हणून हें असं होतं. "

शरयूच्या त्या उत्तरानें चंपेचें समाधान झालें नाहीं. ती म्हणाली, " तूं कांहीं म्हण शरयू , पण ही हकीकत ऐकत असतांना तुला कांहींतरी विशेष वाटत होतं यांत शंकाच नाहीं. कांहींतरी कल्पना तुझ्या मनांत येत होत्या. त्या कल्पनेच्या वावटळींत तुझं डोकं भ्रमण करीत होतं म्हणूनच तुला आतां माझ्या प्रश्नाचं नीटसं उत्तर देतां आलं नाहीं. आतां असं सांग, कसा काय माणूस आहे हा मधुकर ? "

" कसा काय म्हणजे काय ? " शरयू म्हणाली, " कॉलेजांत इतर चार विद्यार्थी असतात तसाच तो एक आहे. एवढं खरं, कीं इतर विद्यार्थ्यांपेक्षां कॉलेजांतल्या साऱ्या चळवळींत तो जास्त पुढाकार घेतो. अन् पुढाकार घेतो म्हणूनच चार माणसं त्याला अनुकूल आहेत. गोपीनाथ अगदीं एकलकोंडया आहे. पण मधुकर जिथं असेल तिथं त्याच्याभोंवतीं दहापांच माणसं हीं आपलीं असायचींच. माझा त्याचा फारसा परिचय नाहीं. त्यांतून माझं लग्न गोपीनाथशीं ठरलं आहे हें त्याला माहीत आहे. लग्न ठरलेल्या किंवा लग्न झालेल्या मुलींच्या तो बाजुलासुद्धां फिरकत नाहीं—"

" अस्सं ! " चंपा उद्गारली, " पण इकडे मात्र तसं दिसत नाहीं. तारिणीचं लग्न कुठंच ठरलेलं नाहीं हें जगजाहीर आहे. तरीपण तो तिच्याभोंवतीं घोंटाळायचा कांहीं प्रयत्न करीत नाहीं. तसं पाहिलं तर तारिणी त्याच्या हिशेबांतच नाहीं. त्याचा सारा वेळ जातो तो शारदाबाईकडे !—"

" त्यालाही कारण आहे." शरयू म्हणाली, " कवि आणि लेखक म्हणून मिरवायची त्याला मोठी हौस आहे. शारदाबाईचं नांव चोंहींकडे गाजतं आहे म्हणूनच मला वाटतं तो त्यांची मर्जी संपादन करायचा प्रयत्न करीत असेल."

" काय असेल तें त्याचा तोच जाणे ! " चंपा म्हणाली, " पण मला कांहीं तो माणूस आवडत नाहीं. त्यानं माझं कांहींच केलं नाहीं. माझ्याशीं तो बोलत सुद्धां नाहीं. मी त्याच्या खिजगणतींतच नाहीं मुळीं. काय असेल तें असो, असं जरी आहे तरी नुसतं त्याला पाहिलं तर मला त्याचा राग येतो ! "

" अन् गोपीनाथ ? "

" गोपीनाथ होय ? तो आपला एक साधाभोळा प्राणी आहे. त्या नाटकामुळं त्याची ओळख झाली—आम्हां सर्वांशींच ओळख झाली—तेव्हांपासून तो आमच्याकडे येऊं लागला. :आतां घरोबा इतका वाढलाय, कीं तो अगदीं घरचाच माणूस वाटतो. त्यांतून त्याचं तुझं लग्न ठरलेलं—"

" लग्न ठरल्याचा काय संबंध ? लग्न ठरणं म्हणजे कांहीं लग्न होणं नव्हे. ठरलेलीं लग्नं नाहींं का कधीं मोडत ? अन् झालेल्या लग्नाचे सुद्धां कसे धिंडवडे होतात तें तुम्हांआम्हां इतकं इतर कुणालासुद्धां कळायचं नाहीं. "

" गोपीनाथ त्यांतला मुलगा दिसत नाहीं."

" कशावरून ? "

' म्हणजे ! तसा कांहीं संशय यायला तुला कांहीं कारण झालंय का ? "

शरयू उगीच राहिली. काय उत्तर द्यावें तें तिला चटकन् ठरवतां येईना. मनावरचा भार कुठेंतरी हलका करावा असें तिला वाटत होतें. तो भार तिला असह्य झाला होता. त्या भाराखालीं तिचें हळवें मन चेंगरून गेलें होतें. तिला जें कांहीं वाटत होतें तें मनमोकळेपणानें आपल्या आईशीं बोलण्याइतकें तिचें आणि तिच्या आईचें रहस्य नव्हतें. ती नुसती तिची आई होती एवढेंच. आजपर्यंत ती अशा कसल्या प्रसंगांत कधींच आली नव्हती. किरकोळ बाबींत मन मोकळें करून बोलायचें म्हणजे एकट्या गोपीनाथकडे. आणि इथें तर प्रत्यक्ष त्याचाच संबंध होता.

चंपेला ती ओळखीत होती. तारिणीवर तिचें किती प्रेम आहे याची शरयूला चांगलीच कल्पना होती. तारिणीच्या नित्याच्या संभाषणांत दहा पांच वेळ तरी तिचें नांव आलें नाहीं असें क्वचितच होई. म्हणूनच यावेळीं आपलें हृदय चंपेपुढें उघडें करावें असें शरयूला वाटलें. ती म्हणाली, " तुमचे सारे अंदाज बरोबर आहेत चंपामावशी. हा वेळपर्यंत सारं कांहीं उघडपणें बोलायचा मला धीर होत नव्हता. आतां तुम्ही आलांत, एवढ्या कळकळीनं मला विचारलंत—मीही इकडे तळमळत होतें—जे काय प्रकार झाले आहेत ते कुणाकडे तरी एकदां मोकळ्या मनानं बोलून टाकावे असं मला वाटत होतं. ही भाषा कांहीं माझ्या आईला कळायची नाहीं. तिची दृष्टि अगदींच वेगळी आहे. माझं लग्न मोडलं तर तें हवंच आहे तिला. लग्न करून संसार थाटायच्या वृत्तीला ती भिकारडेपणाची वृत्ति म्हणते. म्हणूनच तिच्याकडे कांहीं बोलावं असं मला वाटेना. आतां तुम्ही आलां—तुम्हाला सुद्धां कांहीं तरी शंका आली आहे—तुम्हीसुद्धां कांहीं तरी तपास करतांहांत—तेव्हां आतां वाटलं, माझ्या शंका म्हणा, संशय म्हणा, कीं माझ्या खुळ्या समजुती म्हणा—तुमच्यापुढं एकदां सांगून टाकाव्या म्हणजे तेवढंच मन हलकं होईल—आपल्या मनावरचं ओझं कुणाच्या तरी हवालीं केलं आहे, कुणी तरी तो भार उचलला आहे—तो बोजा आतां हलका झाला आहे असं मानून घेऊन मी निश्चिंत होईन—" बोलत असतांना ती थांबली. तिचं हृदय भरून आलं होतं. आणखी एकच शब्द तोंडावाटे बाहेर पडला असता तर तिला एकदम रडूं कोसळलें असतें. मनांत आलेला तो आवेग मोठ्या सायासानें आवरून ती पुढें म्हणाली, " आजवर मीं अगदीं सुखांत होतें. आयुष्याचं ध्येय गांठलं आहे असं मला वाटत होतं. आपल्या जातीची क्षणोक्षणाला माती होत असलेली पहातांना माझ्या भवितव्याबद्दल मला भीति वाटत होती. सुदैवानं गोपीनाथच्या सज्जन बापाला पटलं—कष्टानं का होईना, माझ्या आईनं कबुली दिली—आतां सारं कांहीं सुरळित झालंय असं धरून मी चालत होतें. पण हें नाटक झालं अन् तिथूनच पूर्वीचं वातावरण बदलूं लागलं. मी शपथेवर सांगतें तुम्हाला चंपामावशी, खोटा मत्सर मला केव्हासुद्धां शिवला नव्हता. तसा प्रसंगच कधीं आला नव्हता. पण आतां मात्र माझं मन संशयी बनूं लागलं आहे. साध्यासुध्या गोष्टींतसुद्धां मला संशय दिसतो आहे. आम्ही अगदीं एकीएक होतों. दुसऱ्या कुणाशीं संबंध नव्हता—त्याचाही नव्हता कीं माझाही नव्हता—चुरस चढाओढ अशी

कुठंच नव्हती—आजसुद्धां नाहीं—तारिणीची माझी विशेष मैत्री जुळली ती या नाटकामुळंच. तिचा मला मत्सर वाटतो असं मात्र मुळींच समजूं नका. पण गोपीनाथावरचा माझा ताबा सुटलाय अशी शंका मला येऊं लागली आहे. ती बळावयाला कारण झालं या मधुकरच्या येण्याचं—" असें म्हणून तिनें मधुकर आणि गोपीनाथ यांच्या दरम्यान झालेल्या सर्व प्रकारांची हकिकत चंपेला सविस्तर सांगितली. ती हकीकत सांगून होईपर्यंत तिनें कसाबसा मनावर ताबा ठेवला होता. हकिकत सांगून होतांच मात्र तो ताबा सुटला आणि ती एकदम फुलून फुलून रडूं लागली.

चंपेनें तिचें सांत्वन केलें. तिला आश्वासन दिलें. तिच्या भवितव्यावर सारखी नजर ठेवण्याचें वचन दिलें. एकापरीनें तिची ' आई ' होण्याचें चंपेनें पत्करलें असें म्हणायला हरकत नाहीं.

चंपेच्या आश्वासनानें शरयूला धीर आला. तिच्या अपेक्षेप्रमाणें तिच्या मनावरचा भार हलका झाला. एका काळजींतून आपण मुक्त झालों असें तिला वाटलें.

आतां ती मनाची खळबळ राहिली नव्हती. अभ्यासाला बसलें असतां पुनः पुनः त्याच त्याच गोष्टी यापूर्वी तिच्या मनांत येत, त्या मनांत आल्या म्हणजे चित्तवृत्ति बावरून जाई, त्या बावरेपणामुळें अभ्यासाकडे लक्ष लागत नसे. आतां ती परिस्थिति पालटली. कुणीतरी आपला भार घेतला आहे, आपल्या कल्याणाच्या इच्छेनें कुणीतरी आतां चोंहींकडे नजर ठेवीत आहे, असें वाटून ती निर्धास्त झाली.

चंपेच्या मनावर मात्र हा आणखी एक बोजा वाढला गेला. ती आधींच कावून गेली होती. घरीं बसलेल्या या साहित्यिकांच्या अड्ड्याची तिला चीड येत होती. सारे मेले लाळघोटे आहेत असें तिला वाटत होतें. त्या लाळघोटेपणामागें कांहीं पापाची भावना होती असें नव्हे. पण पापापेक्षांही वाईट अशा खोट्या तोंडपुजेपणाच्या प्रवृत्तीनें जमून शारदाबाईंचा उगीच उदोउदो करणाऱ्या त्या साहित्यिकांच्या लफंगेगिरीचा तिला तिटकारा आला होता.

त्याचबरोबर तारिणीच्या काळजीनें ती चुरून गेली होती. शरयूशीं लग्न ठरलें असतांही गोपीनाथ तारिणीशीं लगट करूं पहातो आहे असें तिच्या मनानें घेतलें होतें. तसा समज करून घ्यायला पुरेसें कारण कांहींच नव्हतें. हा तिचा संशय पुराव्यापेक्षां भावनेवर आधारलेला होता. प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुराव्यापेक्षां तिला ही आंतरिक भावनाच जास्त महत्त्वाची वाटत होती.

आणि आतां शरयूलाही तोच संशय आल्याचें पाहून तिच्या या भावनेनें उचल खाल्ली. गोपीनाथबद्दल आलेला संशय आतां तिच्या दृष्टीनें संशय राहिला नव्हता. केवळ अभ्यासासाठीं कुणीही तरुण विद्यार्थी घरदार टाकून इतका गुंतून राहील असें तिला वाटत नव्हतें. अभ्यासच करायचा तर इतर पुरुष विद्यार्थी काय थोडे होते ? त्या सर्वांना टाकून तारिणीबरोबरच अभ्यास करायचा या माणसाचा हट्ट कां ?

आतां आणखी हा मधुकर आला होता. तो तारिणीला हिशेबांत सुद्धां घेत नव्हता. त्याचें आराध्यदैवत म्हणजे शारदाबाई असें सकृद्दर्शनीं दिसत होतें.

पण चंपेला तें पटत नव्हतें. गोपीनाथ भावनावश असला तर हा मधुकर कावेबाज आहे असें तिला वाटलें. तारिणीच्या स्वभावाची मधुकरला चांगली कल्पना होती. तारिणीची आराधना करण्यापूर्वी तिच्या आईची मर्जी संपादन करणें त्याच्या कावेबाजपणाला शोभेसें होतें. विरोध झाला असता तर तो आई-कडून—म्हणूनच त्यानें आधीं शारदाबाईची मर्जी संपादन करायला सुरवात केली असावी असें चंपेला वाटलें. आईची मर्जी एकदां संपादन केल्यावर पुढें मुलीकडे लक्ष देतां येईल असें ठरवूनच तो तिच्याकडे दुर्लक्ष्य करीत असावा, असाच चंपेचा ग्रह झाला होता.

पण या कुटुंबाला मधुकर नवखा होता. एकच बाब त्यानें हिशेबांत घेतली नव्हती आणि तीच फार महत्त्वाची होती. चंपा ही तारिणीच्या बापाची रखेली, निराधार झाल्यामुळें ती परिस्थितीपुढें मान वांकवून शारदाबाईच्या आश्रयानें कसेबसे दिवस काढीत आहे, असा इतरांप्रमाणें मधुकरचाही समज झाला होता. या कुटुंबाची कर्ती वस्तुतः चंपाच होती—आर्थिकदृष्ट्या नव्हे—सांसारिक-दृष्ट्या ती या कुटुंबाची मालकीण होती. वडिलकीचा अधिकार तिच्याच हातीं होता याची कल्पना मधुकरला नव्हती कीं गोपीनाथलाही नव्हती. दोघेही आपल्या परीनें स्वतःची फसवणूक करून घेत होते.

गोपीनाथ आणि मधुकर यांच्यामधें जी भानगड झाली तिचा पडताळा कसा घ्यावा याच काळजींत चंपा होती. ती हकीकत गोपीनाथला विचारण्यांत कांहीं निष्पन्न झालें नसतें. शरयूनें सांगितलेल्या हकिकतीपेक्षां त्याच्याकडून जास्त कांहीं कळलें नसतें. त्या प्रकरणीं गोपीनाथनें तारिणीकडे कांहीं उल्लेख केला कीं नाहीं, तें त्याला विचारण्यांत अर्थ नव्हता. आणि तारिणीला या सान्या भानगडीचा सुगावा लागूं देणें चंपेला इष्ट वाटत नव्हतें.

म्हणूनच मधुकरकडे या विषयाचा उपक्रम करावा असें तिनें ठरवलें.

तसें करणेंही तितकेसें सुलभ नव्हतें. मधुकर तिच्याशीं कधींच बोलत नसे. चंपेची खरी लायकी त्याला माहीत नव्हती. त्या ठिकाणीं होत असलेल्या या साऱ्या वाङ्मयविषयक चळवळींच्या मागें चंपेचा हात होता असें कुणी त्याला सांगितलें असतें तर तें त्याला खरें वाटलें नसतें. तो त्याचा समज दूर व्हावा अशी चंपेचीही इच्छा नव्हती.

म्हणूनच मधुकरकडे या विषयाचा उपक्रम कसा करावा हें चंपेला नीटपणें ठरवतां येईना.

असेच कांहीं दिवस गेले. एके दिवशीं सहज योग आला. शारदाबाई सहसा कुठें बाहेर जात नसे. पण त्या दिवशीं कुणातरी बड्या धेंडाच्या अत्याग्रहामुळें स्त्रियांच्या एका सभेला हजर रहाणें तिला भाग पडलें होतें. हें तिचें जाणें त्या दिवशीं अचानकच झाल्यामुळें नित्याप्रमाणें मधुकर आला आणि ती नाहीं असें पाहून जायला निघाला, त्यावेळीं चंपा त्याला म्हणाली, " बसा ना मधुकर. त्यांना फार वेळ लागायचा नाहीं. आतां लवकरच येतील त्या. जायचं त्यांच्या मनांतच नव्हतं—पण ती कुणी एक लठ्ठ बाई आली होती, ती बळेंबळेंच त्यांना ओढून घेऊन गेली. लवकरच येतें असं मला हळूच सांगून त्या निघून गेल्या आहेत. तुम्हाला बसवून घ्या असं जरी त्या प्रत्यक्ष म्हणाल्या नाहींत तरी पण तसं सांगण्यांत त्यांचा तोच उद्देश असावा असं आपलं मला वाटतं. त्या येईपर्यंत हवा तर चहा ठेवतें. मला वाटतं, त्यांचा चहा तिकडेच होईल. आल्यावर मग कांहीं त्या चहा घ्यायच्या नाहींत. तेव्हां त्या येईपर्यंत चहा घ्यायचं हें एवढं एक काम तर उरकून घ्या ! मी चहा करून घेऊन येतें तोंपर्यंत हें कुणाचंसं नवं पुस्तक आलं आहे—कवितांचं आहे वाटतं तें—तें पहा ना जरा चाळून. तुम्ही देखील एक कवि आहांत म्हणून ऐकलंय मी. कविता मला फार आवडतात अन् म्हणूनच माझा मोठा आदर आहे तुम्हां कविलोकांबद्दल. इथं तुम्ही सारीं विद्वान माणसं जमतां, कवितेची चर्चा करतां, मी आपली भाविकपणें ऐकत असतें. सर्वांच्या चर्चेपेक्षां मला तुमचीच चर्चा आवडते. मोठी करडी नजर आहे तुमची या अलिकडच्या कविलोकां-बद्दल. मला त्यांत कांहीं कळत नाहीं म्हणा—पण आपलं तुमचं म्हणणं मला पटतं. बाकीचे कुणी स्तुति करतात तर कुणी निंदा करतात. तुम्ही निंदाही करीत नाहीं कीं स्तुतिही करीत नाहीं. म्हणूनच मला तुमची टीका आवडते.

ा थांबा—अश्शी चहा तयार करून घेऊन येतें." असें म्हणून तें नवें
्तक मधुकरच्या हातीं देऊन चंपा घरांत निघून गेली.

कवितेच्या टीकेबद्दल मधुकरला मोठा अभिमान होता. मराठी काव्याचा
ापल्यासारखा कोणी दुसरा अभ्यासू नाहीं असा त्याचा ठाम समज होता.
वितेच्या बाबतींतील शारदाबाईचीं मतें त्याला पटत नव्हतीं. भावनाप्रवण
ाणि शृंगारात्मक काव्यें शारदाबाईला मुळींच आवडत नसत. कुणातरी
ज्ञात किंवा ज्ञात व्यक्तीच्या अज्ञात किंवा ज्ञात प्रेमावर आधारून आळव-
ल्या कवितेचा तो मोठा भोक्ता होता. त्याच्या स्वतःच्या कविता त्याच
ारूपाच्या असत. त्या स्वतःच्या कविता शारदाबाईना दाखवण्याचा आज-
 त्याला धीर झाला नव्हता. शारदाबाईला त्या आवडल्या नसत्या याची
ाला खात्री होती. त्यानें या चर्चाटीकेच्या प्रकरणांत तारिणीला पहिल्या-
सूनच वगळलें असल्यामुळें आणि त्याच्या त्या कवितांपैकीं कांहीं कविता
ालेजच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झाल्यावेळीं तारिणीनें त्या कवितांवर हाणलेल्या
कास्त्राची बातमी त्याच्या कानीं आलेली असल्यामुळें, आपल्या या अस्सल
विता तिला दाखवाव्या असें त्याला मुळींच वाटत नव्हतें.

चंपेच्या या उपक्रमामुळें त्याला थोडीशी आशा उत्पन्न झाली. आपल्या
वितांचें चीज करील अशी ही एक व्यक्ति या कुटुंबांत आहे असें पाहून
ाला आनंद झाला. चंपा चहा घेऊन आली त्यावेळीं तो म्हणाला, "खरो-
रच तुम्ही मोठी आगळीक केली आहे. टीका करायची नसली तर नका
रूं, पण चार बरे शब्द बोलायचा प्रसंग येतो त्यावेळीं कां तुम्हीं तोंड मिटून
सतां ? कां तसं स्पष्ट बोलून दाखवीत नाहीं ?"

"शारदाबाईची मला फार भीति वाटते !" चंपा मोठ्या मिनतवारीनें
हणाली. "त्यांना कांहीं या असल्या कविता आवडत नाहींत. मला आवडतात
कांहीं त्यांना ठाऊक नाहीं. मी आपली चोरूनमारून वाचतें. त्या दिवशीं
ारिणीनं तुमचं कॉलेजचं त्रैमासिक आणलं होतं त्यांत एक कविता
ाती तुमची. मला फार आवडली ती. मी तसं म्हटलं तेव्हां तारिणीनं नाक
रडलं. एवढ्या मोठ्या माणसांना जें आवडत नाहीं तें आपल्याला आवडतं
ासं कुठल्या तोंडानं म्हणायचं ?"

"कुठली कविता ती ?" मधुकरनें चहा घेत घेत विचारलें.

चंपेनें आधीं तयारी करून ठेवली होती. एका मागून एक मधुकरच्या

कवितेंतील एक एक चरण ती आपल्या गोड गळ्यांतील बारीक आवाजानें म्हणून दाखवूं लागली.

मधुकर हुरळून गेला. आपल्या कविता पाठ म्हणून दाखवण्याइतकी तयारी केलेली आपल्या काव्याची एक दर्दी व्यक्ति सांपडली हें पाहून त्याचा आनंद गगनांत मावेना. कुणीच त्याच्या कवितांचें इतकें कौतुक केलें नव्हतें.

चंपेनें टाकलेला डाव यशस्वी झाला. कवितेची चर्चा सुरू झाली. दोघेंही कितीतरी वेळ चर्चा करीत बसलीं होतीं.

बराच उशीर झाला तरीही शारदाबाई आली नाहीं.

पहिल्याच भेटींत मुळाला हात घालायचा नाहीं असें ठरवून काव्यचर्चे-पलिकडे जायचें चंपेनें टाळलें.

आजच कांहीं घाई नव्हती. वेळप्रसंग पाहून मधुकरला आपल्या विश्वासांत घेऊन उत्पन्न झालेली जिज्ञासा पुरी करण्यासाठीं चंपेनें आणखी कांहीं काळ वाट पहाण्याचें ठरवलें.

शारदाबाई आल्या नाहींत असें पाहून मधुकर त्यावेळीं निघून गेला. आपल्या शेलक्या शेलक्या अप्रसिद्ध कविता आणून द्यायचें कबूल करायला मात्र जातांना तो विसरला नाहीं.

---

## ८ तेढ

शारदाबाईंच्या वाङ्मयीन संसारांत मधुकरनें आपलें बस्तान ठीक बसवलें होतें. गोपीनाथ हळुहळु बाजूला पडूं लागला होता. तो त्याचाच अपराध होता. मधुकर आल्यापासून साहित्यिकांच्या या बैठकींत बसायचें तो टाळीत असे.

या बैठकींतल्या गैरहजेरीचा फायदा निराळ्या रितीनें मिळवण्याचा त्याचा बेत होता. तारिणीला अभ्यासांत मदत करण्याच्या निमित्ताखालीं तिच्या सहवासांत जितकें रहातां येईल तितकें तो साधीत होता. शरयूला दिलेल्या वचनाप्रमाणें तारिणीदेखील त्याला एकप्रकारें झुलवायला पहात होती. या साऱ्या फसवणुकीच्या व्यवहारांत कोण कुणाला फसवीत होतें हें ठरवतां आलें नसतें.

खरें पाहिलें तर तारिणीच स्वतःची फसवणूक करीत होती. गोपीनाथ सावध होता. निश्चित मार्गानें कार्यक्रम आंखून त्याप्रमाणें वागत होता. शरयूला तोडावें अशी त्याची आंतरिक इच्छा नव्हती. पण तारिणीच्या बुद्धि-वैभवाच्या झळाळीनें दिपून जाऊन त्याचें मन तिच्याकडे ओढूं लागलें होतें. दिव्यावर टाकलेल्या पतंगाची ती झांप होती याची गोपीनाथला कल्पना नव्हती. कदाचित् त्या झांपेसरशी तो दिवा मालवला जाईल अशी आशा गोपीनाथच्या हृदयांत उत्पन्न झाली होती.

त्या आशेला लहानलहान अंकुर फुटत होते. त्या अंकुरांतून पालवी बाहेर पडेल असें वाटूं लागलें होतें.

दिवसेंदिवस तारिणी बेसावध होऊं लागली होती. तेजस्वी जीवांच्या ठायीं एक मोठा दोष असतो. असे जीव बहुधा आत्मप्रवण असतात. स्वतःच्या वृत्तीवर त्यांचा वाजवीपेक्षां फाजील विश्वास असतो. त्या आत्मविश्वासाच्या बळावर वाटेल त्याला वाटेल तस खेळवतां येईल असें त्यांना वाटत असतें. तो खेळ खेळतांना अशा जीवांची आत्मप्रवणता केव्हां केव्हां त्यांना फशी पाडते. तारिणीच्या बाबतींत तसेंच कांहींसें होऊं लागलें होतें.

परीक्षेला आतां अगदींच थोडे दिवस राहिले होते. दोघेंही परीक्षेंत पास होणार यांत मुळींच शंका नव्हती. कुणाला कोणता क्लास मिळेल एवढाच काय तो प्रश्न होता. परीक्षेच्या पूर्वींचे हे चारदोन दिवस विश्रांतींत घालवावे असें तारिणीनें ठरवलें.

गोपीनाथला तिनें तसें सांगितलें त्यावेळीं तो म्हणाला, " अभ्यास करतांना आपण तन्मय होत होतों. त्या तन्मयतेचा परिणाम अंतरंगांतील भावनेवर-देखील होत होता असं नाहीं का वाटत तुला तारिणी ? "

" कांहीं सांगतां येत नाहीं. " तारिणी म्हणाली, " अभ्यासापलीकडे मला कांहींच दिसत नव्हतें. मनोवृत्तींना पूर्णपणें दडपून टाकून मी अभ्यास करतें आहें. पहिला वर्ग मिळावा—नव्हे, पहिल्या वर्गांत पहिला नंबर मिळावा अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे. त्या अनुरोधानं मी माझं सर्वस्व या अभ्यासांत गुंतून ठेवलं आहे. त्यापलीकडे मला कांहींच सुचत नाहीं. "

" खरें आहे तें ! " गोपीनाथ म्हणाला, " पदोपदीं तें मला जाणवत होतं. साऱ्या वृत्ति अभ्यासांत इतक्या गुंतवून टाकायचं सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं. मलाही महत्वाकांक्षा आहे—नाहीं असं नाहीं. पण ती महत्वाकांक्षा एवढी

मोठी नाहीं. पहिला वर्ग मिळायची मला आशा नाहीं—मिळालाच तर तो तुझ्या सहवासामुळं असं मी म्हणेन. माझा जो कांहीं अभ्यास होतोय तो याच जागीं. घरीं कांहींच होत नाहीं. मन अगदीं कावल्यासारखं होतं. परीक्षा पास झाल्यावर पुढं काय करावं याचा वारंवार विचार पडतो. कोणताच मार्ग निश्चित होत नाहीं. एकदां वाटतं एम्. ए. च्या टर्मस् भराव्या, तर एकदां वाटतं लॉ कॉलेजांत जावं. बाबांना वाटतं कीं मी वकील व्हावं म्हणूनच तशी कल्पना मनांत येते. माझी मात्र खात्री आहे, कीं वकिली करायची पात्रता माझ्या अंगीं नाहीं. कदाचित् एल्.एल्. बी. झालोंच तर तीन वर्षं वकिली करायचं ढोंग करून कुठं तरी सबजज्जाची नोकरी मला मिळवावी लागेल. ज्या कारणामुळं मी वकिलीला अपात्र आहें तेंच कारण मला प्रोफेसर व्हायच्या आड येणार आहे. तें कारण म्हणजे माझा मुखदुर्बळपणा. सभाधीटपणा असल्याशिवाय हे दोन्ही व्यवसाय यशस्वी व्हायचे नाहींत. तो सभाधीटपणा माझ्या अंगीं नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे. म्हणूनच एल्.एल. बी. होऊन कुठं तरी सबजज्ज व्हावं असं मला वाटूं लागलंय."

"शरयू काय म्हणते ?" तारिणीनं विचारलं.

"शरयू काय म्हणते !" आपल्याशींच पुटपुटल्यागत गोपीनाथ उद्गारला, "शरयू काय म्हणणार ? व्यवहाराला ती अगदीं पारखी आहे. ती सुस्वभावी आहे खरी पण कोणत्याही व्यवसायांत चमकण्याइतकं तेज तिच्या अंगीं नाहीं. ती एक उत्तम गृहिणी होईल पण माझ्यासारख्या दुबळ्या माणसाच्या अंगीं सामर्थ्य उत्पन्न करण्याइतकं सहचारिणीचं तेज तिच्याठायीं नाहीं. हा दोन दुबळ्या माणसांचा संसार होणार असं वाटून मी थोडासा घाबरून गेलोंय. लहानपणापासून आम्ही एका जागीं वाढलोंखेळलों, सहवासानं स्नेह वाढला—स्नेहाचं रूपांतर प्रेमांत झालं कीं काय तें कांहीं सांगतां यायचं नाहीं—पण एकमेकांबद्दलचं आकर्षण वाढलं यांत शंका नाहीं. त्या आकर्षणापायींच आम्ही वचनबद्ध झालों. आतां वाटतं, ही चूक तर झाली नाहीं ?"

"कां असं वाटतं ?" तारिणी म्हणाली, "एवढ्या दिवसांच्या सहवासानं-सुद्धां तुम्हांला एकमेकांचीं अंतरंगं ताडून पहातां नाहीं का आलीं ?"

"एवढ्या दिवसांच्या सहवासामुळंच मला ही भुरळ पडली !" गोपीनाथ एक मोठा सुस्कारा टाकून म्हणाला, "पहिल्यापासून मी एकलकोंडा. सहवास काय तो एक शरयूचा. दुसऱ्या कुणाशीं कधीं संबंधच आला नाहीं. विचारच

केला नव्हता मी! विचार करून पहायची जाणीवच झाली नाहीं मला. आतां विचार सुचूं लागला तेव्हां पश्चात्ताप होणार आहे कीं काय असं वाटूं लागलंय!" असें म्हणून गोपीनाथ एक मोठा सुस्कारा टाकून उगी राहिला.

असेच एक दोन क्षण गेले. तो बोलत नाहीं असें पाहून तारिणी म्हणाली, "पश्चात्ताप होईल असं का वाटतं तुम्हाला? नि हा पश्चात्ताप कसला?"

उत्तर देण्यासाठीं क्षणभर थांबून गोपीनाथ उद्गारला, "पश्चात्ताप कसला! विद्यार्थीदशेंतच माणसानं आपल्या आयुष्याचं ध्येय ठरवलं पाहिजे हें मला यापूर्वी कळलं नव्हतं. ती विद्यार्थीदशा आतां संपणार आहे. अजूनही मला माझं ध्येय चोखाळतां आलं नाहीं. ध्येयशून्य वृत्तीनं मी शरयूशीं वचनबद्ध झालों याचाच मला पश्चात्ताप होतोय!"

"मग तिला कां नाहीं सांगत तसं?" तारिणी म्हणाली, "हातचा बाण सुटून गेला नाहीं तोंपर्यंत त्याला उपाय आहे. सुदैवानं अजूनही तुम्ही मोकळे आहांत—तीही मोकळी आहे. कोणतीच मर्यादा तुम्ही अजून ओलांडलेली नाहीं—होय ना? मग भीतां कां? कां सरळ सरळ सांगत नाहीं तिला?"

"मला धीर होत नाहीं!" गोपीनाथ म्हणाला, "भीती वाटते! तिचा स्वभाव फार हळवा आहे. कदाचित् ती मनाला लावून घेईल. धक्कासुद्धां बसेल कदाचित्, इतकी ती विश्वास ठेवून बसली आहे माझ्यावर. तो विश्वासघात कसा करूं? आम्हीं शेजारींशेजारीं राहतों आहों. एकमेकांच्या घरीं जाणंयेणं आहे. असं कांहीं बोलून दाखवलं तर तें जाणंयेणं बंद होईल. तिच्या आईला कळलं तर तिला आनंदच होईल. शरयूचं लग्न होण्यापेक्षां तिनं धंद्यांत पडावं अशी तिच्या आईची इच्छा आहे. असल्या सुशिक्षितांना हल्लीं श्रीमंतांकडून फार मागणी आहे. हें तिला कळलं तर म्हणूनच आनंद वाटेल. पण शरयूला केवढा धक्का बसेल याची कल्पना आली कीं माझं काळीज फाटून जातं!—" असें म्हणून त्यानें पुनः एक सुस्कारा सोडला.

"यांत कांहीं तडजोड नाहीं का व्हायची?" तारिणी म्हणाली.

"तडजोड कसली व्हायची?" गोपीनाथ निराशपणें उद्गारला, "या जन्माच्या गांठी आहेत. या गांठी गांठायच्या पूर्वीच काय तो विचार करायला हवा. तुम्हाला नाहीं असं वाटत?"

"मी या गोष्टीचा कधीं विचारच केला नाहीं." तारिणी बेफिकिरपणें म्हणाली, "लग्नाची नुसती कल्पनासुद्धां आजवर कधीं माझ्या मनांत आली

नाहीं. आईच्या जन्माचे जे धिंडवडे झाले त्यांची जाणीव असल्यामुळं मी या विषयापासून शक्य तितकी दूर राहिलेंय.—"

" पण तो बालविवाह होता—" गोपीनाथ म्हणाला, " एकमेकांचा परिचय नसतांना झालेलं तें लग्न होतं—"

" पण हा तुमचा बालपणापासूनचा परिचय ! " तारिणी म्हणाली, " परिचय कसला—अगदीं निकट सहवास ! एवढ्या सहवासानंसुद्धां आज तुम्हाला पश्चात्ताप होतोय. समजा, यापूर्वीच तुमचं लग्न झालं असतं तर काय केलं असतं तुम्ही ? "

" तेंच तर मला जाणवतं ना ? " गोपीनाथ म्हणाला, " भाग्य माझं, कीं तसं कांहीं झालं नाहीं. भाग्य माझं, कीं त्यापूर्वीच तुझामाझा परिचय झाला—"

" त्याचा यांत काय संबंध ? " तारिणीनें चट्कन् मधेंच विचारलें.

" तें कसं सागूं ? " गोपीनाथ म्हणाला, " परिचय एकच होता—एकीचाच होता—अनेकांपासून मी दूर होतों. अनेकांशीं खेळ खेळण्याइतकी मधुकरी वृत्ति माझ्या अंगीं नव्हती. एकच परिचयानंतर हा दुसरा परिचय झाला आणि वाटूं लागलं—" असें म्हणून तो पुन्हा उगीच बसला.

तारिणीला आतां त्याचा उद्देश पक्का कळून चुकला. शरयूचा अंदाज खरा होता असें तिला आतां वाटूं लागलें. स्वतःच्या मनाचा अंदाज तिनें घेतला नव्हता म्हणून ती म्हणाली, " गगनाला गवसणी घालायची हाव धरूं नका गोपीनाथ. लेखनांत मी कांहींही लिहिलेलं असलं तरी तें सारं बनावट होतं. त्यांत अंतरींचा जिव्हाळा नव्हता. त्याच्यावरून अंदाज बांधूं नका. माझी वृत्ति भावनाशून्य आहे. माझ्या आईच्या हातचं मी एक बाहुलं आहें. ती जशी नाचवील तशी मी नाचणार. ती माझी आई समोर आहे तोंपर्यंत मी कुणाच्याही आहारीं जाणार नाहीं. एवढ्यावरून काय तो बोध घ्या. "

" एकूण मधुकरच शहाणा म्हणायचा ! " तिरस्कारपूर्ण हंसून गोपीनाथ म्हणाला, " कुणाची कळ कुठं आहे हें परिचय नसतांना सुद्धां त्यानं ओळखलं. जातों मी. कमीजास्त शब्द गेला असेल तर त्याची मला क्षमा कर ! " असें म्हणून तो एकदम उठून निघून गेला.

तारिणीला विचार पडला. गोपीनाथच्या भाषणाचा तिच्या मनावर परिणाम झाला होता. शरयूसारखी अत्यंत सुंदर आणि सालस तरुणी लाभली असतांही, आपल्या ओढीनें गोपीनाथ तिला टाकायला तयार झाला कसा, हाच प्रश्न

तिच्यापुढें उभा राहिला. बालपणापासूनचें सहवासाचें प्रेम इतकें का डळमळित असतें ? बालपणापासूनच्या सहवासानें जडलेल्या लोभाचें हें रूपांतर प्रेमांतच झालें होतें का ? प्रेमांत रूपांतर झालें म्हणून त्यांनीं हें लग्न ठरवलें होतें, कीं पूर्वीच्या काळीं जशीं कांहीं जोडप्यांचीं लग्नें जुळवण्यांत येत असत तसेंच हें लग्न जुळलें होतें ? सहवासानें उत्पन्न झालेल्या प्रेमाची जर ही परिणती असेल तर इतक्या वर्षांनंतरच्या लाग्याबांध्यानेंसुद्धां ती कां टिकून रहात नाहीं ?

असें एवढें मोठें कोणतें आकर्षण आपल्याबद्दल गोपीनाथला वाटलें म्हणून एवढा जिव्हाळ्याचा संबंध तोडून टाकायला तो तयार झाला ? कीं पहिल्यापासूनच शरयूवर त्याचें प्रेम नव्हतें ?

आणि आतां आपल्याबद्दल त्याला वाटतें आहे तें काय ? प्रेम का ? कीं बौद्धिक आकर्षण ? कीं शारीरिक आकर्षण ? ती तुलना करून पाहूं लागली. तुलनेच्या कसोटीनें पहातां शरयू तिच्यापेक्षां कोणत्याही प्रकारें कमी आकर्षक नव्हती. सौंदर्याच्या कसोटीला लावून पहायचें तर दोघीही एकमेकींना हार जाण्याजोग्या नव्हत्या ? तरुणांना आकर्षक वाटण्याइतकी नाजुक मोहकता तिच्यापेक्षां शरयूच्या ठायींच जास्त होती. कुलपरंपरागत गुणांमुळें तिच्या मुद्रेत एक प्रकारचा नखरेलपणा होता. तसें कांहीं लक्षण आपल्या ठिकाणीं नाहीं, कामुक तरुणांचें आकर्षण होण्याइतकें सौष्ठव, सौंदर्यसंपन्न असूनसुद्धां आपल्याठायीं नाहीं असें तिला वाटलें.

मग गोपीनाथला एवढा मोठा त्याग करण्याची जी बुद्धि आपल्यामुळें झाली ती कोणत्या कारणानें ? तें बौद्धिक आकर्षण होतें का ? बुद्धिमत्तेच्या दृष्टीनें ती खात्रीनें गोपीनाथपेक्षां वरचढ होती. स्त्रीचा वरचढपणा पुरुषाला सहसा मानवत नाहीं—बौद्धिक वरचढपणा तर नाहींच नाहीं—असें असतांना शरयूला तोडायला गोपीनाथ असा कां तयार झाला ?

तिच्या मनाची मोठी खळबळ उडाली. असें मनस्वास्थ्य बिघडणें यावेळीं तिला नको होतें. परीक्षेला अगदींच थोडा अवधी राहिला असल्यामुळें मेंदूला विश्रांति मिळावी म्हणून अभ्यास देखील बंद केला असतांना, हें भलतेंच काम आपल्या मेंदूला करावें लागलें आहे याचा तिला राग आला. क्षणभर गोपीनाथबद्दल थोडीशी चीडही आली.

पण ती चीड इतकी तीव्र नव्हती. त्या चिडींतसुद्धां एक प्रकारचा गोडवा

होता. तिला वाटलें, असें काय आपल्याला झालें हें ? शरयूच्या वतीनें गोपी-नाथची परीक्षा पहाण्यासाठीं म्हणून आपण जें अवसान आणलें तें आतां आपल्यावरच उलटतें आहे का ?

मनांतल्या मनांत ती थोडीशी घाबरली. बौद्धिकदृष्ट्या आपल्या जोडीच्या कुणाही विद्यार्थ्यापेक्षां आपण जास्त वरचढ आहें अशी तिला एक प्रकारची सात्विक घमेंड होती. त्या जोरावरच ती त्या जोडीदारांना तुच्छ लेखीत होती. त्यामुळेंच तिचे ते जोडीदार तिचा हेवा करीत होते—मत्सराला बळी पडून वेळीं प्रसंगी तिची बदनामी सुद्धां करीत होते. ती बदनामी तिच्या खिजगणतींत नव्हती. बौद्धिक वरीष्ठतेच्या आत्मविश्वासानें, हे बदनामी करणारे तिचे जोडीदार क्षुद्र वाटत असल्यामुळें, मनाच्या उच्च भूमिकेवरूनच ती त्यांच्याकडे तुच्छतेनें पहात होती.

गोपीनाथ हा या साऱ्या जोडीदारांना अपवाद होता. आणि मधुकर ?—

तिला वाटलें, खरेंच !—मधुकरची आठवण आपल्याला कां झाली नाहीं ? बालपणापासूनचा जिव्हाळ्याचा संबंध तोडून आपल्यापायीं गोपीनाथ आपल्या पायाशीं यायला तयार झाला ! पश्चात्तापानें पावन झालेला मधुकर आपली क्षमा मागून आपल्या घरीं आला, घराण्याचा मित्र बनला, पण आपल्याबद्दल तो असा बेफिकिर कां ? गोपीनाथच्या मनांत जी भावना उत्पन्न झाली, तसलीच भावना मधुकरच्या मनांत कां उत्पन्न होऊं नये ? विद्यार्थिनींच्या भोंवतीं घोंटाळण्याबद्दल मधुकरची फार प्रख्याती होती. पण आतां त्यानें ती वृत्ति सोडून दिल्याचें दिसून येत होतें. जोडीदारांचे घोळके जमवून इतरांची टिंगल करीत रहाण्याची वृत्ति आतां त्याच्याठायीं राहिली नव्हती.

आपल्या आईच्या सहवासाचा हा परिणाम असावा असें तारिणीला वाटलें. त्याबरोबरच तिला हाही प्रश्न पडला, कीं गोपीनाथांत आणि मधुकरांत हा असा फरक कां झाला ? कुणाही तरुणीच्या मागें लागण्याची मधुकरची पूर्वीची वृत्ति गोपीनाथच्या ठिकाणीं उत्पन्न झाली नव्हती. पण एकप्रकारें निश्चित परिस्थितीची कल्पना झाल्यामुळें यापूर्वी तो इतर कुणाही तरुणीकडे ढुंकून-सुद्धां पहात नसे. तो परिस्थितीचा निश्चितपणा अबाधित असतांनासुद्धां आतां—नुसत्या एकीकडेच कां होईना—त्याची दृष्टि कां वळली ? शारदा-बाईच्या सहवासानें मधुकराची गढूळ वृत्ति निर्मळ झाली, तशीच आपल्या सहवासानें गोपीनाथची निर्मळ वृत्ति गढूळ होऊं लागली का ?

या प्रश्नाचें उत्तर तिला देतां येईना. उगीच मेंदूला त्रास होऊं नये म्हणून हे विचार डोक्यांतून काढून टाकायचा प्रयत्न जितका करावा, तितकेंच तें विचारांचें चक्र अधिकाधिक फिरूं लागतें, असें वाटूं लागल्यामुळें तिनें अभ्यासाचीं पुस्तकें पुनः हातीं घेतलीं.

विश्रांतीची कल्पना बाजूला सारून अभ्यासाकडे पुनः चित्त लावल्यामुळें झालेला विक्षेप दूर झाला. कोणत्याही इतर विषयापेक्षां अभ्यासावर तिचें लक्ष्य जास्त स्थिरावत असे. सर्वांना दिपवून टाकण्याचा महत्त्वाकांक्षेनें अभ्यासांत लक्ष गुंतवायला सुरवात केलेली असल्यामुळें, त्या ध्येयाला हात घालतांच हृदयांत उत्पन्न झालेली नवी खळबळ आपोआप बंद पडली.

परीक्षा झाली. अपेक्षेप्रमाणें आपण तींतून उत्तीर्ण होऊं असें तारिणीला वाटलें. गोपीनाथ मात्र आपल्या अपेक्षेप्रमाणेंच साशंक होता. केलेल्या निश्चयाला अनुसरून तो तारिणीकडे यायचा बंद झाला होता. परीक्षा झाल्यानंतर ते जुने प्रश्न तारिणीच्या मनांत पुनः घोळूं लागले. गोपीनाथ तर येत नव्हताच. त्याला मुद्दाम बोलावणें पाठवण्याइतका कमीपणा घ्यायला तिचें मन तयार होत नव्हतें म्हणूनच ती स्वस्थ राहिली.

पण मनाची खळबळ कांहीं केल्या थांबत नव्हती. कुठें तरी तोंड फोडल्याशिवाय ती खळबळ थांबणार नाहीं असें तिला वाटलें.

त्या दिवशीं मधुकर नित्याप्रमाणें घरीं आला त्यावेळीं शारदाबाई बाहेर गेली होती. परीक्षेच्या दिवसांतसुद्धां त्यानें आपला हा नित्यक्रम बंद केला नव्हता या गोष्टीचें शारदाबाईदेखील कौतुक करीत.

शारदाबाई येण्याची वाट पहात तो बसला असतां सहज तारिणी त्या खोलींत गेली.

आतां अभ्यासाची सबब राहिली नव्हती. गृहस्थपणाला अनुसरून त्याची विचारपूस करणें अवश्य आहे असें वाटल्यावरून तारिणी म्हणाली, " कसे काय गेले आहेत पेपर ? "

" कुणी पर्वा केली आहे त्याची ? " बेफिकिरपणें हंसून मधुकर म्हणाला, " हातीं पेपर येतांच जें वाटलें तें लिहीत गेलों आहें. फारसा विचारच केला नाहीं पेपर लिहीतांना. असंच आहे हें माझं ! माझा स्वभावदोष आहे तो ! कसल्याच गोष्टीची मी कधींच फिकीर केली नाहीं. म्हणूनच माझ्या हातून पुनः पुनः चुका घडल्या आणि पुनः पुनः मी ताळ्यावरही आलों. कांहींतरी

लिहून गेलों आहें खरा. पास होईन असं वाटतंय. यापेक्षां जास्त कांहीं अपेक्षा मी केलीच नाहीं केव्हां !"

विषय संपल्यासारखा झाला होता. पुढें काय बोलावें तें तारिणीला सुचेना. ती तशीच उभी राहिली होती असें पाहून मधुकर म्हणाला, "बसा ना. आतां कांहीं अभ्यासाचा व्याप नाहीं मागं. बसा ना !—" मोठमोठ्यानें हंसून तो म्हणाला, "काय वेडा आहें मी. तुमच्याच घरीं मी तुमचें स्वागत करायच्या गोष्टी बोलतों आहें. जसा कांहीं मीच या घरचा आणि तुम्ही इथं पाहुण्या आलां आहांत—" अगदीं नाजुक हंसून तो उठून उभा राहून म्हणाला, "—असं नाहीं वाटलं तुम्हाला ? बसा ना."

त्या त्याच्या उद्गारांचें तारिणीलाही कौतुक वाटलें. तीसुद्धां हसूं लागली. समोरच्या खुर्चीवर बसून ती म्हणाली, "बसा ना. तुम्ही कां उभे राहिलांत ? तुम्हाला वाटलं तें कांहीं खोटं नाहीं. या तुमच्या बैठकीपुरती तरी मी पाहुणी आहें आणि तुम्ही स्थायिक आहांत. अभ्यासाच्या हव्यासानं आज कित्येक दिवस मी ही खोली वर्ज्य केली होती. कधींच आलें नव्हतें मी इथं. तो बोजा आतां उतरला तेव्हां या खोलीची आठवण झाली ! इतकी पुस्तकांत डोकं खुपसून बसलें होतें, कीं आतां इथं आई आली तर तीसुद्धां मला पाहुणी आल्यासारखी वाटेल. एकाद्या भयंकर दुखण्यांत बिछान्याला खिळून पडावं, रोग्याची खोली सुटूं नये, अन् फारा दिवसांनीं बरं वाटल्यावर त्या खोलीबाहेर येऊन पहावं तेव्हां ओळखीची जागासुद्धां जशी नवी नवी वाटूं लागते, तसंच आतां वाटतंय मला !" मधुकर मोठमोठ्यानें हसूं लागला. त्याचें तें हसणें तारिणीला मोठें मोहक वाटलें. ती म्हणाली, "कां हंसलांत ?"

"मला जुनी आठवण झाली." मधुकर म्हणाला, "मी टायफॉइडमधून उठलों तेव्हां अगदीं अस्संच वाटलं होतं मला. पण अभ्यास करायसाठीं जेठा मारून बसणं अन् टायफॉइडनं अंथरूण धरणं, यांची जी तुम्ही तुलना केलीत ती ऐकूनच मला मोठी गंमत वाटली !—चट्कन् साऱ्या आठवणी भराभर नजरेसमोरून निघून गेल्या तेव्हां वाटलं, कीं ही तुमची तुलना अगदीं अचुक आहे. हा अभ्यास म्हणजे जिवावरचं दुखणंच आहे अगदीं. म्हणूनच मी कधीं अभ्यासाची फारशी पर्वा केली नाहीं. तुम्ही तरी इतका जीव सांडून कां बसताहांत या परीक्षेसाठीं, तेंच मला कळत नाहीं. क्लास मिळवून काय असं मोठंसं होणार आहे ? काल क्लास मिळवलेलीं माणसं जगाच्या हिशेबीं आज

कीडमुंगी होऊन गेलीं आहेत. तुमच्या आईकडेसच पहा, कुठं कुठल्या परीक्षा दिल्या आहेत त्यांनीं ? कुठले क्लास कधीं मिळवले होते त्यांनीं ? पण आतां त्यांचींच पुस्तकं अभ्यासून आम्हाला क्लास मिळवावे लागताहेत ना ?—"

"हेंच—अगदीं हेंच !—" तारिणी म्हणाली, "अभ्यासांत माझा जीव इतका सुंदर रमतोय त्याचं कारण हेंच. पदवी नसल्याचं आईला जाणवतं. एवढी मोठी कीर्ति झालीय तरीसुद्धां बोलणारे वारंवार तें व्यंग काढतात. आपल्या मुलीच्या ठायीं तें व्यंग राहूं नये ही आईची पहिल्यापासूनची इच्छा— त्या आईच्या इच्छेला मान देऊनच मी अभ्यासांत एवढं मन गुंतवलं होतं."

"आतां नवीन काय लिहिणार आहांत ?" मधुकर जरा गंभीर होऊन म्हणाला, "रिझल्ट लागेपर्यंत सहज एकादं पुस्तक लिहून होईल—नाहीं ? पुढं पुनः अभ्यासाच्या मागं लागायचं असेलच ?"

"अर्थात् !" तारिणी म्हणाली, "हें परीक्षेचं लोण शेवटपर्यंत पोंचवायचं ठरवलंय मी ! एम्. ए. झाल्यावर डी. लीट्‌चासुद्धां प्रयत्न करणार आहें. अगदीं एवढीसुद्धां उणीव राहूं द्यायची नाहीं मला !"

"तुमची महत्त्वाकांक्षा फार जबर आहे." मधुकर म्हणाला, "असले गगनाला गवसणी घालायचे विचार आमच्या कल्पनेंतसुद्धां येत नाहींत. उद्यां बी. ए. झालोंच तर कुठंतरी लगेच नोकरी पत्करावी लागणार आहे मला. माझी गृहस्थिति कांहीं तितकीशी चांगली नाहीं. बाबांच्या अंगावर कुटुंबाचा मोठा बोजा आहे. त्यांचा भार हलका करायला सुरवात केली पाहिजे मला."

"आणि लग्न नाहीं का करणार ?" तारिणी चट्‌कन् बोलून गेली. तोंडून उद्गार गेल्यानंतर आपण तसा प्रश्न केला नसता तर बरें झालें असतें, असें तिला वाटलें.

"बाबांचा भार हलका करायच्या गोष्टी मी बोलत होतों." मधुकर आणखी थोडा जास्त गंभीर होऊन म्हणाला, "आजपर्यंत मी फार उनाडलों, फार चाळे केले, लहानपणापासूनच मी मोठा खोडकर—बाबांच्या हातचा खूप चोप खाल्ला आहे मी—पण अगदीं अलिकडे अलिकडेच मला विचार करायची बुद्धि होऊं लागली आहे. ही लढाई सुरू झाल्यापासून महागाई वाढत चालली आहे. या महिन्याची त्या महिन्याशीं गांठ पाडायला बाबांना मोठं कठीण जातंय. लग्न करावं असं मनांत आलं तरीसुद्धां लग्न करायची वेळ ही नव्हे, असं

वाटतंय मला. मला बाबांचा भार हलका करायचा आहे—आणखी एक धोंडा आणून त्यांच्या गळ्यांत बांधायचा नाहीं."

एकदां बोलायला सुरवात केल्यावर माघार घेणें तारिणीला बरें वाटलें नाहीं. मनाविरुद्ध ती म्हणाली, "धोंडा कां म्हणतां—एकादी मिळवती बायकोच मिळणं कांहीं अशक्य नाहीं आत्तांच्या कालांत!"

"बाबांना पटायचं नाहीं तें." मधुकर हंसून म्हणाला, "ते आहेत अगदीं जुन्या काळचे. शाळा कॉलेजांत जाणाऱ्यासुद्धां मुली त्यांना आवडत नाहींत. माझ्या तिन्ही बहिणींनीं इंग्रजी शाळेचं तोंड कांहीं पाहीलं नाहीं. पण चांगल्या सुखानं नांदताहेत त्या आपल्या घरीं!—" दचकल्यासारखं करून तो म्हणाला, "अजून बाईसाहेब कशा आल्या नाहींत? आज काम होतं मला. रोजचा नियम मोडूं नये म्हणून आलों होतों—" हातांतल्या घड्याळाकडे पाहून तो म्हणाला, "छेः! आतां गेलंच पाहिजे, नाहीं तर बाबांचा उगीच राग व्हायचा. आतां तुम्ही मोकळ्या झालां आहांत. आतां कांहीं दुसरी ओढ नाहीं तुमच्यामागं. आतां होतीलच आपल्या बैठकी रोज यावेळीं. तुमचा निरोप घेतों. माफ करा हं." असें म्हणून तो घाईघाईनें निघून गेला.

तारिणीला आश्चर्य वाटलें. कांहींतरी कारण काढून मुद्दामच तो निघून गेला असावा असा तिला संशय आला. एकादा अप्रिय विषय सुरू झाला म्हणजे त्याची चर्चा तोडून टाकायला माणूस ज्या प्रकारचा उपाय योजतो, त्याच प्रकारचा हा उपाय त्यानें योजला असावा.

गोष्ट क्षुल्लक खरी, पण तारिणीच्या ती मनाला लागून राहिली.

---

# ९ अटकळी

मधुकर आणि तारिणी या दोघांचें जें संभाषण झालें तें ऐकायला एक साक्षीदार व्यक्ति तिथें हजर होती हें त्या दोघांनाही माहीत नव्हतें. तसें पाहिलें तर त्या भाषणांत विशेष असें कांहीं नव्हतें. त्या अगदींच शिळोप्याच्या गोष्टी होत्या. पण मधुकरच्या स्वभावाचा अंदाज घेण्यासाठीं टपून बसलेली चंपा मात्र आड राहून त्यावेळीं त्याच्या भाषणाचा रोंख अजमावीत प्रत्येक शब्द अगदीं टिपून घेत होती.

शरयूनें सांगितलेल्या हकिकतीचा उपयोग कसा करावा याचा चंपेला विचार पडला होता. प्रत्यक्ष तारिणीला तिनें विचारलें असतें, तर या गोष्टी आपल्याला न सांगतां शरयूनें चंपेला सांगितल्या म्हणून तारिणीनें उगीच गैरसमज करून घेतला असता. गोपीनाथला विचारण्यांत कांहीं अर्थ नव्हता. कारण या प्रकरणांतला खरा आसामी तो होता. मधुकरला विचारणेंही इष्ट नव्हतें. तो चांगलाच धूर्त आहे याची अटकळ चंपेला आली होती. म्हणूनच त्या विषयाला तोंड कसें फोडावें याचा चंपेला विचार पडला.

गोपीनाथनें हल्लीं येणें बंद केलें होतें हें जरी चंपेच्या ध्यानीं आलें होतें, तरी शारदाबाईंना त्याचा पत्ता नव्हता. गोपीनाथ आणि तारिणी अभ्यासासाठीं तारिणीच्या खोलींत बसत असल्यामुळें तो केव्हां आला आणि केव्हां गेला याचा शारदाबाईला पत्ताच नसे. म्हणूनच आतां तो येत नव्हता याची जाणीव तिला झाली नाहीं.

चंपेनें पुनः शरयूची भेट घेतली. गोपीनाथ अलिकडे तारिणीच्या घरीं जायचा बंद झाल्याचें ऐकून शरयूला आश्चर्य वाटलें. कारण तो तिच्याही घरीं येत नव्हता. शरयू सहसा गोपीनाथच्या घरीं जात नसे—तिच्या घरीं येत असे काय तो गोपीनाथ. अलिकडे बरेच दिवस त्याचें येणें विरळ झालें होतें म्हणूनच आतां तो मुळींच यायचा बंद झाल्याचें तिला जाणवलें नव्हतें.

ही हकीकत चंपेला तिनें सांगितली त्यावेळीं तिला फारसें आश्चर्य वाटलें नाहीं. गोपीनाथ आणि मधुकर या दोघां माणसांबद्दल चंपेचें मन कलुषित झालेलें होतें. अलिकडल्या कुठल्याही तरुणाबद्दल चंपेला फारसा आदर नव्हता. पण गोपीनाथ आणि मधुकर यांपैकीं जास्त लबाड कोण तें पुराव्यानिशीं ठरवून घेण्यासाठीं तिचा हा अट्टाहास चालला होता. मधुकरच्या विरुद्ध कांहींच पुरावा नव्हता. तिच्या मतानें गोपीनाथनेंच सार्‍या भानगडी केल्या होत्या.

ती शरयूला म्हणाली, " अगदीं पहिल्यापासूनची हकीकत आठवून पहा शरयू. गोपीनाथचा आमचा परिचय झाला, तो तो एक शारदाबाईचा भक्त म्हणून. ती शारदाबाईविषयींची भक्ति बाजूला ठेवून तो तारिणीला अभ्यासांत मदत करूं लागला. तुझं त्याचं लग्न ठरलेलं, तुझ्यापेक्षां तो जास्त शिकलेला, तुझीही परीक्षा जवळ आली होती—तर तुला अभ्यासांत मदत करण्याऐवजीं तारिणीकडे तो कशाला वळला ?—"

"त्याची न् तारिणीची परीक्षा एकच होती म्हणून!" शरयू म्हणाली, "माझ्या अभ्यासाकडे तो लक्ष द्यायला गेला असता तर त्याचा अभ्यास बाजूला नसता का पडला? तारिणीबरोबर अभ्यास करण्यांत त्याचंही काम होत होतं—असंच नाहीं का?"

"आतां तूं त्याची तरफदारी करूं लागलीस!" चंपा म्हणाली.

"ही तरफदारी नव्हे—" शरयू म्हणाली, "या बाबतींत तरी तो दोषी नाहीं. मधुकरबद्दल जी हकीगत मला सांगितली ती त्यानं कबूल केल्याप्रमाणें त्यानं तारिणीला सांगितली कीं नाहीं एवढंच मला पाहिजे आहे."

"मग विचार ना त्यालाच!"

"कशी विचारूं? तो भेटायचंच टाळतो आहे."

"या पूर्वीच कां नाहीं विचारलंस?"

"त्यानं ती हकिकत तारिणीला सांगितली असंच धरून मी चालतेंय. पण आतां तूं ही जी मधुकरची हकीकत सांगितलीस त्यावरून तारिणीला त्यानं तसं सांगितलं असेल असं कांहीं मला वाटत नाहीं. चट्‌कन् पूर्वग्रह करून घ्यायची तारिणीला संवय आहे. ती हकीकत तिला कळली असती तर तारिणी इतक्या शांतपणें मधुकरशीं बोलली नसती."

"खरं आहे तें. मला सुद्धां तसंच वाटतं. आतां संशय येतोय तो असा, कीं गोपीनाथनं तुला मधुकरबद्दल जें कांहीं सांगितलं तें देखील बनावट नसेल ना! तसंच असेल असं कांहीं मी म्हणत नाहीं—मुद्दाम तो बनवाबनवी करील असेल असाही माझा आरोप नाहीं—पण एकदां माणूस खोटं बोलला कीं तें पचवण्यासाठीं त्याला आणखीं खोटं बोलावं लागतं, तसंच कांहींतरी झालं असावं."

"एकदां विचारून पाहूं का त्याला?"

क्षणभर विचार करून चंपा म्हणाली, "मला वाटत न विचारणंच बरं. कांहींतरी विचारायला गेलीस तर आणखी जास्त खोटं बोलावं लागेल त्याला. कदाचित् मुळांत कांहींच नसेल. तुम्हां तरुण मुलांचं चुकतं तें इथंच! मनांत असेल तें साफ बोलून टाकावं. स्पष्ट बोलल्याचे परिणाम सहसा वाईट होत नाहींत. एकदां लपवाछपवीला सुरवात झाली म्हणजे तिची मजल कुठवर जाईल तें सांगतां येत नसतं. मला वाटतंय, मधुकरपेक्षां गोपीनाथ जास्त सरळ आहे. डावपेंच करायची संवय नसल्यामुळं त्याच्या हातून या अशा चुका होताहेत.

कांहीं दिवस स्वस्थ राहून पहा—मी पहातेंच आहें—सारखी माझी नजर आहे तुम्हां साऱ्यांजणांवर—"

" म्हणूनच मी निर्धास्त आहें. " शरयू म्हणाली, " तरीपण हल्लीं माझं मन अगदीं अस्वस्थ झालंय. कॉलेजच्या दृष्टीनं आतां आमच्या दोन वाटा होणार आहेत. यंदा मी पास झालें तरी मला अजून दोन वर्षं काढायचीं आहेत. गोपीनाथ कदाचित् लॉ कॉलेजांत जाईल. अन् मग त्याची भेट होणं सुद्धां मुष्किलीचं होईल. "

" किती वेडी आहेस ग शरयू !" तिचा एक गालगुच्चा घेऊन चंपा म्हणाली, " तुम्ही शेजारीं आहांत ना दोघं ? तो नाहीं आला तर आपण जावं—जातां येत नसेल तुमच्या घरीं, तर त्याला एकदां बोलावणं पाठवावं. आपली बायकांची जात—पड खाली पाहिजे आपण—खोटा अभिमान धरून हट्टानं स्वस्थ राहिलीस तर जन्माचं नुकसान करून घेशील—" शरयूला जवळ घेऊन कुरवाळून चंपा म्हणाली, " कॉलेजांत गेलीस, विद्वान झालीस तरीसुद्धां अजून पोरच आहेस तूं. त्यांतून आमची ही जात—संसारी माणसांचे व्यवहार आम्हांला चांगलेसे कळत नाहींत. बिनसंसाराचीं आम्ही संसारी माणसं—कुटुंबांतले संबंध कसे असतात ते अजून चांगलेसे कळत नाहींत आम्हांला. मी आतां चांगली रुळलेंय त्यांत, म्हणून मला थोडथोडं कळूं लागलंय. तरी पण संसारी माणसाच्या दृष्टीनं संसाराकडे कसं पहायचं हें अजूनही मला तितकंसं कळत नाहीं. म्हणूनच वाटतं, कीं तुझ्यासारख्या पोरी संसारांत पडाव्या. मग तरी कांहीं कळूं लागेल. पण अलिकडच्या तरुणांचीं हीं असलीं चरित्रं पाहिलीं, कीं पुनः पुनः मन कच खातं. आमच्यासारख्या पतितांचं भवितव्य चांगल्या माणसांच्या हातीं कधीं जाणार आहे ?"

शरयू तरी काय सांगणार होती ? तिला जगाचा अनुभव मुळींच नव्हता. एका गोपीनाथवर तिचा सारा विश्वास होता. त्याच्यापलीकडे आपली नजर तिनें जाऊं दिली नव्हती. म्हणूनच परिस्थितींतील बऱ्यावाईटाची तुलना करण्याचें सामर्थ्य तिच्या दृष्टींत आलें नव्हतें. चंपा वडील होती—तिची आई शोभण्याइतकी वडील होती—ती मार्गप्रदर्शन करायला असमर्थ ठरलेली पाहून शरयूला हताश वाटूं लागलें.

तो विषय तेवढाच राहिला.

बैठका तशाच चालू होत्या. आतां तारिणीसुद्धां त्या बैठकांत भाग घेऊं

लागली होती. त्यामुळें मधुकरशीं तिचें जास्त संघटण व्हायला सुरवात झाली होती. गोपीनाथनें एकदां जें घर वर्ज्य केलें तें केलेंच. मुद्दाम त्याची चौकशी करायची नाहीं असें तारिणीनें ठरवलें होतें.

तारिणीची महत्त्वाकांक्षा पुरी झाली. बी. ए. च्या परीक्षेंत फर्स्टक्लासमधें ती पहिली आली. गोपीनाथही फर्स्टक्लासमधेंच आला होता. मधुकर पास होईल कीं नाहीं अशी शंका असतांना सेकंडक्लासमधें तो पहिला आल्याचें पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलें—तारिणीलासुद्धां आश्चर्य वाटलें. लोकांच्या दृष्टीनें तो उनाडत होता, दररोज शारदाबाईंच्या बैठकींत वेळ घालवीत होता, कॉलेजमधल्या वेगवेगळ्या चळवळींत पूर्वीइतकाच भाग घेत होता, मांडी मोडून अभ्यासाला बसल्याचें लक्षण त्यानें कधींच दिसूं दिलें नसतां तो परीक्षेंत इतका वर आला, याचें कुणाला कां आश्चर्य वाटूं नये? तारिणीला वाटलें, मन लावून त्यानें अभ्यास केला असता तर नुसता फर्स्टक्लासांतच नव्हे, तर साऱ्या परीक्षेंत पहिला नंबर मिळवणें त्याला अशक्य झालें नसतें. बेफिकिर वृत्ती-मुळेंच त्यानें ही संधि घालवली, असें तारिणी म्हणाली त्यावेळीं मधुकरनें उत्तर दिलें, "या असल्या परीक्षांचं आणि क्लासांचं मला मुळींच महत्त्व वाटत नाहीं. आजपर्यंत थोड्या माणसांनीं का हे क्लास मिळवले? पण त्याचा परिणाम काय झाला? चार दिवस कौतुक झालं तेवढंच. जगाच्या इतिहासांत पुढं त्यांचं नांवसुद्धां नाहीं. तसं पाहिलं तर या पदव्यांचंसुद्धां मला कांहीं चोज वाटत नाहीं. कांहीं तरी टिक्का असल्याशिवाय जगाच्या व्यवहारांत जागा मिळत नाहीं म्हणूनच मी या भानगडींत पडलों. कॉलेजांत जाऊन असं काय आपण शिकतों आहोंत? असं काय ज्ञानार्जन करतों आहोंत? चार ठराविक पुस्तकांच्या अभ्यासापलीकडे कोणत्याही विषयाचं पुरं ज्ञान कितीसं मिळतंय आपल्याला? आज पदवीधर झालेले जे कुणी चार जण नांवा-लौकिकाला आले आहेत, ते कांहीं या कॉलेजांत मिळणाऱ्या शिक्षणाच्या जोरावर नव्हेत. युनिव्हर्सिटीच्या पदव्या घेऊन बाहेर पडल्यावर नंतर त्यांनीं जो कांहीं व्यासंग केला, तोच त्यांना उपयोगी पडला आहे. त्या स्वतंत्र रीतीनं केलेल्या अभ्यासाचं चीज व्हायला जगाच्या दृष्टीनं जी कांहीं एक बैठक लागते, तेवढ्या-पुरतंच या पदवीचं महत्त्व असतं. पुढल्या व्यवहारांत कुणी कुठला क्लास मिळवला, कीं त्याचा कितवा नंबर आला, हें कोण हिशेबांत घेतोय? मी हा विचारच केला नाहीं. आईबाबांची इच्छा, कीं मी पदवीधर व्हावं.

युनिव्हर्सिटीच्या क्षेत्रांत जेवढं नांव गाजवतां येईल तेवढं गाजवावं. एवढ्या-साठींच मी झटतों आहें.—पुढं काय करायचा विचार आहे तुमचा ? "

" आतां एम्. एच्या अभ्यासाला सुरवात करणार आहें. "

" तें मला माहीत आहे. पण पुढं तुम्ही काय करणार आहांत ? व्यवसाय कोणता पत्करणार ? आयुष्याचं कोणतं ध्येय ठरवलंय तुम्हीं ? "

" आधीं या परीक्षांच्या प्रपंचांतून मला बाहेर पडूं दे. काय करायचं तें मग ठरवतां येईल. "

" माफ करा हं—" मधुकर मोठ्या मिनतवारीनें म्हणाला, " माझ्या बोल-ण्याचा राग मानूं नका. अगदीं मन मोकळं करून मी बोलणार आहें. त्यांत माझं कांहीं चुकलं—कांहीं उणाअधिक शब्द गेला—तर आधींच मी माफी मागून ठेवतों. आतां अगदीं स्पष्ट बोलायचंय मला. पहिल्यापासूनच तुमची ही चूक होतेय. माणसानं या परीक्षांच्या प्रपंचांतून पार पडण्यापूर्वी आधीं आपल्या आयुष्याचं ध्येय ठरवलं पाहिजे अन् त्याच्या अनुरोधानं पुढं हा परीक्षांचा पसारा वाढवायचा कीं आंखूड करायचा हें निश्चित केलं पाहिजे. यांत मी कांहीं नवीन सांगत नाहीं. एवढं खरं, प्रत्येक विद्यार्थ्याच्या हातून रोज हीच चूक होतेय. सारखं परीक्षा देत सुटायचं, विचारच करायचा नाहीं, म्हणूनच बी. ए. एलूएल्. बी. होऊन कुणी मास्तर होतात, तर कुणी कारकून होतात. एम्. एस. सी. झालेल्या किती विद्यार्थ्यांनीं नवे शोध लावले आहेत ? बी. कॉम् झालेल्या किती जणांनीं व्यापारी पेठेंत नांव कमावलं आहे ? कुठं तरी नोकरी मिळवण्याकडेच बहुतेकांचं लक्ष असतं. तुम्हांला कांहीं नोकरी करायला नको आहे म्हणूनच मी विचारतों, कीं तुम्ही पुढं काय ठरवलं आहे ? "

तारिणी क्षणभर उगीच राहिली. तिला उत्तर सुचत नव्हतें. या विषयाचा तिनें विचारच केला नव्हता—विचार करण्याची जाणीवसुद्धां तिला झाली नव्हती. ती अशी पेंचांत पडलेली पाहून मधुकर म्हणाला, " माफ करा हं. तुम्हाला अडवण्यासाठीं मी हे प्रश्न केले नाहींत. मी एक उनाड मुलगा आहें असंच सर्वांना वाटतं. तशीच आहे माझी वागणूक. पण आज हा विषय काढ-ल्यामुळं मला माझं हृदय उघड करावं लागतंय. खरोखरच मी एक लबाड माणूस आहें—आश्चर्य वाटूं देऊं नका—खरोखरच मी लबाड आहें ! त्या लबाडीचा अर्थ व्यावहारिक घ्यायचा नाहीं—तात्विक दृष्टीनं मी लबाड आहें. असायचं एक अन् दाखवायचं भलतंच, अशी ज्याची वागणूक असते त्याला

लबाड म्हणतात. माझी वागणूक तशीच आहे. पण ही माझी लबाडी माझ्यापुरती आहे. त्या लबाडींत दुसऱ्याच्या घातपाताचा उद्देश नाहीं. या लबाडीपायीं झाला तर माझाच घात होईल—त्याची मला पर्वा नाहीं. माझ्या बाहेरच्या वर्तनामुळं लोकांना माझं अंतरंग कळूं नये, अशीच माझी इच्छा आहे. उजळ माथ्यानं वावरतांना मला जगाशीं चोरून रहायचं आहे. त्यासाठींच मी अशी लबाडी करतों आहें! माझं अंतरंग माझा मीच काय तो एक जाणतों. इतरांना त्याचा पत्ता लागूं देत नाहीं—उघडं हृदय ठेवल्यामुळं जगानं माझ्या अंतःकरणांतल्या साऱ्या खांचाखोंचा पहाव्या हें मला पटत नाहीं. म्हणूनच माझ्या त्या उघड्या हृदयावर झांकण घालून मी जगाला फसवतों आहें. या लबाडीनं मी कदाचित् माझा मलाच फसवीत असेन. पण दुसऱ्या कुणाचं नुकसान माझ्या या लबाडीमुळं होऊं नये याची मात्र मी पूर्ण खबरदारी घेतों आहें—" तो मनाच्या आवेगानें बोलत होता. त्या बोलण्यामुळें त्याला एक प्रकारचा थकवा आल्यासारखें दिसलें. तो थकवा तारिणीला दिसूं नये म्हणून उसनें अवसान आणून तो म्हणाला, " एव्हांच मी माझं हृदय तुमच्याकडे उघडं करणार नव्हतों पण बोलण्याच्या भरांत माझं अवसान सुटलं—मी बोलून गेलों—मला त्याचा पश्चात्ताप होत नाहीं—केव्हांतरी तें बोलून टाकलंच पाहिजे होतं. जगाला मी फसवीत असलों तरी तुमची फसवणूक करायचं पाप माझ्याहातून घडूं नये, अशी एक जी जाणीव अंतरांत कुठंतरी जागृत होती त्यामुळंच मी हें असं बोलून गेलों. हें सारं कांहीं ऐकल्यानंतर तुम्हाला माझ्याबद्दल तिटकारा आला असेल तर मला तसं स्पष्ट सांगा. यापुढं या घरांत मी पाऊलसुद्धां टाकणार नाहीं. अप्रिय होऊन इथं येत रहावं अशी माझी मुळींच इच्छा नाहीं—"

" जरा थांबा." तारिणी म्हणाली, " आईला सुद्धां सांगितलंयत का हें सारं ?"

" नाहीं." मधुकर चटकन् म्हणाला, " हें तुमच्याकडे बोललों तें सुद्धां एकप्रकारें चुकूनच. पण बाईसाहेबांकडे या गोष्टी मी मुळींच बोलणार नाहीं. त्यांच्याकडे बोलायच्या या गोष्टी नव्हत. वडील माणसांना कोणत्या गोष्टी सांगाव्या आणि कोणत्या सांगूं नयेत, याला कांहीं मर्यादा आहे. ती प्रतारणा नव्हे—तो सरळ व्यवहार आहे. तरुणांचीं मनं तरुणांना कळतात. प्रौढांचा किंवा वृद्धांचा तरुणांच्या वृत्तीकडे पहायचा दृष्टिकोण अविकृत नसतो. त्यांचीं

कांहीं ठाम मतं ठरलेलीं असतात. त्या ठाम मतांच्या विरुद्ध झालेल्या गोष्टी त्यांना पटत नाहींत. म्हणूनच बाईसाहेबांना मी कांहीं सांगितलं नाहीं. एकदां सांगणार आहें—पण तें चंपामावशींना. मला वाटतं, त्यांना माझं अंतरंग कळेल—"

" हें कसं कळलं तुम्हाला ? " तारिणीनें चकित होऊन विचारलें.

" तें भाग्य मला एके दिवशीं अचानक लाभलं." फुललेल्या मुद्रेनें मधुकर म्हणाला, " एक दिवस अचानक त्यांचा प्रत्यक्ष परिचय झाला अन् तेव्हांपासून माझा त्यांच्याबद्दलचा आदर दिवसेंदिवस वाढूंच लागला आहे. म्हणूनच त्यांना मी सांगणार आहें. पण त्यांना सांगायचं तें त्यांच्या भाषेनंच सांगितलं पाहिजे—" क्षणभर थांबून तो म्हणाला, " मी मोठा विचित्र माणूस आहें असं तुम्हाला वाटत असेल—नाहीं ? मी विचित्र असलों तरी विक्षिप्त नाहीं. दिसायला माझी वागणूक कशीही असो पण मी जें कांहीं करतों तें अगदीं आंखून करतों. भावनेच्या आहारीं जाऊन आपल्या हातून कोणताही अविचार घडूं नये हा माझा बाणा आहे. म्हणूनच मला कधीं पश्चात्ताप होत नाहीं. आजवर मी पुष्कळ चुका केल्या आहेत पण त्या अगदीं बुद्धिपुरस्सर केल्या आहेत—म्हणूनच मला त्याबद्दल कधीं खंत वाटत नाहीं. हें जग वेडं आहे तारिणी—" तो एकदम थांबला. आपली चूक त्याच्या लक्षांत आली आणि तो म्हणाला, "—मी चट्कन् एकेरी हाक मारली त्याची मला क्षमा करा. ही मात्र खरोखरच चूक झाली. ठरवून कांहीं तसं म्हटलं नव्हतं मी —"

" म्हटलं म्हणून काय बिघडलं ? " तारिणी म्हणाली, " एवढ्या परिचयानंतर अहोजाहो शब्द कसे कर्णकटू लागतात ! "

" थँक यू ! " मधुकर म्हणाला, " मला वाटतं मी फार बोललों. एकाच वेळीं सारं कांहीं बोलून टाकणं बरं नव्हे. पण मला सांगायचं तें एवढंच, कीं हें तुझं धोरण कांहीं मला पटत नाहीं. तुझी आई सज्जन आहे, वत्सल आहे, तुझा तिला केवढा तरी मोठा अभिमान वाटतो—तिचं मार्गदर्शन चुकीचं व्हायचं नाहीं हेंही खरं आहे—तरीही मी म्हणतों, एवढ्या वयानंतर परावलंबी रहाणं कांहीं बरं नाहीं—मग तें परावलंबन वत्सल मातेचं कां असेना ? परावलंबी वृत्तीनं माणूस पश्चात्तापांत पडतो. माणसानं आपलं ध्येय आपणच ठरवलं पाहिजे. शक्य तितक्या लवकर तें ध्येय तूं ठरवून टाकावं

असं मला वाटतं. वाटलं तर मला सांगूं नकोस—पण पुढल्या अभ्यासाच्या मानगडींत पडायच्यापूर्वी एकदां आपलं ध्येय निश्चित ठरवून टाक."

रोज येणारी एकेक मंडळी यायला सुरवात झाल्यामुळें त्या दोघांची ती चर्चा तेवढीच राहिली. शारदाबाईही तितक्यांत आली. रोजच्या बैठकीला सुरवात झाली.

मनांत उत्पन्न झालेली खळबळ तशीच दाबून ठेवून, त्या दिवशीं नवीनच प्रसिद्ध झालेल्या एका तात्विक पुस्तकावर चर्चा करायला तारिणीनें सुरवात केली.

रोजची बैठक उठल्यानंतर झाल्या भाषणाबद्दल तारिणी विचार करूं लागली. गोपीनाथ आणि मधुकर या दोघांची तुलना करून पहाण्याची कल्पना यापूर्वी तिच्या मनांत कधींच आली नव्हती. एका प्रकारें या भाषणाचे हे दोन्ही प्रसंग सारख्याच स्वरूपाचे झाल्यामुळें त्या दोघांची तुलना करून पहावी असें आतां तिला वाटूं लागलें.

तिला वाटलें, या दोन माणसांत अगदीं जमीन अस्मानाचें अंतर होतें. अगदीं नकळत कां होईना, परीक्षेच्या पूर्वी गोपीनाथ तिच्याशीं जें कांहीं बोलला त्याचप्रकारें आज मधुकरही बोलला होता. दोघांच्या भाषणाचा शेवट मात्र एकच प्रकारें झाला नव्हता. गोपीनाथनें आपले मनोगत, भीतभीत कां होईना, बोलून टाकलें होतें. मधुकरनें मात्र तसें कांहीं केलें नव्हतें. त्याचें मनोगत तसेंच होतें असें धरून चालायलाही कांहीं जागा नव्हती. तरीही आपल्या विशिष्ट प्रकारच्या वृत्तीवर प्रकाश टाकायचा त्यानें जो प्रयत्न केला त्याच्या बुडाशीं तसलीच कांहींतरी भावना असावी असा तिला संशय आला.

कॉलेजांत ती सर्वांशीं फटकून वागत असे. अगदीं पहिल्याच वर्षी कांहीं कांहीं लघळ विद्यार्थ्यांनीं तिच्याशीं लगट करायचा वेडगळ प्रयत्न केला होता त्यावेळीं तिनें त्यांना योग्य बक्षिसही दिलें होतें. तेव्हांपासून आतांपर्यंत कुणी तिच्या वाटेला गेलें नव्हतें.

सौंदर्य आणि बुद्धिमत्ता यांची जोड कॉलेजच्या आवारांत क्वचितच दिसून येते. बहुतेक बुद्धिमती विद्यार्थिनी कुरूप असतात, असा कॉलेजच्या प्रपंचांतील एक प्रवाद आहे. या प्रवादाला एक तारिणीच काय ती अपवादरूप होती. म्हणूनच तिचें हें उदाहरण सर्वांच्या डोळ्यांत ठसठशीतपणें भरत होतें.

मधुकरची कीर्ति तिला माहीत होती. अलिकडे त्याचें वर्तन कॉलेजच्या प्रपंचांतसुद्धां बदललें होतें हें ती पहात होती. आपल्या आईच्या सहवासाचा

तो परिणाम आहे असें ती धरून चालत होती. पण आतां तिला कळून चुकलें, कीं मधुकर हा कांहीं इतर सामान्य विद्यार्थ्यांप्रमाणें हुच्च विद्यार्थी नव्हता. तो पूर्वीचा त्याचा उल्लूपणा आणि आतांचा सभ्यपणा या दोहोंच्याही मागें एक विशिष्ट भूमिका होती. त्या भूमिकेला अनुसरून तो आपली चालचलणूक वेळोवेळीं बदलीत होता.

सामान्य व्यवहाराच्या दृष्टीनें हें लक्षण बुद्धिमत्तेचें होतें. प्रसंग येईल तशी पाठ देणें हें व्यावहारिक धोरण असें जें समजलें जातें, त्या धोरणाला अनुसरूनच मधुकरची ही वागणूक होती.

व्यावहारिकता आणि भावनात्मकता यांतील भेद अजून तिनें पडताळला नव्हता. स्वतःची वृत्ति भावनात्मक आहे कीं व्यावहारिक आहे याचा निश्चय तिला अजूनही करतां आला नव्हता. आपलें पुस्तक लिहितांना तिनें व्यावहारिक नजर ठेवली होती. भावनात्मकतेचा पडताळा घेण्याचा प्रसंग अजून तिला आला नव्हता. कौटुंबिक व्यवहारांत ती नुसती आज्ञाधारक होती. तिची आई तिला जरबेखालीं वागवीत नव्हती खरी, पण ती तिची न जाणवणारी जरब ती स्वेच्छेनें मस्तकीं धारण करीत होती. मातृवात्सल्याचा खराखरा अनुभव तिला मिळत होता तो चंपेकडून. म्हणून भावनात्मकतेचा अंदाज घ्यायला यापूर्वी तिला कारणच मिळालें नव्हतें.

तो प्रसंग आतां आला आहे असें तिला वाटूं लागलें. एका बऱ्याच मोठ्या कर्तव्यांतून तुरा लावून पार पडल्यामुळें स्वतःकडे नजर द्यायला आतां तिची दृष्टि वळली.

शारदाबाईच्या बैठकीच्या अड्ड्यांत वृद्धांचा जसा भरणा होता तसा तरुणांचाही होता. त्या तरुणांपैकीं बरेचसे विवाहित होते. जे विवाहित नव्हते ते नवमतवादाचे पुरस्कर्ते होते. लग्नाच्या किंवा प्रेमाच्या गोष्टी काढण्यापलीकडे त्यांच्या तत्त्वज्ञानाची दृष्टी गेली नव्हती.

रहातां राहिले काय ते गोपीनाथ आणि मधुकर. गोपीनाथनें आतां त्यांचें घरच वर्ज्य केलें होतें. त्याला एकदां बोलावून घ्यावें असें तिच्या मनांत आलें. रिझल्ट लागला त्यावेळीं तिनें त्याला अभिनंदनपर पत्र पाठवलें होतें. त्याच्याकडून मात्र तसें कांहींच झालें नव्हतें. स्वतः येऊन तर राहोच, पण पत्रानें तिचें अभिनंदन करण्याइतकासुद्धां शिष्टाचार त्यानें पाळला नाहीं याचें तारिणीला आश्चर्य वाटत होतें.

मधुकर रोज येत होता त्यामुळें त्यानें अभिनंदन तर केलेंच पण आतां वडीलकीचा आव आणून उपदेश करायला देखील त्यानें जी सुरवात केली ती पाहून तिला थोडेसें कौतुक वाटलें. त्या उपदेशांत आपुलकीच्या भावनेचा वांटा फार मोठा होता. तिच्या कुणाही आप्तानें तिला असाच उपदेश केला असता.

पण तो उपदेश करतांना बेफिकीरपणानें त्यानें जी स्वतःची कैफियत मांडली तें पाहून मात्र ती चकित होऊन गेली. स्वतःचा दोष सांगायला माणसाच्या ठायीं मोठें धैर्य असावें लागतें. सकृत्‌दर्शनी दिसणारा तो दोष सांगतांना तो शरमला नव्हता. आपण लबाड आहें असें अगदीं बेडरपणानें सांगतांना त्या लबाडीचें एकाप्रकारें त्यानें श्रेष्ठीकरण केलें होतें.

लबाडी कोण करीत नाहीं ? ती लबाडी आपण करतों असें म्हणण्याचें धैर्य मात्र फारच थोड्या माणसांच्या ठायीं असतें. तें धैर्य मधुकरनें दाखवलें म्हणूनच तिला त्याच्याबद्दल आदर वाटला.

झालेली हकिकत तिनें चंपेला सांगितली तेव्हां चंपा म्हणाली, "मी आपली एक साधीभोळी बायको आहें. जगाचे डावपेंच मला कळत नाहींत. तुमच्या-सारखीं अशीं हीं बुद्धिवान माणसं केव्हां कशीं वागतील याचा अंदाज करण्याइतकी बुद्धी माझ्या गांठीला नाहीं. एवढं खरं, कीं हा मधुकर मोठा हुशार माणूस दिसतो. फार सुंदर कविता लिहितो तो. मला फार आवडतात त्याच्या कविता. अजून कुठंच प्रसिद्ध न झालेल्या आपल्या बऱ्याचशा कविता त्यानं मला वाचायला दिल्या होत्या. त्या तर फारच सुंदर होत्या. त्यांतल्या कांहीं कांहीं कविता वाचून मला वाटलं, कीं कुणातरी तरुणीवर त्याचं प्रेम जडलं आहे, तिच्यासाठीं तो वेडा झाला आहे, तिच्या अभावीं जग त्याला भयाण दिसतंय, तिचीं पावलं जिथं लागतील ती जागा पवित्र मानून तो त्या जागेची पूजा करतोय—असं आणखी पुष्कळ पुष्कळ गोड गोड वर्णन त्या कवितांत केलं होतं. त्याच्या कविताही मोठ्या सुंदर भाषेत लिहिलेल्या असतात. एवढासुद्धां उथळपणा नसतो त्यांत. अगदीं शेलीच्या कविता वाचल्याचा भास होतो—म्हणजे त्यानं शेलीचं अनुकरण केलं आहे असं मात्र नव्हे, त्या अगदीं स्वतंत्र आहेत. त्यांतल्या उपमाअलंकारांवर एवढीसुद्धां परकी छटा नाहीं म्हणूनच त्या मला फार आवडल्या. कितीतरी वेळ मी त्या पुनः पुनः वाचल्या. दुसरं असं पहा—लोकांच्या दृष्टीनं तो उनाडत होता. बहुतेक त्याचा सारा वेळ इथं जात होता. तरीसुद्धां त्याचा नंबर परीक्षेत चांगलाच वर

आला. सामान्य बुद्धीच्या माणसाला कांहीं हें जमायचं नाहीं. तो बुद्धिवान आहे यांत शंकाच नाहीं—

"आणि गोपीनाथ ?" तारिणीनें विचारलें, "तो फर्स्ट क्लासांत आला ना ?"

"अभ्यासाचा पिट्टया पाडून !" चंपा म्हणाली, "मधुकरनं थोडा जास्त अभ्यास केला असता तर मला वाटतं तुलासुद्धां पहिला नंबर मिळाला नसता."

"तें खरं आहे." तारिणी म्हणाली, "म्हणूनच तुला मी ही हकीगत सांगितली. पण त्याच्या त्या कैफियतीबद्दल काय वाटतं तुला ?"

"एकंदरींत त्याच्याबद्दल माझं मत फार चांगलं झालं आहे. आपण लबाड आहें असं जो माणूस म्हणतो तो सहसा लबाड नसतो—जगाच्या रहाटीप्रमाणें वागतांना डावपेंच लढवावे लागले कीं प्रामाणिक माणसाला वाटतं, कीं आपण लबाडी केली. जो स्वभावतःच लबाड असतो तो आपली लबाडी कधीं कबूल करीत नाहीं—आपल्या लबाडीबद्दल त्याला उलट मोठा अभिमान असतो. कसं मी दुसऱ्यांना बनवलं, असं मनांतल्या मनांत म्हणून तो जगाला हंसत असतो. मधुकर कांहीं तसा दिसत नाहीं—"

"अन् गोपीनाथ ?" तारिणीनें विचारलें.

"गोपीनाथ होय ?" चंपा म्हणाली, "त्याचा माझा फारसा परिचय नाहीं. बैठकींतसुद्धां तो कधीं फारसा बसत नाहीं. बरं, असलं कांहीं बोललाही नाहीं तो तुझ्याजवळ—होय ना ?"

"नाहीं." तारिणी गंभीर होऊन म्हणाली, "गोपीनाथ बोलला—पण तें असलं कांहीं मात्र नव्हे. शरयूशीं आपलं लग्न ठरलं याचा पश्चाताप होतोय असं म्हणाला तो माझ्याजवळ." अगदीं एकच क्षण थांबून ती म्हणाली, "—अन् तें माझ्यामुळं—अगदीं स्पष्ट म्हणाला नाहीं—आडव्या तिडव्या शब्दांनीं ध्वनित केलं त्यानं."

"बराच प्रामाणिक दिसतो म्हणायचा !" चंपा म्हणाली, "पण हें पहा तारू, या असल्या माणसांच्या भानगडींत तूं पडूं नकोस. फूल उमललं कीं भुंगे घोंघावतात. त्यांतून तें फूल वासाचं असलं—मधाचं असलं—म्हणजे फारच तारांबळ होते त्यांची. अशावेळीं त्या फुलानं आपल्याच सुवासांत गर्क होऊन रहावं. आपला मध आपणच गिळून टाकावा. दरोडा घालायला चोरांना संधी देऊं नये. माझं हें आपलं म्हातारीचं सांगणं ध्यानांत ठेव !" असें म्हणून चंपा हंसत हंसत निघून गेली.

तारिणी मात्र घोंटाळ्यांत पडली. आपल्या वत्सल माईच्या तोंडून असे कांहीं उद्गार निघतील असें तिला वाटलें नव्हतें.

---

## १० प्रश्न

इकडे ज्या या भानगडी चालल्या होत्या त्यांचा शारदाबाईंना मुळींच पत्ता नव्हता. तारिणी परीक्षा पास झाली आहे, आतां पुढल्या अभ्यासाच्या तयारीला लागणार आहे—पुढली परीक्षा देणार आहे, एवढ्याच गोष्टीवर तिची नजर होती. आपल्या कथांतून कदाचित् तिनें असे प्रसंग हाताळलेही असतील. पण प्रत्यक्ष स्वतःच्या संसाराशीं संबंध आल्यावेळीं तसेच प्रसंग आपल्या घरांत घडून येत असतील याची कल्पना तिला नव्हती.

चंपा सारें कांहीं पहात होती. संसाराचा भार शिरावर घेतलेली एक सुजाण व्यक्ति या नात्यानें, आपल्या कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीच्या चारित्र्यावर करडी नजर ठेवून ती पहात होती. तसें निरीक्षण करतांना कुणावरही हुकूम गाजवायची तिची इच्छा नव्हती.

वाङ्मयाचा अभ्यासच हिशेबीं घ्यायचा तर शारदाबाईपेक्षां चंपाच जास्त बहुश्रुत होती. पाश्चात्य वाङ्मयाचें वाचन झालेलें असल्यामुळें आधुनिक तरुणांच्या मनोभूमिकेची अचुक कल्पना तिला आलेली होती. शारदाबाई लेखिका होती खरी पण तिच्या लेखांवर पाश्चात्य संस्कारांचा परिणाम झाला नव्हता. मराठी वाङ्मय या नात्यानें तिचें वाङ्मय पूर्णपणें महाराष्ट्रीय स्वरूपाचें होतें.

पण शारदाबाईला परिचित असलेल्या त्या महाराष्ट्राचा आतां हळुहळू अस्त होऊं लागला होता. त्या महाराष्ट्राचें आतां इंग्लंडांत रूपांतर होऊं लागलें होतें याची शारदाबाईला जाणीव नव्हती. इंग्लंडच्या मराठीकरणानें निर्माण होणारी मनोभूमि म्हणूनच तिच्या वाङ्मयाच्या द्वारें प्रतीत होत नव्हती. तिच्या समकालीन लेखकांशीं तुलना केली असतां हें तिचें वैशिष्ट्य वाङ्मयदृष्ट्या अपूर्व होतें.

प्रश्न होता तो हाच, कीं हें वैशिष्ट्य म्हणजे महाराष्ट्राचा आधुनिक इतिहास होता का? चंपेला तसें वाटत नव्हतें. तिच्या दृष्टीचें आंग्लीकरण झालें नव्हतें

खरें, पण बाहेरच्या जगाचें होत असलेलें आंग्लीकरण तिला जाणवत होतें आणि त्याच दृष्टीनें ती तारिणी आणि शरयू यांच्या चरित्रांकडे पहात होती.

गोपीनाथ आणि मधुकर या दोघांच्या वर्तनक्रमामुळें तारिणी आणि शरयू यांच्या मनावर होत असलेल्या परिणामाची ओळख शारदाबाईला करून द्यावी कीं काय असा चंपेला प्रश्न पडला होता. शरयूच्या बाबतींत चंपेला तारिणीइतकीच कळकळ वाटत असली, तरी शारदाबाईला शरयूच्या संबंधीं विशेषसा जिव्हाळा नव्हता. तारिणीची ती एक मैत्रीण आहे—तितकीशी जिव्हाळ्याचीच कांहीं नव्हे—नुसती एक निकट परिचयामुळें उत्पन्न झालेल्या लाग्याबांध्याची सामान्य मैत्रीण आहे—असेंच शारदाबाईला वाटत होतें. गोपीनाथबद्दल पूर्वीं तिला बराच ओढा होता. पण परीक्षा जवळ आल्यामुळें तारिणी आणि गोपीनाथ जेव्हांपासून एकत्र अभ्यासाला बसायला लागलीं तेव्हांपासून तो तिच्या दृष्टीआड झाला होता. तितकाच मधुकर तिला जास्त जवळचा वाटत होता. रोज तो तिच्या बैठकींत बसत असे, चर्चेंत भाग घेई, नव्या नव्या चर्चा उकरून काढी, नव्या नव्या पुस्तकांची माहिती करून देई. या सर्व प्रकारांमुळें शारदाबाईला मधुकरबद्दल जिव्हाळा उत्पन्न झाला होता. तारिणीशीं लग्न करण्याचा उद्देश जर मधुकरनें शारदाबाईकडे प्रदर्शित केला असता तर तिनें त्या प्रस्तावाला एकदम संमती दिली असती इतकी तिला त्याच्याबद्दल आपुलकी वाटत होती. गोपीनाथला ती जवळ जवळ विसरत चालली होती—विसरून गेली होती असें म्हटलें तरी तें सुद्धां चुकीचें ठरलें नसतें. तारिणीचें अभिनंदन करायला देखील तो आला नाहीं, एवढीच काय ती गोपीनाथबद्दलची आठवण तिला राहिली होती.

चंपेला भीति वाटत होती ती हीच. मधुकरची दृष्टी तारिणीकडे वळली होती याबद्दल तिला शंकाच नव्हती. तारिणी ही आपल्या आईच्या हातची एक बाहुली होती. मधुकरनें लग्नाचा प्रस्ताव शारदाबाईकडे केला असता, शारदाबाईनें त्याला संमति दिली असती, तर तारिणीनें मुकाट्यानें मधुकरशीं लग्न केलें असतें, असें चंपेला वाटत होतें. स्वत्वाबद्दल तारिणी किती उदासीन आहे याची अचुक कल्पना चंपेला होती.

आणि आतां मधुकरचें आणि तारिणीचें जें संभाषण झालें त्यामुळें तिच्या मनांत त्याच्याबद्दल आदर उत्पन्न झाला आहे असें चंपेला दिसून आलें, म्हणूनच ती अस्वस्थ झाली होती.

त्या दिवशीं बैठकीला येणारीं कुणींच माणसें आलीं नव्हतीं—एकटा मधुकरच आला होता. तारिणीही कुठें बाहेर गेली होती. नित्याप्रमाणें चंपा नांवनसत्यासारखी हजर होती.

बोलण्यावरून बोलणें निघालें. शारदाबाईनें सहज विचारलें, “ आतां तुम्ही काय करणार आहांत मधुकर ? ”

मधुकर हांसला आणि म्हणाला, “ मला हाच मोठा पेंच पडला आहे. मी कांहीं श्रीमंत नाहीं. घरांतला गोतावळा मोठा आहे. संसाराला माझ्याकडून मदत होईल अशी बाबांची अपेक्षा आहे. लॉ टर्मस् भराव्या असं मला वाटत होतं, पण आतां ती पूर्वीची अनुकूलता नाहीं. पूर्वी नोकरी करून सुद्धां कायद्याचा अभ्यास करतां येत असे. त्यासाठीं आतां सारा दिवस खर्ची घालावा लागतो. एम्. एलाच जायचं म्हटलं तर वर्ग सकाळचे असतात खरे, पण रोज वेगवेगळ्या कॉलेजांत जावं लागतं त्यामुळं बरीच ओढाताण होईल. घरांत माझी आई एकटीच आहे. लहान भावंडं बरींच आहेत. बाबा ऑफिसांत जाणारे आणि मी सकाळीं कॉलेजांत जाऊन पुन्हा तसंच कुठं तरी नोकरीवर जायचं म्हणजे तशीच सोईवार नोकरी मिळाली पाहिजे. आज चट्कन् मिळणारी नोकरी म्हणजे रेशनिंग खात्यांत. मॅट्रिक झालेल्या मुलीसुद्धां आज दरमहा चौसष्ट रुपये मिळवताहेत. थोडासा प्रयत्न केला तर मला शंभरांची नोकरी लागेल—म्हणजे एकशेंचौदा तरी मिळतील. आजच्या परिस्थितींत आम्हाला ही रक्कम फार मोठी आहे. माझी एकादी बहीण असती—मॅट्रिक झालेली असती, तर तिनं आज चौसष्ट रुपये मिळवले असते आणि मलाही लॉ टर्मस् भरतां आल्या असत्या—म्हणूनच मी मोठ्या काळजींत पडलों आहें. मी लग्न करावं म्हणून आईचा सारखा लकडा लागला आहे. आपल्यावर पडत असलेला कामाचा बोजा हलका व्हावा म्हणून तिला एक असिस्टंट पाहिजे आहे. पण मला पाहिजे आहे ती माझी सहधर्मिणी, याची जाणीव कांहीं माझ्या आईला नाहीं—बाबांना तर नाहींच !—” असें म्हणून एका दमांत एवढें लांबलचक भाषण केल्याच्या श्रमानें थकल्याचा सुस्कारा सोडून तो पुढें म्हणाला, “—मोठं कठीण आहे हें आम्हां आधुनिक तरुणांचं जीवन. जुन्या नव्याच्या संधिकालांत आम्ही जन्माला आलों आहोंत. तें जुनं देखील पुरतेपणीं जुनं नाहीं. नव्या जमान्यांत वावरतांना जुन्या जुनेपणाची आठवण उराशीं कवटाळून बसलेल्या आजच्या वडील माणसांना जुनेही म्हणतां येत नाहीं कीं नवेही म्हणतां येत नाहीं. आम्ही मात्र अगदींच

नवे आहोंत. जुन्याचा लागाबांधा तुटल्यानंतर जी एक नवी संस्कृति निर्माण झाली, त्या या नव्या जमान्यांतले आम्ही नवे आहोंत. हा नवा जमाना सुद्धां पुरतेपणीं नवा आहेच असें म्हणतां यायचं नाहीं. जुन्याची सांखळी पायाला बांधलेली असल्याची जाणीव असतांनासुद्धां आम्ही जगांत नव्या जाणीवेनं उडी घ्यायला पहातों आहोंत, याची जाणीव आमच्या वडील माणसांना नाहीं.—" एक क्षणभर थांबून उगीच थोडेंसें हंसून तो म्हणाला, " मी हें माझ्या वडील माणसांबद्दल बोलतों आहें. तारिणीच्या वडील माणसांसारखीं वडील माणसं कुणालाही भाग्यानंच मिळतात. उगीच तोंडदेखलं बोलावं म्हणून मी बोलत नाहीं. माझ्या परिस्थितीकडे पाहिलं म्हणजे मला तें पदोपदीं जाणवतं म्हणूनच मी बोलतों आणि म्हणूनच मी म्हणतों, कीं सध्यां मी मोठ्या पेंचांत पडलों आहें!" असें म्हणून कपाळाला आठ्या घालून त्यानें शारदाबाईकडे मोठ्या केविलवाण्या नजरेनें पाहिलें.

शारदाबाईला त्याची दया आली. अंधुक का होईना, पण नव्या जमान्यांतल्या तरुणांच्या या बिकट परिस्थितिची तिला जाणीव होती. तशा प्रकारचीं चित्रें तिनें आपल्या वाङ्मयांत रंगवलीं होतीं खरीं पण तीं काल्पनिक होतीं—अंदाजी होतीं. अशा बिकट परिस्थितींत सांपडलेल्या व्यक्तिचा तिला निकट परिचय झालेला नव्हता म्हणूनच तिला एक प्रकारें आनंद वाटला. ती म्हणाली, " मग आतां तुम्ही काय करणार आहांत मधुकर? लॉ टर्मस् भरणार, एम्. एच्या टर्मस् भरणार, कीं लग्न करणार?"

" मी काय करावं असं तुम्हाला वाटतं?" मधुकर गंभीर होऊन म्हणाला, " हा माझा पेंच सोडवायला माझे आईबाप समर्थ नाहींत म्हणूनच मी तुम्हाला विचारतों आहें. मला नोकरी तर केलीच पाहिजे. तेव्हां लॉ टर्मस् भरणं शक्य नाहीं. जमलं तर एम्. एचं पहायचं असं म्हणतोंय. मोठा प्रश्न पडला आहे तो लग्नाचा. आईनं तर मला सळो कीं पळो करून सोडलंय—"

" तिनं पाहिली आहे वाटतं एकादी मुलगी?" कधीं न बोलणाऱ्या चंपेनें मधेंच एकदम विचारलें.

मधुकर दचकला.

" तो आणखी एक पेंच आहे!" मधुकर म्हणाला, " नव्या जुन्याचा घोटाळा असं जें मी म्हणतों तें तेंच. मुलीची निवड करायचं तिनं माझ्यावर टाकलंय!" असं म्हणून तो उगीच थोडेंसें हंसला.

"मग केली आहे वाटतं तुम्ही निवड ?" शारदाबाईनें विचारलें, "कॉलेजांत जाणाऱ्या मुलांची बहुधा कांहीं तरी निवड झालेली असते—असा आपला माझा समज आहे. कॉलेजच्या वातावरणाची मला कांहीं कल्पना नाहीं. पण समानधर्मी तरुणतरूणी एका जागीं आलीं, म्हणजे असं कांहीं झालं तर त्यांत नवल नाहीं. झाली आहे का अशी कांहीं निवड ?"

अगदीं गंभीर होऊन मधुकर म्हणाला, "अशा कितीतरी निवडी झाल्या आहेत माझ्या. फर्स्ट इअरमधली निवड इंटरमधें राहिली नाहीं. ज्युनियरच्या मुलींनी बी. ए. होईपर्यंत पाठलाग केला पण त्यावेळीं निवडच करतां येईना—"

"म्हणजे सगळयाच आवडूं लागल्या कीं काय ?" चंपेनें विचारलें.

"अशी थट्टा करूं नका माझी." मधुकर आणखी गंभीर होऊन म्हणाला, "मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगांत आहें मी आज. वेगवेगळ्या वेळीं वेगवेगळ्या मुली पहायची पूर्वीची पद्धत होती, त्यावेळीं त्या तरुणांना काय वाटत असेल त्याची कल्पना मला करतां येत नाहीं. एक मुलगी पहावी, ती नाकारावी, तिचं लग्न झाल्याचं कळावं आणि पुढं आपण जिची निवड केली ती त्या नाकारलेल्या मुलीपेक्षां हिणकस आहे असं दिसून आलं, कीं मग पश्चात्ताप वाटावा, असं केव्हां केव्हां झाल्याचं मी ऐकलं आहे. आमच्या बाबांचे एक मित्र तसं सांगत होते. पण इथं साऱ्याच मुली एका वेळीं दिसतात. प्रत्येकीची प्रत्येकीबरोबर तुलना करतां येते. कमींत कमी चांगला चार वर्षांचा सहवास मिळतो. तरी देखील मनाचा निश्चय ठरवतां येत नाहीं. आपल्या कॉलेजपेक्षां बाकीच्या कॉलेजांतल्या मुलीच चांगल्या वाटूं लागतात. मग मन कसं अगदीं गोंधळून जातं. क्षमा करा हं मला—आईबरोबर मुलगी बोलते—मुलगा नव्हे—मुलगी बोलते तसा मी बोलतों आहें असं समजा. खरोखरच असं होतं. असमाधानी माणसाचं जीवन आहे हें. असमाधानाच्या उत्तेजनानंच माणूस पुढं पाऊल टाकायला समर्थ होतो. तसंच झालंय माझं. पूर्वीचं तें आपलं बरं होतं. कुठलीही मुलगी आवडत असली तर तें कांहीं सांगतां येत नव्हतं. जी मुलगी दाखवायला आणली जाई त्यांतलीच कुणीतरी पसंत करावी लागे. ती जबाबदारी असे वडिलांची. आतां वडिल माणसं आमच्यावर भार टाकूं लागलीं आहेत तेंच मोठं कठीण झालंय—"

"तें खरं." शारदाबाई म्हणाली, "पण तुम्ही मुलींच कांहीं निवड केली

नसेल असं कांहीं मला वाटत नाहीं. ज्या निवडी झाल्या होत्या असं तुम्हीं म्हणतां ते तारुण्याच्या पूर्वकालांतले तात्कालिक परिणाम होते. आतां कुठली तरी निवड झाली असली पाहिजे—"

" मुळींच नाहीं. " मधुकर म्हणाला, " मी अगदीं भांबावून गेलोंय असं जें मीं सांगितलं तें अक्षरशः खरं आहे. आईनं तर अगदीं हट्टच धरला आहे. मी तिला म्हटलं, तूंच काय ती निवड कर—प्रश्न तुझा आहे—तुझ्या निवडीपुढं मी मुकाट्यानं मान वांकवीन. तेव्हां आईनं साफ नकार दिला. तिला सून पाहिजे आहे. तिच्या घरकामाला उपयोगी पडेल अशी सून तिला पाहिजे आहे. मला बायको पाहिजे आहे—माझ्या ध्येयाला आणि भावनेला जिचा सहवास पोषक होईल अशी बायको मला पाहिजे आहे. अशी कुणी दिसून आली तर त्याचवेळीं वाटूं लागतं, कीं आईच्या सुनेचं काम तिच्या हातून झेपणार नाहीं—"

" अशी आहे का पण कुणी ? " चंपेनें विचारलं.

" आहे असं कसं म्हणूं ? " मधुकर पुनः गंभीर होऊन म्हणाला, " एक आहे—चांगली सुशिक्षित आहे. बुद्धीला आणि भावनेला पटेल अशीच आहे. तसं पाहिलं तर दिसायला देखील ती फार सुंदर आहे. ती मला नाकारील इतका मी कांहीं कुरूपही नाहीं—"

" वा ! वा ! " चंपा म्हणाली, " तुम्हाला कुरूप कोण म्हणेल ? मनांत असतं तर तुम्ही एकाद्या नाटक कंपनींत हीरो झालां असतां ! "

" पण तिला तें तसं वाटलं पाहिजे ! " मधुकर उद्गारला.

" मग तिला वाटत नाहीं का तसं ? " चंपेनें विचारलें.

" मी विचारलंच नाहीं अजून तिला ! " मधुकर ओशाळून म्हणाला, " मला धीरच झाला नाहीं. म्हणजे ती तशी मोठी मानी मुलगी आहे असं नव्हे. अगदींच अबोल आहे ती. अभ्यासापलीकडे तिचं दुसऱ्या कोणत्याही विषया-कडे लक्ष नाहीं. गृहसौख्य तिला भरपूर आहे. तिची आईही मोठी वत्सल आहे. बिचारीला बाप नाहीं—बापाची जागा तिच्या आईनंच घेतली आहे. माझ्या दृष्टीनं मला ती अगदीं अनुरूप आहे. पण मला कांहींच अंदाज येत नाहीं. तिचं आधींच कुठं जुळलं आहे कीं काय तें कांहीं मला ठाऊक नाहीं. कॉलेजांत असली तरी ती फारशी कुणाशीं मिसळत नाहीं—"

मधुकर जसजसा त्या अपेक्षित मुलीचें वर्णन करीत होता तसतशी चंपा अस्वस्थ होत होती. हें वर्णन बहुतांशीं तारिणीलाच लागू पडतें आहे असें

तिला वाटलें. पहिल्यापासून तिला ही अटकळ होतीच. पण प्रत्यक्ष शारदा-बाईकडेसच तो हा विषय इतक्या उघडपणें बोलायचें धाष्टर्य करील असें तिला वाटलें नव्हतें. विषयाचा उपक्रम अशा रीतीनें केल्यानंतर त्याचा उपसंहार तो कसा करतो तें ऐकण्यासाठीं चंपा अगदीं उत्सुक झाली होती. पण मधुकरनें तिला चांगलाच धक्का दिला. मधुकर बोलत होता, "—पुरुष विद्यार्थ्यांपासून ती शक्य तितकी दूर रहाते हें पाहिल्यामुळें मी चौकशी करूं लागलों. तेव्हां मला कळून आलं, कीं तिचं लग्न आधींच ठरलंय—"

चंपा एकदम दचकली.

तो बोलत होता, "—तिचं लग्न आधींच ठरलंय असं कळतांच मला मोठा धक्का बसला. ज्याच्याशीं तिचं लग्न ठरलं आहे असं मला कळलं, तो विद्यार्थीही माझ्याबरोबरचाच आहे. पण कॉलेजच्या प्रपंचांत लग्न ठरलेल्या जोडप्या-सारखीं तीं दोघं कधीं वागत नाहींत. त्या मुलाच्या बापानं त्याचं लग्न आधींच ठरवलं होतं. त्याला हें कळलं—"

"हें कळलं म्हणजे काय कळलं ?" चंपेनें विचारलें.

"हें म्हणजे या मुलीशीं लग्न ठरलेलं." मधुकर म्हणाला.

"म्हणजे हें लग्न त्याच्या बापानं ठरवलं नव्हतं का ?" चंपेनें विचारलें.

"अर्थात् नव्हतं." मधुकर म्हणाला, "तें त्या उभयतांनी ठरवलं होतं. मला वाटतं, त्या मुलीच्या आईला सुद्धां तें माहीत नसेल. म्हणूनच मी मोठ्या संकटांत आहें. इथं दुसरी व्यक्ति निर्माण झाली आहे. हीरो, हीरॉईन, व्हिलन, असा त्रिकोण निर्माण होईल कीं काय असं वाटूं लागलंय मला."

"ह्यांतला व्हीलन कोण ?" शारदाबाईंनीं हंसत हंसत विचारलें, "तो कीं तुम्ही ?"

"तेंच आतां ठरणार आहे !" मधुकर म्हणाला, "ज्याला यश मिळेल तो हीरो—अपेशी ठरेल तो व्हिलन. असंच आहे ना वाङ्मयाचं तंत्र ? माझ्या-पेक्षां तो हुषार आहे, माझ्यापेक्षां संपन्न आहे, माझ्यापेक्षां देखणा नसला तरी भावनावश मुलीच्या दृष्टीनं देखणेपणा कांहीं तेवढा महत्वाचा ठरत नाहीं. तो उद्यां एम्. ए. होईल, एल्. एल्. बीही होईल, आणि मी कदाचित् कुठं-तरी मास्तर किंवा कारकून होऊन गुंतून पडेन. तें तसं झालं म्हणजे तिच्या दृष्टीनं मी कदाचित् नालायक ठरेन. मला भीति वाटते ती त्याचीच. तिच्या अपेक्षा काय आहेत याची जर मला कल्पना आली असती तर वाटेल तो

स्वार्थत्याग करून तोच मार्ग मी पत्करला असता. पण प्रश्न आहे तो हा, कीं हें कळावं कसं ?"

"तिच्या परिचयाची कुणी नाहीं का तुमच्या माहितीची ?" चंपेनें विचारलें.

"तें नाहीं चालायचं !" मधुकर म्हणाला, "या कामीं मला तिसऱ्या माणसांची मध्यस्ती नको आहे. जाऊं द्या. त्या गोष्टीच नकोत. मनांत अगदीं सांठवून उचंबळत होतं म्हणून बोलून गेलों एवढंच. मन उघडं करून बोलायची ही एवढीच जागा आहे ना मला ?"

"पण हें कांहीं उघड करून बोलणं नव्हे !" चंपा म्हणाली, "उघड करून बोलायचं म्हणजे नावं-गावं सांगून टाकलीं पाहिजे होतीं—नाहीं ?"

"तें खरं—" मधुकर म्हणाला, "पण या असल्या प्रकरणांत कांहींतरी निश्चित झाल्याशिवाय आपल्यासारख्या वडील माणसांकडे इतकं उघड करून बोलणं कठीण जातं. एकदां मनावरचा भार दूर करण्यापुरतं जितकं बोलायला पाहिजे होतं तितकं बोलून टाकलं—एवढंच ! कांहींतरी केलं पाहिजे खरं. खरोखरच माझ्या आईनं कुठली तरी तिला सून शोभण्याजोगी मुलगी ठरवली असती तर आनंदानं मीं तिला माळ घातली असती. पण तसं कांहीं माझं भाग्य नाहीं." असं म्हणून त्यानें एक मोठा उसासा टाकला.

शारदाबाईनें बोलायला सुरवात केली त्यावेळीं त्या विषयाला निराळेच फांटे फुटले. जुना काळ आणि नवा काळ यांची तुलना करून संसारांत कोणत्या प्रकारचे डावपेंच उत्पन्न होतात याचाच खल सुरू झाला. धार्मिक भावना, शास्त्राज्ञा, समाजरचना आणि बदलणाऱ्या संस्कृतींतून निर्माण होणारे नवे नवे अनुभव, यांच्या अनुरोधानें तरूण पिढीच्या आशांत आणि आकांक्षांत कोणत्या प्रकारची खळबळ माजली आहे याची चर्चा ज्यावेळीं मधुकर करूं लागला त्यावेळीं त्यानें शारदाबाईला क्षणभर दिपवून टाकलें. समाजजीवनाच्या निरनिराळ्या धाग्यादोऱ्यांचा अंदाज त्यानें यथायोग्य रीतीनें केला आहे असें चंपेलासुद्धां वाटलें.

विषयांतर करून मूळ प्रश्नाला मधुकर बगल देतो आहे असा चंपेला क्षणभर संशय आला. ज्या मुलीचा त्यानें उल्लेख केला ती तारिणीच अशी चंपेची खात्री झाली होती. वर्णन जुळत होतें खरें पण तिचें लग्न तिनेंच ठरवलें आहे असा जो त्यानें ध्वनि केला त्याचा उलगडा तिला झाला नाहीं. ज्याच्याशीं तिचें हें असें लग्न ठरल्याचें त्यानें सांगितलें, त्याचें लग्न आधींच

ठरलेलें होतें असें तो जें म्हणाला, त्यावरून गोपीनाथचा तर हा निर्देश नव्हे असें क्षणभर तिला वाटलें. शरयूनें सांगितलेल्या हकिकतीशीं या उल्लेखाचा पडताळा जुळून येत होता.

पण गोपीनाथचें आणि तारिणीचें लग्न ठरलें आहे—त्या दोघांमधेंच ठरलें आहे—ही अटकळ त्यानें कशावरून बांधली याचा अंदाज काढावा म्हणून ती म्हणाली, " ही तात्विक चर्चा सध्यां राहूं द्या. वडिल माणूस समजून तुम्ही आपलं मन आम्हां दोघींपुढं मोकळं केलं. यांच्यापेक्षां मलाच तुमच्या या प्रकरणीं जास्त उत्सुकता वाटते म्हणून मी विचारतें, कीं त्या मुलीचं आणि त्या मुलाचं एकमेकांच्या संमतीनं लग्न ठरलंय हें तुम्हाला कसं कळलं ? त्या गोष्टीची वाच्यता झाली नसावी असं तुमच्याच म्हणण्यावरून वाटतं."

" खरं आहे तें ! " मधुकर म्हणाला, " कुठंच त्याची वाच्यता झालेली नाहीं. तें त्या दोघांचंच गुपीत आहे. मला तें कळलं तें अगदीं अनपेक्षित व्यक्तिकडून. ज्या मुलीचं लग्न त्याच्याशीं त्याच्या बापानं ठरवलं होतं त्याच मुलीनं मला हें सांगितलं. म्हणूनच मला केव्हां केव्हां शंका येते. स्त्रीजातीला अनुसरून उगीच खोट्या संशयानंसुद्धां ती तसं म्हणत असेल. माफ करा हं मी स्त्रीजातीचा उल्लेख केला म्हणून—पण तसं होत असतं यांत मात्र शंका नाहीं. म्हणूनच मी एकदां सरळ-सरळ तिला विचारणार आहें. आणखीही एक अडचण आहे. कदाचित् तें खोटं असलं तरीही ती अडचण आड येण्याची भीति आहे. उद्यां कदाचित् तिनं माझ्या मागणीला संमती दिलीच तर ती मुलगी माझ्या आईला पटायची नाहीं—"

" कां ? " चंपेनं अगदीं उत्सुकतेनें विचारलें.

" ती माझ्या जातीची नाहीं ! " मधुकर म्हणाला.

चंपेचे सारे अंदाज कोसळून पडले. तारिणी आणि मधुकर यांचा संबंध घडून यायला जातीचा अडथळा नव्हता.

मग ही मुलगी कोण ? चंपेला मोठा प्रश्न पडला. विसकटलेले धागेदोरे घेऊन ते पुनः जुळवून ती पाहूं लागली.

पुनः चर्चा सुरू झाली होती. विषयांतर झालें होतें. तिसराच विषय निघाला होता पण ती चर्चा चंपेला ऐकूं येत नव्हती. सारा जुना इतिहास आठवून आठवून चंपा ते विस्कटलेले धागेदोरे पुनः जुळवूं पहात होती. जुळवतां जुळवतां तिच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला.

शरयू तर नव्हे ती ?

जातीची नव्हे अशी तीच एक मुलगी होती—आणि तिनें सांगितलेल्या इतिहासाशीं मधुकरनें केलेलें सारें वर्णन जुळत होतें.

चंपेचें मन खट्टू झालें. भलतीच कल्पना करून मधुकरला आपण उगीच दोष दिला असें तिला वाटूं लागलें.

ही हकीकत तारिणीला सांगावी कीं न सांगावी याचा ती पुनः पुनः विचार करीत होती. तशी कोणी दुसरीच मुलगी असेल अशीही शंका क्षणभर तिला आल्यावांचून राहिली नाहीं. कॉलेजमधल्या प्रेमसंबंधांच्या भानगडींत तारिणी कांहीं फारसें लक्ष घालीत नव्हती. तरीही असा कांहीं लागाबांधा असल्यास ही हकिकत सांगितल्यावर तिच्या ती ध्यानीं येईल या आशेनें मनाचा धडा करून चंपेनें त्या दिवशीं झालेली ही सारी हकीकत तारिणीला सांगून टाकिली.

ती हकिकत ऐकतांच तारिणी सुन्न झाली.

---

## ११ घोंटाळा

ती हकीकत ऐकून तारिणीला कांहीं उलगडा होईना. चंपेच्या सांगण्यांत कांहीं ऐकायची चूक झाली आहे कीं काय असाही क्षणभर तिला संशय आला. शरयूबद्दल मधुकरला कांहीं आकर्षण वाटत असेल अशी शंका घ्यायला कांहींच कारण नव्हतें असें तिला वाटलें. जातीची नसलेली ती कुणीतरी दुसरीच मुलगी असावी अशीही क्षणभर तिला शंका आली.

चंपा म्हणाली, “कदाचित् तसंही असेल. पण अलिकडच्या काळांत आपले पूर्वीचे लागेबांधे मधुकरनं पार तोडून टाकले आहेत. पूर्वीसारखा तो वागत असता तर हा तुझा संशय लक्षांत घेण्याजोगा ठरला असता—”

“तें खरं आहे.” तारिणी म्हणाली, “ते जुने लागेबांधे त्यानं टाकले आहेत खरे. सध्यांच्या काळांत तो ज्या वृत्तीनं वावरतो आहे ती वृत्तीसुद्धां ते जुने लागेबांधे तोडून टाकल्यामुळंच उत्पन्न झालेली आहे. हें प्रकरण कोणत्या काळांतलं आहे तें कांहीं त्यानं सांगितलेलं नाहीं. कदाचित् तें आजचं असेल—कदाचित जुनंही असेल—पण शरयूच्या बाबतींत त्याचा कांहीं संबंध आला असेल असं मला तरी वाटत नाहीं.”

" कदाचित तसंही असेल " चंपा म्हणाली, " उगीच अंदाज करण्यांत काय अर्थ आहे ? अन् दुसऱ्याच्या या उठाठेवी हव्या कशाला आपल्याला ? जोंपर्यंत आपला कांहीं संबंध आला नाहीं तोंपर्यंत तो कांहीं का करीना—"

" असं कसं म्हणतेस ? " रागिणी थोडी गंभीर होऊन म्हणाली, " आमच्या या मर्यादित कुटुंबांत—न बोलावतां कां होईना—तो सामील झाला आहे. गोपीनाथसुद्धां आमच्याच कुटुंबांतला, असं अजूनसुद्धां मला वाटतंय—आज त्यानं आमचं नांव टाकलंय खरं पण पुनः इथं आल्याखेरीज त्याला गत्यंतर नाहीं असा माझा ठाम समज आहे. हे लागेबांधे इतक्या कांहीं चमत्कारिक रीतीनं जुळून आले आहेत, कीं यांतल्या कुणालाच ते सहजासहजीं तोडून टाकतां यायचे नाहींत. निदान तुला तरी हें पटलं पाहिजे. "

" मला पटतं. " चंपा म्हणाली, " मला पटतं म्हणूनच मी तुला ही हकिकत सांगितली. तूं तर माझीच—पण शरयूबद्दल सुद्धां मला तुझ्या इतकाच ओढा वाटतो. म्हणूनच मी या विषयाची एवढी चर्चा केली. अगदीं आतांच मला वाटलं होतं, कशाला या उठाठेवी ? जें काय व्हायचं असेल तें होऊन जाईल. आपण कितीही काळजी घेतली तरी जें व्हायचं असतं तें झाल्यावांचून रहात नाहीं. तुझी आई तर आपल्याच कामांत चूर आहे. कुटुंबाची मालकीण ती, पण स्वतःच्या मुलीबद्दल आजवर कसली काळजी घेतली आहे तिनं ? मी ही तक्रार करीत नाहीं—पण मला वाटतं, कीं डोळे उघडून पुढल्या काळाकडे पहायची वेळ आतां आली आहे. तुला काय वाटतं ? लग्न करायचं आहे कीं नाहीं तुला ? "

चंपेचा तो प्रश्न ऐकून तारिणीला हसूं आलें. एक क्षणभर थांबून ती म्हणाली, " खरोखरच या विषयाचा मी अजून विचार केला नाहीं—"

" असं म्हणून चालणार नाहीं. " चंपा जरा फाजील गंभीर होऊन म्हणाली, " हें ठरवायची कुठली वेळ असेल तर ती हीच आहे. या लग्नाच्या बाबतींत जिकडे तिकडे चुका होताहेत अलिकडे. संसार चालवायची ताकत आल्या-शिवाय लग्न करायचं नाहीं म्हणणारा मुलगा, तिशी उलटेपर्यंत वाट पहात बसतो अन् शेवटीं आपल्यापेक्षां निदान दहा तरी वर्षं लहान असणाऱ्या मुलीबरोबर लग्न करतो–अन् ती जोडी कांहीं जुळावी कशी जुळत नाहीं. जोडी जुळायला दोघांचंही वय सारखं पाहिजे. पूर्वीं बालविवाह होत होते त्यावेळीं दोनतीन वर्षांपेक्षां जास्त अंतर रहात नसे नवराबायकोमधें. त्यावेळीं हें आतांचं प्रेमबीम कांहीं नव्हतंच

मुळीं. सक्तीचीं लग्नं होतीं तीं. तीं केव्हां सुखाचीं होत होतीं, तर केव्हां दु:खाचींही होत होतीं. पण सक्ती होती म्हणून त्या सुखदु:खाची खंत वाटत नसे त्यांना. आतां लग्नं होताहेत तीं आपखुषीचीं—एकमेकांच्या संमतीनं. अशीं लग्नं दु:खाचीं झालीं तर आपखुषीच्या जाणीवेनं हृदयाला जो धक्का बसतो तो बसायला नको आहे ! तो तसा धक्का पुढं बसूं नये म्हणूनच मी तुला आज सांगतें, कीं बाई ग, वेळ उलटून गेली नाहीं तोंपर्यंत एकदां काय तो मनाचा निश्चय ठरवून टाक—अन् निश्चय ठरवण्यापूर्वी एक गोष्ट ध्यानांत ठेव, कीं केल्या निश्चयाबद्दल पुढं पश्चात्ताप होतां कामा नये—" एक क्षणभर थांबून तिनें चंपेच्या डोळ्यावाटे तिच्या हृदयाचा ठाव घेतला आणि म्हटलें, " तूं म्हणशील, लग्नाचं हिला काय ठाऊक ? खरं आहे तें ! पण तारू, लग्न म्हणजे कांहीं भटाबामणांनीं लावलेलं तेवढंच लग्न नव्हे. खरी निष्ठा असली, कीं तिथं विधीचं कांहीं महत्व वाटत नाहीं. जशी तुझी आई तशीच मी. आम्हां दोघींचींही लग्नं सक्तीचींच. मला तरी कुठं काय कळत होतं ? सारं कांहीं माझ्या आईनं ठरवलं. पण पुढं काय झालं ? कुणालाच सुख झालं नाहीं. खुळ्याभुळ्या भावनेनं मी सुख मानून घेत होतें—मन मारून सारं कांहीं सहन करीत होतें—प्रत्यक्ष सुख झालं नाहीं तरी सुखाच्या कैफाचा डोस घेत स्वत:ची फसवणूक करीत होतें—तसं केल्याखेरीज गत्यंतरच नव्हतं मला. तुझ्या आईचं तसं नव्हतं. तिची जागा तिला मिळतच नव्हती. तिचं दु:ख होतं तें अगदीं निश्चित होतं. त्यांत फरक व्हायचा कांहीं संभवच नव्हता. तिचं दु:ख सर्वांना दिसत होतं. पण माझं दु:ख कांहीं कुणाला पटण्याजोगं नव्हतं. तें सुखाचं दु:ख होतं. तें दु:ख सुखाचं होतं म्हणूनच जन्मभर डांचत होतं माझ्या काळजाला. आम्ही दोघीही खऱ्या सुखी झालों त्या मोकळ्या झालों तेव्हांपासून—आपापल्या परीनं विधवा झालों तेव्हांपासून. आतां असं वाटतं, कीं मुळींच कांहीं झालं नसतं तर तें दु:खाचं आयुष्य सुखी झालं असतं का ?—" असें म्हणून ती पुनः कांहीं वेळ थांबली. भूतकाळाचा सारा चित्रपट तिच्या नजरेपुढून जात होता, त्याचा आढावा घेऊन बोलत असतांना तारिणीच्या मनावर त्या भाषणाचा होत असलेला परिणाम अज-मावण्याकडे तिचें लक्ष नव्हतें. आतां लक्ष गेलें, तारिणीच्या मनावर कांहीं तरी चमत्कारिक परिणाम होतो आहे असें तिला वाटलें, म्हणून ती पुढें म्हणाली, "—सहज उद्गार आला म्हणून मी बोललें. केव्हांतरी हें बोललंच

पाहिजे होतं तुझ्याजवळ. बोललें तें बरं झालं असंही वाटतंय आतां. आम्ही खालेल्या ठेंचांनीं तुम्ही सावध झालं पाहिजे." असें म्हणून तिनें एक मोठा सुस्कारा सोडला.

चंपेचें बोलणें चालत असतांना क्षणोक्षणीं अस्वस्थ होत असलेली तारिणी तिचें भाषण संपतांच भानावर येऊन म्हणाली, "बोललीस तें बरं झालं. मला सुद्धां वाटूं लागलंय, कीं याचा कांहीं तरी विचार केला पाहिजे आतां. असे कांहीं प्रकार घडून आले आहेत, कीं इच्छा नसतांना सुद्धां भलत्या भरीला पडायची मला बुद्धि होतेय. खरोखरच आतां कांहीं निश्चित ठरवलं पाहिजे. तूं आहेस म्हणून मी निर्धास्त आहें. यापुढं कांहींसुद्धां मनांत ठेवायचं नाहीं—तुला अगोचर असं कांहींसुद्धां करायचं नाहीं असं ठरवून टाकलंय मी. मन अगदीं उघडं करून बोलायचं तर मला कबूल केलं पाहिजे, कीं या दोन्ही माणसांनीं माझ्या मनावर कांहींना कांहीं तरी परिणाम केलाय. वेगवेगळ्या दृष्टीनं पाहूं लागलं तर प्रत्येकाच्या ठायीं कांहीं ना कांहीं तरी गुण नि कांहीं ना कांहीं तरी दोष सारखेच दिसूं लागतात. एकाचा गुण जसा दुसऱ्यांत नाहीं तसाच एकाचा दोष दुसऱ्यांत नाहीं. प्रत्येकाचे गुण निराळे—प्रत्येकाचे दोषही निराळे. तसं निर्दोष असं कोण आहे ! त्यांनासुद्धां माझे दोष दिसत असतील—गुणही दिसत असतील ! नाहींतर गोपीनाथनं असा संबंध कां तोडून टाकला असता ? आणि मधुकर तरी असा जास्त लगट कां करूं लागला असता ? तसा भलताच अर्थ घेऊं नको 'लगट' करण्याचा. जास्त जिव्हाळा जोडायचा प्रयत्न तो बुद्धिपुरस्सर करतोय असं मला वाटतंय म्हणून मी तसं म्हटलं. क्षणभर वाटतं, कीं गोपीनाथ दुरावलाय म्हणून का तो असं करतोय ? पण तसं म्हणायला कांहीं कारण आहे असं नाहीं. साऱ्या गोष्टी सहजासहजीं घडून येताहेत. तसं पाहिलं तर बोलायला सुरवात तूं केलीस म्हणूनच ना मधुकरनं एवढं तोंड उघडलं ? नाहींतर आपणहून यापूर्वी कुठं काय बोलत होता तो ? म्हणूनच मी तुलना करून पहातें आहें—अंदाज घेतें आहें—पण एवढं खरं, कीं लग्नाचाच विचार करायचा असला तर या दोघांपलीकडे तिसऱ्या कुणाकडे नजर टाकावी असं कांहीं मला वाटत नाहीं." असें म्हणून तिनेंही एक मोठा सुस्कारा टाकला.

दोघींनींही आपलें हृदय हलकें करून घेतलें होतें. दोघींच्याही मनावर कांहींतरी लहानमोठा भार होता, तो भार हलका करायची संधि त्या दोघीही पहात होत्या, ती संधि आतां मिळाली.

तरीही चंपेचें समाधान झालें नव्हतें. परिस्थितीविषयीं बेसावध असलेल्या तारिणीला जरी तिनें आज सावध केलें होतें, तरी त्या परिस्थितीचा अचुक अंदाज अजून तिला आला नव्हता. अंधारांत चांचपडण्याजोगीच ती परिस्थिती होती. जोंपर्यंत मधुकर निश्चितपणें कांहीं बोलत नव्हता तोंपर्यंत कोणत्याही प्रकारची अटकळ करणें तिला शक्य नव्हतें. उघड उघड मधुकरला विचारणेंही तिला इष्ट वाटत नव्हतें. म्हणून शरयूकडून अंदाज घेण्याचें तिनें ठरवलें. तिला तिनें विचारलें तेव्हां ती म्हणाली, " मधुकरला मी ओळखतें एवढंच. या पलिकडे त्याचा माझा कांहींच संबंध नाहीं. माझ्याबद्दल त्याच्या मनांत कांहीं विचार आले असतील असं वाटायला मला कांहींच कारण नाहीं. त्याच्या जातीची नसलेली कुणी असेल ती असो—मी नव्हें खास."

" गोपीनाथची काय खबर आहे ? " चंपेनें विचारलें.

" कांहींच नाहीं. " शरयू म्हणाली. " त्यानं माझा संबंध जो एकदां टाकला तो टाकलाच. माझ्या आईलासुद्धां तें मोठं चमत्कारिक वाटतंय. परवांच ती तसं मला म्हणाली. पुनः मला आपल्या कुळाचारांत ओढायची खटपट चालली आहे माझ्या आईची ! हें असं पाहिलं म्हणजे वाटतं, कीं आई म्हणते तेंच खरं. लग्न केलेल्या जोडप्यांचे चालत असलेले धिंडवडे रोज पाहिले, कीं वाटतं—एक, लग्न केल्याशिवाय तरी रहावं किंवा जातकुळीची परंपरा तरी चालवावी ! "

शरयूचे ते उद्गार ऐकून चंपेला धक्का बसला.

कोणत्या परिस्थितीमुळें असली ही अभद्र कल्पना शरयूच्या मनांत आली याचा तिला उलगडा होईना. ती म्हणाली, " काय बोलतेस हें, शरयू ? लग्न केल्याशिवाय रहावं असं म्हटलंस तर मला त्याचं तेव्हढंसं कांहीं वाटायचं नाहीं. पण जातकुळीची परंपरा चालवायची कल्पना डोक्यांत येण्याइतकीं अशी कोणती आपत्ती तुझ्यावर आलीय ? "

" जीव कसा कावून जातो ! " शरयू म्हणाली, " सहन तरी किती करूं ?— सारं कांहीं कांहीं ठरून गेलेलं—दोहीकडच्या वडील माणसांचा एव्हढासुद्धां विरोध नाहीं अन् आतां हा अजिबात माझं नांव टाकतो ! भेटत सुद्धां नाहीं ! नुसता दिसत सुद्धां नाहीं ! असं काय घडलंय माझ्या हातून !–" डोळयाच्या टोकाशीं येणारें आसूं पुसून टाकून ती म्हणाली, " अन् आतां हें तूं नवीनच कांहीं तरी सांगायला आलीस. मन मोकळं करून सरळ सरळ बोलणं

पत्करतच नाहीं का या तरुण माणसांना ? कां असे आमच्या जिवाशीं डाव खेळतात ? जन्माचा विश्वास टाकून स्वस्थ राहावं, निधास्त झाल्याची कल्पना सारखी हृदयांत बाळगून पुढल्या काळचा निश्चितपणा आंखावा अन् शेवटीं यांनीं हा असा दगा द्यावा ! असंच का हें बायकांचं जिणं ?"

"तूं नुसती बायकांच्या जिण्यासंबंधीं बोलतेस," चंपा म्हणाली. "बायकांचं जिणं आणि आम्हां बायकांचं जिणं, याच्यांत केवढं तरी अंतर आहे. कुलीन बायकांचं जिणं निश्चित तरी झालेलं असतं. अशी सुरवात व्हायची, असा शेवट व्हायचा, याची कांहींतरी कल्पना असते त्यांना—पण आमच्या जिण्यात कुठंच कांहीं निश्चितपणा नाहीं – कुठंच कांहीं धरबंध नाहीं—कशा रीतीनं वागायचं, पुढच्या आयुष्याची दिशा कशी आखायची, पुढलं जिणं कसं चोखाळायचं, तें कांहींच ठरवतां येत नाहीं आम्हांला ! वावटळींत सांपडलेल्या पाचोळ्यासारखं असतं आमचं जिणं—" एक क्षणभर थांबून ती म्हणाली, "असा त्रागा करूं नकोस शरयू. कांहीं तरी करून गोपीनाथची भेट घे, एकदां त्याला हडसून खडसून विचार तुला तो सरळ उत्तर देत नसला तर मला सांग—मी एकदां त्याची गाठ घेतें - पण आधीं तू त्याला विचार. तुझं नू त्याचं बोलणं व्हायच्यापूर्वी दुसरं कुणी मधें पडायला नको—ऐकलंस ? उगीच अभिमानाच्या भरीस पडणं बरं नव्हे. तुटलीक होणं सोपं असतं, पण जोडणं महा कठीण. एकदां आपलं मन चांगलं पारखून घे—अगदीं मन मोकळं करून बोल—हट्टाला पेटूं नकोस कीं चिडीला येऊं नकोस— मनावर पक्का ताबा ठेवून एकदां त्याच्याशीं सरळ सरळ बोलून टाक. मधुकरच्या या कोड्याच्या भाषणानं मी भांबावून गेलें आहें. मोठा हुषार आहे तो ! त्याच्या बोलण्यांतलं खरं किती आणि बनावट किती असतं याचा अजून मला अंदाज आला नाहीं. तो सरळ माणूस नव्हे, एवढ्याबद्दल मात्र माझी खात्री झाली आहे. म्हणूनच तुला सांगतेंय—तुझ्या या प्रकरणाचा निकाल झाल्याशिवाय मधुकरच्या या डावाचं निदान मला करतां यायचं नाहीं. चार-बाजूना झालेलीं चौघांची चार तोंडं एका जागीं येतील, त्याचवेळीं हें कोडं उलगडेल."

चंपेच्या त्या भाषणाचा शरयूच्या मनावर चांगलाच परिणाम झाला. त्या दिवसापासून गोपीनाथला गांठायचा ती प्रयत्न करूं लागली. यापूर्वी सहसा ती गोपीनाथच्या रूममध्यें जात नसे. भीति वाटत असतांनाही तिनें चार-

दोन वेळ तें धाष्टर्य केलें. गोपीनाथच्या घरच्या मंडळींनीं तिला थोड्याशा तुटकपणानेंच वागविल्यामुळें पुनः जाण्याचें तिला धैर्य होईना. पण तिनें मनाचा निश्चय केला होता तो ठाम होता. चंपेच्या भाषणाचा तिच्या मनावर चांगलाच परिणाम झाला होता. मानापमानाची कल्पना दूर सारून पुनः पुनः गोपीनाथच्या ब्लॉकमधें जाऊन ती जेव्हां तपास करूं लागली, तेव्हां त्याच्या बापालाही तिच्याबद्दल थोडीशी सहानुभूति वाटूं लागली. तो म्हणाला, " हल्लीं काय झालंय त्याला तेंच कळत नाहीं. नुसता जेवायला अन् झोंपायला तेवढा घरीं येतो. सारा दिवस कुठं असतो तें विचारलं तरी सांगत नाहीं. तूं त्याची चौकशी करतेस असं मीं सांगितलं तेव्हां तर तो जास्तच चुकवाचुकव करूं लागलाय. आतां तो जेवायला आला, कीं मी मुद्दाम बोलावणं पाठवतों तुला. कांहीं काळजी करूं नकोस. " असें म्हणून त्या म्हाताऱ्यानें तिला धीर देण्यासाटीं तिच्या पाठीवरून हात फिरविला तेव्हां तिचा आनंद गगनांत मावेनासा झाला. अनपेक्षित जागेकडून मिळालेला हा जिव्हाळ्याचा पुरावा तिला नवें धैर्य द्यायला उपयोगी पडला.

गोपीनाथच्या बापाच्या मदतीमुळें शरयूनें शेवटीं एकदांची त्याची गांठ घेतली. गांठ पडली ती जिन्यांत. तो निसटून जायचा प्रयत्न करीत होता. पण मनाचा हिय्या करून दोन्ही हात पसरून तिनें त्याला जिन्यांतच अडवलें. तो चिडून म्हणाला, " कां माझा हा पाठपुरावा चालवला आहेस ? "

" हें तुम्ही विचारतां ? " शरयू म्हणाली, " इतक्यांतच असा कसा विसर पडला तुम्हाला ? काय माझा अपराध झाला ?—जरा आंत येऊन स्वस्थपणें बोलाल ? "

" एकदां होऊन जाऊं दे ! " दांत ओठ खाऊन गोपीनाथ म्हणाला, " आतां हें सारंच असह्य झालंय मला ! "

दणदण पाय आपटीत तो शरयूबरोबर तिच्या खोलींत आला आणि एक खुर्ची ओढून घेऊन रागारागानें बसत सुस्कारा सोडीत म्हणाला, " आतां विचार एकदां काय विचारायचं तें. "

" विचारायचं काय ? " शरयू मोठ्या अदबीनें म्हणाली, " कां असं माझं नांव टाकलंत ? काय गुन्हा झाला माझा ?—"

" गुन्हेगार आहें तो मी—" गोपीनाथ ओठ चावीत म्हणाला. त्याच्या हृदयांतून उमाळा येत होता. शब्द लंगडे पडत होते. म्हणूनच त्यानें असे

ओठ चावले. एकदां एक मोठा आंवढा गिळून तो म्हणाला, "—गुन्हेगार मी आहें. मनाचा पुरेसा ठाव घ्यायच्यापूर्वी मी तुला वचन दिलं—तुझ्या आईजवळ कबूल केलं—बाबांचीही संमती मिळवली—एवढं सारं झाल्यावर मला कळून चुकलं, कीं झाला तो अविचार झाला होता—" असें म्हणून तो एकदम थांबला.

कांहीं वेळ वाट पाहून शरयूनें विचारलें, "कां असं वाटलं ?"

"कां असं वाटलं !" गोपीनाथ उद्गारला, "तुला स्पष्ट सांगूं ? परिणाम व्हायचा नाहीं मनावर ? धक्का बसायचा नाहीं ?"

"मुळींच नाहीं." शरयू म्हणाली, "मी मनाची तयारी केली आहे. येईल त्या प्रसंगाला तोंड द्यायची आतां माझी तयारी आहे. अगदीं मनमोकळं करून बोला—एवढं सुद्धां कांहीं मागं ठेवूं नका."

क्षणभर गोपीनाथनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. या अनपेक्षित प्रसंगीं हजर-जबाबी उत्तर देण्याइतकें प्रसंगावधान त्याच्या ठायीं नव्हतें. आपल्या उत्तरानें शरयूच्या मनावर आघात होईल याची त्याला खात्री होती. चांगुलपणाच्या त्या भेकड वृत्तीमुळें मनमोकळें करून बोलायला तो घाबरत होता. शरयू अगदीं अधीर झाली होती. ती म्हणाली, "माझ्या मनाची मुळींच पर्वा करूं नका. दगडासारखं घट्ट केलं आहे मी माझं मन—"

"तेंच अजून साधलं नाहीं मला." गोपीनाथ म्हणाला, "म्हणूनच मी बोलायला घाबरतोंय—पण आतां बोललंच पाहिजे—" असें म्हणून त्यानें एकवार शरयूच्या नजरेला नजर दिली. क्षणभर त्याच्या अंगाचा थरकांप झाला. एकदम गर्हिवरून तो म्हणाला, "मला क्षमा कर शरयू. मी महापापी आहें. मी तुझा गळा कापला आहे. यापूर्वी तुझ्याखेरीज माझं मन कुठंच गेलं नाहीं. त्या नाटकाच्या प्रयोगानं सारा घात घेतला—तारिणीचा परिचय झाला, ती तिची पहिली कादंबरी मी तपासली, तुझ्याच सांगण्यावरून तपासली—पुढं आम्ही दोघे एकाजागीं अभ्यास करूं लागलों, आदर वाढूं लागला. तो आदर सामान्य नव्हता. त्या आदराचं रूपांतर होत होतं. अभ्यासापलीकडे तिचं कुठंच लक्ष नव्हतं. दिवसाचे दिवस, वेळीं अवेळीं आम्हीं अभ्यासाला बसत होतों. शारदाबाईच्या बैठकींत तिकडे मधुकर आपलं बस्तान बसवीत होता. मला तें दिसत होतं. जाऊन तिकडे विक्षेप करावा असं पुनः पुनः मनांत येत होतं—पण तसा तिकडे गेलों, गुंतून पडलों, तर तारिणीचा सहवास

दुरावेल या भीतीनं मी त्या बैठकींत भाग घ्यायचं चुकवलं—" एक मोठा सुस्कारा टाकून तो म्हणाला, "—तिथंच पहिली चूक झाली. माझी वृत्ति एकांतिक आहे याची मला जाणीव होती. दोन विषयांत मनाची विभागणी करण्याचं सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं म्हणूनच मी तारिणीच्या सहवासाचा आग्रह धरून बसलों. मला दिसून आलं, कीं कोमल भावनांचा तारिणीच्या मनांत उगमच झालेला नाहीं. तिच्या आईच्या हातची ती एक बाहुली आहे. आई जशीं सूत्रं नाचवील तशी ती नाचते. मधुकरनं तें ओळखलं होतं म्हणूनच तारिणीच्या पूर्वी त्यानं आधीं शारदाबाईची नाडी घट्ट पकडली. मला तें साधलं नाहीं. तारिणीच्या जवळ राहाण्यांतच मला आनंद वाटत होता. कैफ होता तो एक प्रकारचा! ती अभ्यासांत रंगून जात होती म्हणूनच माझा अभ्यास झाला, नाहीं तर मी नुसता तिच्याकडे पहात बसलों असतों, इतका मी वेडा झालों होतों. अभ्यास झाला तो तिचा, माझा नव्हे—पास झाली ती ती, मी नव्हे—पण हें तिला कळलं नाहीं. म्हणूनच मी तिचं अभिनंदन केलं नाहीं. तिला वाईट वाटलं असेल—तिच्या आईलाही वाईट वाटलं असेल—चंपामाई तर माझा द्वेषच करते— थांब—उगी रहा. तुला तिचा अभिमान आहे, मला माहीत आहे. पण तो तिचा चांगुलपणाच मोठा भयंकर आहे. अत्यंत मत्सरी आहे ती. तारिणीच्या आयुष्याचीं सूत्रं शारदाबाईच्या हातीं असतील पण तिचा शंभर टक्के ताबा घेऊन बसली आहे ती ती चंपामाई. म्हणूनच ती माझा द्वेष करते. तिनं माझं मन ताडलं आहे—म्हणूनच मी तिथं जायचा बंद झालों—म्हणूनच मी तुझी भेट घ्यायचं सुद्धां वर्ज्य केलं. मला वाटलं, माझ्या आयुष्याचं हें असं मातेरं झालंय, तुम्ही दोघी तरी आपापल्या परीनं सुखी व्हा. मी तसाच दुबळा असतों, तर यावेळीं आत्महत्या केली असती. मी मन मारायचा प्रयत्न केला-तें साध्य झालं मला—मन मारून जिवाच्या भावना चुरगळून टाकायचं सामर्थ्य माझ्या अंगीं आहे असं जेव्हां मला पटलं, तेव्हांच मी तुम्हा दोघींचंही नांव टाकलं. ती असाध्य होती. तूं साध्य असलीस तरी—" क्षणभर तो घुटमळला आणि म्हणाला, "—साध्य कसली, तूं माझीच होतीस—मी तुझाच होतों— पण आतां मी माझा राहिलों नाहीं. असाध्याला साध्य करण्याचा चमत्कार जोंपर्यंत अशक्य आहे तोंपर्यंत मी असाच मन मारून स्वस्थ राहाणार. शरयू, मला क्षमा कर. मला विसरून जा. माझ्या हृदयांत आतां तुला स्थान नाहीं!"

त्याचें भाषण ऐकत असतांना शरयूच्या डोळ्यांतून न कळत आसवें गळत होतीं. तिच्या हृदयांतील प्रेमाची जागा वात्सल्यानें बळकावली होती. आकाशींच्या चांदोबाचा हट्ट धरून आकांत करणाऱ्या मुलाची समजूत घालणाऱ्या आईप्रमाणें गोपीनाथला जवळ घेऊन त्याचें सांत्वन करावें, असेंच तिला वाटत होतें. प्रेमाची जागा दयेनें घेतली होती. दयेचें रूपांतर प्रेमांत होणें, हा स्वाभाविक क्रम असला तरी इथें त्याचा व्युत्क्रम झाला होता.

क्षणभर दोघेंही स्तब्ध राहिलीं होतीं. गोपीनाथचें बोलणें संपलें होतें. त्याला उत्तर द्यायला शरयूपाशीं शब्द नव्हते.

मनांत येत असलेली विषादाची लहर बळेंबळें दूर सारून स्त्रीसुलभ मातृत्वाच्या वात्सल्यानें ती म्हणाली, “ ठीक आहे. पूर्वीचं सारं विसरून टाकूं आपण. कांहींच झालं नव्हतं असं समजूं. पण हा दुरावा मला सहन होत नाहीं. शेजारीं राहात असतांना सुद्धां एकमेकांना आपण भेटलों नाहीं तर वडील माणसांना काय वाटेल ? आपण त्यांच्या मनाची तरी थोडी कदर केली पाहिजे. दूर राहून चालायचं नाहीं असं. बाळपणापासूनचीं संवगडी आहोंत आपण, तें नातं तरी तसंच कायम ठेवलं पाहिजे, भेटलं पाहिजे, बोललं पाहिजे, येणं जाणं चालू ठेवलं पाहिजे—झाल्या गेल्या आणाभाका विसरून बाळपणाच्या त्या संवगड्याच्या वृत्तीनं पूर्वींचं नातं राखलं पाहिजे. मग काय व्हायचं असेल तें होईल. तुमची वृत्ती एकांतिक आहे तें मला माहीत आहे. त्या वृत्तीला मी विक्षेप करणार नाहीं. पण चार चौघांच्या दृष्टीनं व्यंग दिसेल असं वागूं नका, एव्हढंच माझं पदर पसरून मागणं आहे. ”

तिच्या भाषणांतील वात्सल्याचा गोपीनाथच्या मनावर परिणाम झाला होता. झालेला मनाचा पालट सांगितल्यानंतर शरयू चिडेल अशी जी त्याची अटकळ होती, ती खोटी ठरल्यामुळें त्याची त्यालाच शरम वाटली. डोळ्यांतील आसवें पुसून तो म्हणाला, “ मला क्षमा कर शरयू—झाल्या चुकीबद्दल क्षमा कर. यापुढं असं कांहीं होणार नाहीं माझ्या हातून ! ” असें म्हणून तो झट्कन् उठून निघून गेला.

तो निघून जातांच शरयूच्या मनावरचा ताबा एकदम सुटला आणि दोन्ही हातांनीं तोंड झाकून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

# १२ प्रश्न

आपल्या आजूबाजूला घडत असलेल्या या विलक्षण प्रसंगाची शारदाबाईला दाद नव्हती. कोणत्याही प्रकारें तिला त्रास होऊं नये म्हणून चंपा पहिल्यापासूनच खबरदारी घेत असे, त्या तिच्या नित्याच्या वृत्तीला अनुसरून तिनें शारदाबाईला कांहींच कळूं दिलें नव्हतें.

नित्याप्रमाणें मधुकर येत होता, लेखकांच्या बैठका भरत होत्या, गंभीर विषयावरील चर्चा सुरू होत्या, पण जिव्हाळयाच्या माणसांच्या आयुष्यांत उत्पन्न झालेल्या या तितक्याच जिव्हाळयाच्या विषयाची चर्चा मात्र कुणीच करीत नव्हतें.

असेंच चालत असतें. जगाचें राजकारण हातीं घेऊन माणसें वेळीं अवेळीं जीव तोडून चर्चा करीत असतात. कुणा पुढाऱ्याचें कुठें चुकलें आणि कुणा पुढाऱ्यानें काय केलें असतें तर कुणाचें कसें कल्याण झालें असतें, कुणाच्या चुकीमुळें कसे अनर्थ झाले आणि त्या चुका कशा रीतीनें टाळतां आल्या असत्या, याची जी अचुक छाननी चर्चाप्रिय व्यक्तींच्या बैठकींतून सुरू असते ती त्या चुकांचे परिणाम घडून गेल्यानंतर—आधीं कुणालाच कांहीं सुचत नसतें. प्रत्येकाला वाटत असतें, कीं जगाचीं सूत्रें माझ्या हातीं आलीं तर सारें जग मी समांतर रेषेंत आणीन. पण असें म्हणणारी व्यक्ति आपल्या कुटुंबांतील चार दोन माणसांचें जगसुद्धां समांतर रेषेंत आणायला समर्थ होत नाहीं.

चर्चा ही एक बौद्धिक दारू आहे. एकदां दारू प्यायला सुरवात केल्यानंतर अट्टल दारुड्या अगदीं नकळत एका मागून एक पेले जसे झोकीत असतो, तशीच ही चर्चेच्या काथ्याकुटाची सांखळी सारखी वाढत असते. तो दारुड्या जसा शेवटीं बेहोष होऊन पडतो, तशाच या चर्चाखोर व्यक्तीही कांहीं मुद्दां निष्पत्ती न करतां शेवटीं बेहोष होऊन पडतात. पुनः सावध व्हायचें, पुनः दारू झोकायची—पुनः तसेंच बेहोष होऊन पडायचें—त्याचप्रमाणें या चर्चाखोरांचीही स्थिति होत असते.

म्हणूनच चंपेला या चर्चेंत भाग घ्यावा असें वाटत नसे. तीनच माणसांचें का होईना, तें एक स्वतःसिद्ध कुटुंब होतें. त्या तीन माणसांच्या अनुषंगानें

आणखी तीन माणसांची जबाबदारी उत्पन्न झाली होती. या सहा माणसांच्या आयुष्याचे धागेदोरे एकमेकांत इतके गुरफटून गेले होते, कीं विणीच्या सुताच्या गुंतवळाप्रमाणें त्यांची उकल करण्यासाठीं चंपेला आपलें सारें लक्ष एका जागीं एकवटावें लागत होतें. एकच गुंतवळ सोडवला कीं सारी उकल सहज होते पण ती एकाच गुंतवळाची जागा अचुक शोधून काढणें माणसाला जसें कठीण जात असतें, तसेंच चंपेचें झालें होतें.

चंपेचें सारें लक्ष मधुकरच्या हालचालीवर होतें. गुंतवळाची मुख्य जागा तिथेंच आहे, असें तिचें निदान होतें. पण तो गुंतवळ चांगलाच बिकट होता असें तिला वाटत होतें. मन उघडें करून तिच्याशीं बोलतांना आपल्या मनःस्थितीचा जो अंदाज मधुकरनें तिला दिला होता, त्या अंदाजाची तुलना करतांना, गंभीर चर्चेच्या वेळीं मनाचा खंबीरपणा तो कसा ढळूं देत नाहीं याचेंच चंपेला आश्चर्य वाटत होतें. स्वतःच्या सौख्याची आणि समाधानाची यत्किंचित्सुद्धां जाणीव न ठेवतां, जगाच्या उलाढालीची चर्चा तो ज्या उत्कटतेनें करीत असे, ती उत्कटता चंपेच्या दृष्टीनें अपूर्व होती. स्वतःच्या वृत्तीशीं तुलना करून पहातांना मनावर ताबा ठेवण्याची मधुकरची ही असामान्य वृत्ती पाहून तिला क्षणोक्षणीं कौतुक वाटे.

आपल्या कल्याणाची काळजी घेणारीं माणसें आहेत याची पूर्ण जाणीव असल्यामुळें तारिणी मात्र अगदीं निर्धास्तपणें वावरत होती. मधुकरनें टाकलेलें कोडें उलगडण्याकडे मधून मधून तिचें लक्ष जाई पण त्या तळमळींत चंपेची आत्यंतिकता तिच्याठायीं नव्हती. जबाबदारीच्या जाणिवेच्या अभावीं त्या विषयाचा विचार करणें म्हणजे क्षणभर मनाचा विरंगुळा करणें, या पलीकडे तिला जास्त कांहीं वाटत नव्हतें.

गोपीनाथबरोबर झालेल्या भाषणाची सारी हकिकत शरयूनें चंपेला सांगितली त्यावेळीं ती जास्त घोटाळ्यांत पडली. गोपीनाथच्या मन:स्थितीचा अंदाज तिनें आधींच केला होता. त्याच्या दुबळेपणाची तिला चांगलीच कल्पना होती. मधुकरची मनाची ठेवण गोपीनाथच्या मनाच्या ठेवणीपेक्षां अगदीं भिन्न प्रकारची होती हेंही तिला तितकेंच चांगलें माहीत होतें. तारिणीच्या आयुष्याच्या भविष्यकालाचीं सूत्रें अगदीं नकळत या दोन तरुणांच्या हातीं गेलीं आहेत, हेंही तिला कळून चुकलें होतें. या सूत्रांचा गुंतवळ व्हायला शरयूच्या अस्तित्वाचा तिढा मधेंच भक्कम पडला आहे हें तिला स्पष्टपणें दिसून

येत होतें. दोघींवरहीं तिचें सारखेंच प्रेम होतें. पण त्यांतसुद्धां डावें उजवें होतेंच. तारिणीच्या कल्याणासाठीं वेळीं प्रसंगीं शरयू खर्ची पडली, तर तिला तितकेंसें दुःख झालें नसतें. स्वार्थी वात्सल्याच्या दृष्टीनें तारिणीबद्दलचा तिचा ओढा पोटच्या गोळ्याच्या प्रेमापेक्षांही जास्त तीव्र होता. पण त्या दोघींनाही चंपेच्या या मनोभूमिकेची अचूक कल्पना आली नव्हती.

तारिणीपेक्षां शरयूच्या मनःस्थितीकडे जास्त नजर दिली पाहिजे, असें ही हकिकत कळल्यावर चंपेला वाटत होतें. गोपीनाथचें तें निर्वाणीचें भाषण ऐकल्यानंतर शरयूच्या मनावरचा ताबा सुटला होता. एकप्रकारें ती जिवावर उदार झाली होती. आयुष्याच्या पुढल्या भवितव्याबद्दल बेदरकार बनली होती. आपला निर्वाणीचा बेत उघड करण्याच्या उद्देशानें शरयू चंपेला म्हणाली, "कुलीन माणसं कांहीं म्हणोत, पण लग्नबंधनाची खरी एकांतिकता जितकी आम्हा कलावंतिणींत आहे, तितकी कुलीनांत नाहीं. सक्तीच्या पातिव्रत्यावर त्यांच्या कुलीनत्वाचा बडिवार असतो. आम्हांला ती सक्ति नसते. माझ्या आईचं चरित्र मी पहातें आहें—तुझंही पहातें आहें—आणखीही अशींच चारचौघींचीं चरित्रं माझ्यासमोर आहेत—पण उनाडवृत्तीच्या बायकांची सरासरी काढायला जेव्हां मी जातें, तेव्हां ती संख्या मला कुलीनांतच जास्त दिसते. तुला नाहीं असं वाटत ? हें असं पाहिलं, कीं वाटतं, कशाला हवेत हे कुलीनपणाचे चाळे ? कुलीनपणांत असा काय विशेष आहे, कीं तो माणसाच्या जीवनांत क्रांती घडवून आणतो ? दोन्ही उदाहरणं माझ्या नजरेसमोर आहेत. तूं न् तारिणीची आई. एक कुलीन आणि एक तूं ही अशी. दोघींनींही एकाच प्रकारचा छळ सहन केला. तिचा छळ तुझ्यापेक्षां जास्त होता. तिला मोकळीक नव्हती. तुला मोकळीक होती. तारिणीच्या बापाला लाथ मारून दुसरा धनी पहाणं तुला अशक्य नव्हतं, पण तूं तसं केलं नाहींस. कां तसं केलं नाहींस ? दारू पिऊन येऊन तो तुला मारीत होता—तूंच मला सांगत होतीस—तारिणीच्या आईची तूं बाजू घेतेस म्हणूनसुद्धां तुला मारीत होता—मग कां त्याला टाकून गेली नाहींस ?—आणि तारिणीच्या आईची बाजू तरी तूं कां घेतलीस ?—कां तिच्या बाजूनं भांडत होतीस ? काय फायदा होता तुझा त्यांत ? तिची बाजू घेत होतीस म्हणूनच तो तुला त्रास देत होता असं कां म्हणूं नये ?—ती कुठं जात नव्हती. लग्नाच्या बंधनानं ती अडकून पडली होती. तें बंधन तुला नव्हतं. रूप होतं,

तारुण्य होतं—कां लाथ मारून गेली नाहींस त्याला ?—" चंपेचें उत्तर ऐकण्यासाठीं एक क्षणभर थांबून, चंपा कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून ती म्हणाली, "मला माहीत आहे, मन मोकळं करून या प्रश्नाचं उत्तर माझ्यासमोर तूं द्यायची नाहींस. मी कुलीन व्हावं असं तुला वाटतं. या प्रश्नाचं उत्तर तूं दिलंस, तर तुझ्या इच्छेविरुद्ध माझ्या मनावर परिणाम होईल याची भीति वाटतेय तुला, म्हणून तूं उत्तर देत नाहींस. मी आतां त्या दृष्टीनं विचार करू लागलेंय. काय होतं नुसत्या लग्नाच्या गाठीनं ? लग्नाच्या गाठीशिवाय उत्पन्न झालेली आमच्या जातींतली संतति काय वाईट झालीय ? डॉक्टर आहेत, वकील आहेत, बॅरिस्टर आहेत, राजकारणांतले पुढारी सुद्धां आहेत. कुठल्याही कुलीनापेक्षां लोक त्यांना जास्त मान देताहेत. कुलीन डॉक्टरांना, कुलीन बॅरिस्टरांना, कुलीन वकिलांना आणि कुलीन प्रोफेसरांना टाकून या आमच्या माणसांच्या पायावर लोळण घेताहेत. हें प्रत्यक्ष दिसतंय मला. मग मी काय म्हणून या कुलीनतेच्या मागं लागूं ? काय कल्याण झालंय शारदाबाईचं तिच्या कुलीनतेमुळं ? तूं नसतीस तर तिच्या दाही दिशा झाल्या असत्या. कुणाच्या तरी घरीं सैंपाक करून तिला पोट भरावं लागलं असतं. कुठल्या तरी आचारी पाणक्याच्या गळ्यांत आपली मुलगी घालून ती यापूर्वीच मोकळी झाली असती. आज ती एक नांवाजलेली लेखिका झाली आहे, वाङ्मयांत तिचं नांव अजरामर होऊन राहिलं आहे, तें तुझ्याच कृपेमुळें. तिची सारी इस्टेट तुला लुबाडून घेतां आली असती. कां केलं नाहींस तसं ? अजूनसुद्धां कां त्या दोघींसाठीं इतकी मरतेयस ? ही घडण लग्नाच्या गाठीनं का घडवली ?—" क्षणभर थांबून ती म्हणाली, "—या दृष्टीनं मी आतां विचार करूं लागलेंय. होईना का गोपीनाथचं लग्न कुणाबरोबर तरी—"

तिच्या तोंडावर हात ठेवीत चंपा म्हणाली, "गप्प गप्प, भलतंच कांहीं बोलूं नकोस. माझं दिव्य मलाच माहीत. तुला त्याचा अंदाज यायचा नाहीं. आम्ही जें दिव्य केलं, तें करायचं जोखीम आमच्या पोरीबाळींवर पडायला नको, म्हणूनच मी एवढी तळमळतेंय. अगदीं विचार करूं नकोस या गोष्टीचा. माझ्यावर भार टाकून अगदीं स्वस्थ रहा. अगदीं चुकूनसुद्धां विचार करूं नकोस कसला. अजूनसुद्धां सारं कांहीं सुरळित होईल !" असें म्हणून तिनें शरयूला आपल्याजवळ ओढून घेतलें आणि एकाद्या लहान मुलाला

कुरवाळतात तशा रीतीनें तिच्या सर्वांगावरून हात फिरवीत ती म्हणाली, "बाई ग, हें मोठं दुर्धर जिणं आहे आमचं. घरीं आम्हांला कितीही मोठी किंमत येत असली तरी संसाराच्या बाजारांत आम्हांला एक कवडीचेंही मोल नाहीं. तें मोल वाढवून घ्यायचंय आम्हांला. त्या मोलासाठीं मी दिव्य केलं — माझ्यासारख्या आणखीं कित्येक जणींनीं त्या मोलासाठीं अशींच दिव्यं केलीं. त्याचीं फळं आज मिळताहेत म्हणूनच तूं म्हणतेस तसे आमचे डॉक्टर, वकील बॅरिस्टर मोठे झाले आहेत. त्या मोठेपणासाठीं आम्ही त्यांच्या आया ज्या खर्चीं पडलों आहोंत, त्यांचा हिशेब जगाच्या जमाखर्चाच्या वहींत शोधूनसुद्धां मिळायचा नाहीं. तुम्हाला तरी असं बिनहिशेबी जिणं मिळायला नको आहे, म्हणूनच मी आणि माझ्यासारख्या तळमळतों आहोंत. म्हणूनच म्हणतें, कीं माझ्यावर भार टाकून स्वस्थ रहा. एवढा सुद्धां विचार करूं नकोस. अजूनसुद्धां सारं कांहीं सुरळित होईल."

शरयू निघून गेली खरी पण तिचें समाधान झालें असेल असें चंपेला वाटलें नाहीं. तिच्या मनःस्थितींतला हा फरक चंपेच्या अंतःकरणाला फारच जाणवला. आयुष्याच्या अत्यंत महत्वाच्या अशा या काळांत ती अशी जिवावर उदार झालेली पाहून तारिणीपेक्षां आतां तिचीच काळजी जास्त घेतली पाहिजे, असें चंपेला वाटूं लागलें. स्वतःवर आलेलें हें जोखीम दुभागण्यासाठीं शरयूची हकिकत तारिणीला सांगावी असें क्षणभर तिला वाटत होतें. पण थोड्याशा विचाराअंतीं तसें करणें इष्ट आहे, असें तिला वाटेना. जगाच्या व्यवहाराच्या बाबतींत तारिणी अजून अज्ञान होती. अभ्यासापलीकडे तिनें इतर कोणत्याच गोष्टीकडे तीव्रतेनें लक्ष दिलें नव्हतें. मधुकर किंवा गोपीनाथ यांच्या प्रकरणीं उत्पन्न झालेल्या प्रश्नाकडे सुद्धां ती फारसा जिव्हाळा लावून पहात नव्हती. म्हणूनच कडेवर बसून हातानें टाळ्या पिटणाऱ्या या लेंकराला दुबळ्या पायांनीं चालण्यासाठीं गर्दींत सोडून देणें चंपेला निर्दयपणाचें वाटलें.

गोपीनाथच्या मनाची दिशा कळलेली असल्यामुळें आतां एकदां मधुकरच्या मनाचा ठाव पुनः घेऊन पहाण्याचा तिनें निश्चय केला. झाल्या भाषणापलीकडे तो जास्त कांहीं सांगेल असें तिचें तिलाच वाटत नव्हतें. तरीही एकदां खडा टाकून पहावा म्हणून मधुकर एकटा भेटण्याची संधी साधून ती म्हणाली, "मग पुढं काय झालं मधुकर ! काय म्हणते तुमची आई !"

" काय म्हणणार ? " मधुकर म्हणाला, " सारखी भुणभुण करीत होती आजपर्यंत. मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून आतां आपोआपच गप्प बसली आहे, झालं ! "

" असं कसं चालेल ? किती झालं तरी ती आई आहे. आईच्या हृदयाची कल्पना तुम्हां मुलांना होत नाहीं चांगलीशी. उगीच राहिली असली तर ती कांहीं सुखासमाधानानं नव्हे. निराश होऊन तिनं स्वस्थ राहावं हें बरं वाटतं का तुम्हाला ? "

" मी आतां बऱ्या वाईटाच्या पलीकडे गेलों आहें. कुणाचं बरं वाटणं हिशेबांत घेऊं ? माझं ? माझ्या आईचं ? माझ्या वडलांचं ? कीं जी कुणी उद्यां माझ्याशीं लग्न करणार आहे तिचं ? मनाचा चांगला पडताळा घेऊन मी पहातों, तेव्हां मला वाटतं, कीं सर्वांचं बरंवाईट पहाण्यापेक्षां आधीं स्वतःचं बरंवाईट पहावं ! तुमच्याकडे म्हणूनच मी इतकं स्पष्टपणानं बोलतोंय. दुसऱ्या कुणी विचारलं, तर असं सरळ उत्तर देणार नाहीं मी. हा अगदींच स्वार्थी आहे असं ऐकणारा म्हणेल मला. पण खोल विचार करून मी पहातों तेव्हां मला वाटतं, कीं स्वार्थ साधण्यासारखा दुसरा परमार्थ नाहीं. कुठल्या तरी पुस्तकांत असं वाचल्याचं आठवतं. वैयक्तिक स्वार्थाच्या समुच्चयांतून सार्वजनिक परमार्थाची निर्मिती होते असं मला वाटतं. कदाचित् इतर कुणाला तसं वाटलं नाहीं, म्हणून मी कांहीं त्याला दोष देणार नाहीं. साधारण शहाण्या माणसाची प्रवृत्ति अशी असते, कीं जेव्हां कांहीं बोलायचं तेव्हां तें लोकांना रुचेल असंच बोलायचं. त्या बोलण्यांत मग फारसा प्रामाणिकपणा नसला तरी चालेल. इतरांकडे बोलतांना मी तसाच बोलतों — माफ करा हं — तुमच्याकडे कशाला चोरून ठेवूं ?—जगाचे व्यवहार हे असे आहेत. खरं बोललं तर तें पटतच नाहीं कुणाला. पटेल असं बोलावं अन् आपल्याला वाटेल तसं वागावं, असं करायचं ज्याला साधतं तोच माणूस या संसारांत यशस्वी होतो. व्यवहारी माणसाच्या दृष्टीनं मी मूर्ख ठरावं असं केव्हांच मला वाटत नाहीं. म्हणूनच आईची भुणभुण मी अशा रीतीनं बंद करून टाकली आहे !—"

" अशा रीतीनं म्हणजे कशी ? "

क्षणभर थांबून अत्यंत गंभीर मुद्रा करून तो म्हणाला, " अशा रीतीनं म्हणजे—अशा लौकिक व्यवहारी दृष्टीनं कांहीं तरी उत्तर द्यायचं, वेळ मारून न्यायची आणि विषय तेवढाच राहूं द्यायचा,—"

" आतां सुद्धां तेंच करतां आहांत ! " चंपा हंसून म्हणाली, " मन मोकळं करून माझ्याकडे सांगायचं अशी नुसती प्रस्तावना केली तुम्ही—बोललांही खूपखूप—पण त्यांतून निष्पन्न झालं नाहीं कांहींच ! "

" असं झालं खरं. " मधुकर उगीच थोडेंसें हंसून म्हणाला, " मनाचा दरवाजा सताड उघडा ठेवून राहायची मला संवयच नाहीं मुळीं, तेव्हां हें असं होतं.—"

" थांबा.—" चंपा म्हणाली, " मला आतां अगदीं सरळसरळ सांगा—कोण मुलगी आहे ती ?—" तो गंभीर चेहरा करून उगीच राहिला असें पाहून ती म्हणाली, " माझ्याकडून कांहीं प्रयत्न करतां येईल कीं नाहीं तें एकदां पाहीन, म्हणून मी विचारतें. "

पुनः तो बराच वेळ स्वस्थ राहिला. त्याच्या उत्तराची अपेक्षा करीत तीही तशीच स्वस्थ राहिली होती. एकदम एक उसासा टाकून तो म्हणाला, " नाहीं ! त्यांत कांहीं अर्थ नाहीं. हें माझं प्रकरण माझ्यापुरतंच राहिलं पाहिजे. तुमच्या कळकळीची मी उपेक्षा करतों असा मुळींच समज करून घेऊं नका—मी थोडासा फाजिल अभिमानी माणूस आहें—माझे व्यवहार दुसऱ्या कुणी उकलले तर तें मला बरं वाटायचं नाहीं. माफ करा हं. तुमचा उद्देश मला कळतो—कळकळही जाणवते—पण माझा अभिमान मला सांगतो, कीं मधुकर, तुझीं कोडीं तूंच सोडव, सोडवतां येत नसतील तर तसाच रडत बस, पण दुसऱ्याच्या हातून तुझ्या आयुष्यांतील भानगडी उकलल्या गेल्या असं म्हणायचा प्रसंग येऊं देऊं नकोस—" जिन्यावर कुणाचीं तरी पावलें वाजल्याचें ऐकून तो म्हणाला, " आली वाटतं मंडळी ! माफ करा हं. तसंच कांहीं झालं तर पहिल्यानं मी तुम्हाला सांगेन—पण तोंपर्यंत मला कांहीं विचारूं नका. "

चंपेचें समाधान झालें. मधुकरकडून असेंच कांहीं तरी उत्तर येईल याची तिला खात्री होती. पण नुसत्या अंदाजापेक्षां प्रत्यक्ष पुरावा मिळवण्यासाठीं म्हणूनच तिनें तो प्रश्न टाकला होता.

एका विशिष्ट मर्यादेवर येऊन या प्रकरणांतली सारी हालचाल थांबली आहे असेंच तिला दिसून आलें. कांहीं दिवस तिनें स्वस्थ राहायचें ठरवलें. गोपीनाथ आणि शरयू यांच्या मधला अबोला आतां नाहींसा झाला होता. पूर्वीप्रमाणें जरी नमलें तरी कमीजास्त प्रमाणांत एकमेकांकडे त्यांचे जाणें-

येणें सुरू झालें होतें. मात्र त्यानें शारदाबाईचें घर वर्ज्य केलें होतें. शारदाबाईही त्याला विसरून गेली होती. तारिणीला गोपीनाथची आठवण होती कीं नाहीं याचा चंपेला अंदाज नव्हता. तारिणीनें पुनः अभ्यासाला सुरवात केली होती. गोपीनाथ देखील एम्. ए.चाच अभ्यास करीत होता पण त्या दोघांचे विषय एक नसल्यामुळें त्यांची भेट होत नव्हती. गोपीनाथनें मुद्दामच आपला विषय बदलला असें चंपेला वाटत होतें. तारिणीला काय वाटत होतें याचा एकदां अंदाज घ्यावा म्हणून तिनें जेव्हां तिला प्रश्न केला तेव्हां ती म्हणाली, " तसं असेलही कदाचित्. मी फारसा विचार केला नाहीं त्या गोष्टीचा. पूर्वी आम्ही दोघं एका जागीं बसून अभ्यास केला. एक प्रकारची मदत मिळाली मला त्याची. पण आतां तें माझ्या मनाला लागून राहिलंय. कुणाच्या तरी मदतीचा भाग माझ्या यशाला कारणीभूत झाला हें आतां जाणवतंय माझ्या मनाला. त्यानं मुद्दामच आपला विषय बदलला असं तूं म्हणतेस, तेंसुद्धां मला पटतं. कदाचित् माझ्यासारखं त्यालाही वाटत असेल. आपल्या यशांत दुसरा कुणीतरी वाटेकरी आहे, हें ज्याला जाणवत नाहीं त्या माणसाची माणुसकी लंगडी आहे असं मी म्हणेन. अभिमानी जीवाला तें पटत नाहीं, तसंच तें त्यालाही पटलं नसेल—"

तिला मधेंच थांबवून चंपा म्हणाली, " आतां मला सरळ उत्तर दे तारू— इतके दिवस तुम्ही एका जागीं बसून अभ्यास केला, इतक्या दिवसांच्या सहवासांत स्नेहाचे धागेदोरे म्हणून कांहीं तरी उत्पन्न झाले असतीलच कीं नाहीं ? आतां त्यानं मुळींच घर टाकलं, तूं कधीं नांवसुद्धां काढीत नाहींस — हें असं कसं झालं ? भांडणतंटा झाला म्हणावा तर तसंही कांहीं नाहीं, मग दोघं इतकीं एकदम दूर कशीं झालांत ? त्याचं कांहीं मला कळणं शक्य नाहीं, पण तुला मी असं विचारतें, त्याची आठवणसुद्धां कधीं येत नाहीं का तुला ? "

उत्तर देण्यापूर्वी तारिणीनें थोडावेळ आपल्या मनाशीं विचार करण्याइतका अवधी घेतला आणि नंतर ती म्हणाली, " तशी आठवण येते—नाहीं कसं म्हणूं ? आठवण येते खरी, पण मुद्दाम जाऊन त्याला शोधून काढावं असं कांहीं वाटत नाहीं. परीक्षेचा रिझल्ट लागला तेव्हां इतक्या जणांनीं माझं अभिनंदन केलं पण त्यानं एक बोटभर चिठ्ठीसुद्धां पाठविली नाहीं. अभिनंदनाचं पत्र मी पाठवलं, त्याचं अभिनंदन करायचं कर्तव्य मी केलं, पण

त्यानं मात्र हें असं मौन धरल्यावर मला राग आला—कळवळून चीड येऊं लागली–अन् होतां होतां आतां त्याची आठवणसुद्धां बुजून गेली. लहानपणचे असे किती दोस्त होते शाळेंतले !—मुलगे होते, मुली होत्या, अगदीं घनदाट मैत्री होती कित्येकांची—पण आज त्यांतल्या कुणाची मला आठवण नाहीं कीं माझीही त्यांना आठवण नाहीं. जुन्या पुस्तकांतलीं पहिलीं पानं फाडून टाकावीं तसं झालंय तें. हेंही एक त्यांतलंच—" चंपेकडे पाहून खवचटपणानें हंसून ती म्हणाली, " तूं कां असं विचारलंस तें मला कळतं. तसं कांहीं असतं तर मी तुला उघड उघड सांगितलं असतं—पण कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां मला वाटत नाहीं त्या माणसाबद्दल. रेल्वेंतल्या प्रवासांतलीं दोस्ती अन् ही दोस्ती, दोन्हीही सारख्याच—"

" मधुकरबद्दल काय वाटतंय तुला ? " चंपेनें एकदम मधेंच विचारलें.

पुनः तारिणी क्षणभर थांबली आणि म्हणाली, " तसा त्याचा माझा फारसा परिचय सुद्धां नाहीं. ओळखीची सुरवात झाली आहे भांडणामुळं. आतां तो आपल्याकडे येतो, आईच्या बैठकींत बसतो, चर्चा करतो, अन् जातो. माझा कुठं संबंध येतो त्याच्याशीं ? माझा परिचय करून घ्यायचा तो कधीं प्रयत्न करीत नाहीं, कीं मलाही वाटत नाहीं त्याचा परिचय करून घ्यावा म्हणून. तुझा त्याचा परिचय झालाय. आईपेक्षांसुद्धां तो तुझ्याकडे जास्त मनमोकळेपणान बोलतो हें मी पाहातेंय, म्हणून मला वाटतं, कीं तुला त्याच्याबद्दल अलीकडे थोडीशी जास्त आपुलकी वाटूं लागलीय. अन् म्हणूनच हे असले प्रश्न करतेस मला !—होय ना ? मग सरळ सरळच कां विचारलं नाहींस मला, कीं गोपीनाथ आणि मधुकर या दोघांपैकीं कुणाशीं लग्न करायची माझी तयारी आहे, म्हणून ? "

" हो. " चंपा म्हणाली, " तेंच विचारणार होतें मी. म्हणूनच तुला त्या प्रत्येकाबद्दल काय वाटतं तें आधीं विचारलं—"

" काय चमत्कार आहे ! " तारिणी म्हणाली, " लग्नाच्या पायीं आईच्या जन्माचे कसे धिंडवडे झाले ते तूं पाहिलेस. तूं होतीस म्हणून आम्हांला हे दिवस दिसले. अन् तूंच आतां विचारतेस मला ?—मी तुला नकोशी का झालेंय ? जाऊं दे एकदा ही ब्याद घराबाहेर, असं का तुला वाटतंय ? "

" आतां काय म्हणावं तुला ? " चंपा म्हणाली, " जरा लहान असतीस तर चांगला कान पिरगळून दोन गालगुच्चे घेतले असते असं कांहीं तरी

बोलतेस म्हणून—" तारिणीला जवळ ओढून घेऊन तिला कुरवाळीत चंपा म्हणाली, " किती मोठी झालीस तरी तूं माझ्या नजरेला कांहीं मोठी दिसत नाहींस. पण इकडे तिकडे पाहूं लागलें, कीं तूं आतां लहान नाहींस याची जाणीव होते मला. लहानच वाटतेस, म्हणून तुला दूर करायची कल्पना दुःसह होते—पण मोठी झाली आहेस असं ज्यावेळीं दिसतं त्यावेळीं आतां कुणाच्या तरी सहवासांत तूं सुखी झाल्याचं पाहून मग मरावं, असं मनांत येऊं लागतं. तूं नकोशी झालीस म्हणून का मी असं म्हणतें ? ओझं झालं म्हणून का कुणी मुलीचं लग्न करून देतं ? लग्न केव्हां तरी केलं पाहिजे ना ?—केव्हां तरी दुसऱ्याच्या घरीं गेलं पाहिजे ना ?—हल्लीचीं हीं लग्नं पाहिलीं, कीं मला मोठं दुःख होतं. विजोड-जोडपीं दिसतात सगळीकडे. प्रौढ विवाह सुरू झाले—बालविवाहाचं खुळ गेलं—प्रीतीविवाह देखील सुरू झाले म्हणतात, पण माझ्या नजरेला तें कांहीं पटत नाहीं. माझ्यासारख्या एकादीला पैसे टाकून आश्रयाला ठेवणारा शेट, आणि प्रेमाचं नांव घेऊन आपल्यापेक्षां दहा वर्षांनीं लहान असलेल्या भाबड्या पोरीला बगलेला मारणारा तरूण, हे दोघेही माझ्या दृष्टीनं सारखे आहेत. बालविवाह चांगले असं कांहीं मी म्हणत नाहीं, पण त्यावेळीं नवरा-बायकोच्या वयांत फार तर दोन तीन वर्षांपेक्षां अंतर नसे. गुजरातेंत तर नवऱ्यापेक्षां बायको मोठी असायची. हे विवाह जरी सक्तीचे होते तरी त्यांची संतती चांगली निर्माण होत होती, ती वयांत फारसं अंतर नसल्यामुळं. मला कांहीं तें तुमचं शास्त्र कळत नाहीं, पण तेव्हांची आणि आतांची आयांची परिस्थिति पाहिली, कीं लग्न करायचं असलं तर वयाचं अंतर वाढलं नाहीं तोंपर्यंत तें करून टाकावं, असं मला वाटूं लागलंय. "

" अन् मग प्रेमाचं काय ? "

" प्रेमाचं काय ! " चंपा उद्गारली, " माझा विश्वास नाहीं या प्रेमावर. फार ढोंग माजलंय अलीकडे या प्रेमाचं ! ती लबाडी आहे—भुलावणी आहे. कामुकतेच्या उत्कटतेवर पांघरूण घालण्यासाठीं घेतलेलं तें एक खोटं नांव आहे. कसलं आलंय प्रेम ! आमच्या जातीला जाऊन विचार ना या प्रेमाचा इतिहास—त्या सांगतील तुला प्रेम म्हणजे काय आहे तें. पैसा न् रूप, विद्वत्ता न् रूप, अधिकार न् रूप, कीर्ति न् रूप, अशा कांहीं तरी जोड्या आहेत या. पैसा, विद्वत्ता, कीर्ति, अधिकार हे पुरुषांचं भांडवल आणि

तारुण्य आणि सौंदर्य हें स्त्रीचें भांडवल. या दोहोंतला विक्रा असतो तो. विकत घेणारा पुरुष आणि विकली जाणारी स्त्री, असा अगदीं अविच्छिन्न नात्याचा प्रकार आहे हा. त्या विक्रींत आणि खरेदींत कुठं तरी वैगुण्य असलं म्हणजे प्रेमाचं नांव घेऊन सांधा जोडायचा अन् म्हणायचं कीं तो प्रेमविवाह होता. असं चाललंय आज जिकडे तिकडे. तसं व्हायला नको आहे तुझ्या बाबतींत. कॉलेजांत वावरत असलीस तरी अजूनपर्यंत तुझा इतर तरुणांशीं कांहीं परिचय झालेला नाहीं—परिचय व्हायचा तूं कधीं प्रयत्न केला नाहींस, कधीं त्यांच्यांत मिसळली नाहींस, ही माझ्या दृष्टीनं तुझी चूक झालीय. कसला हा अभ्यास! परीक्षेच्या निकालावर सर्वस्वी अवलंबून राहायचं, हें असलं जिणं तरी कसलं? अर्धं आयुष्य उलटून जाईपर्यंत जगाच्या व्यवहाराची ओळखसुद्धां करून घ्यायची नाहीं अन् मग आयुष्याचं मातेरं झालं चुकून, तर परिस्थितीला नांवं ठेवायचीं! तें कांहीं मला पटत नाहीं. तसं पाहिलं तर या दोघांचाच काय तो तुझ्याशीं परिचय झालेला आहे. अगदीं काटेकोर हिशोबानं बोलायचं तर एकाचाच. पण मला पहिला प्रश्न करायचा तो हा, कीं तुला लग्न करायचंय कीं नाहीं? काय आयुष्याचं ध्येय ठरवलंयस तूं?"

तिच्या शेवटच्या प्रश्नाच्या भाषेंतली तीव्रता ऐकून तारिणीला क्षणभर धक्का बसल्यासारखें वाटलें. पूर्वी हाच प्रश्न तिनें विचारला होता. पण या वेळच्या विचारण्यांत जी प्रखरता होती, ती तारिणीला चांगलीच जाणवल्यावांचून राहिली नाहीं. कांहीं वेळ तीं अगदीं सुन्न झाल्यासारखी झाली. चंपाही तितकीच स्तब्ध होऊन तिच्या उत्तराची वाट पहात होती.

उत्तर देण्यासाठीं भरलेलें अंतःकरण रितें करण्याइतक्या जोरानें एक मोठा उसासा टाकून तारिणी म्हणाली, "आतां याच प्रश्नाचा मी चांगला विचार करीन, तूं काय म्हणतेस तें आज मला कळलं. अजून मी फारसं लक्ष घातलं नव्हतं या प्रश्नांत—"

"तर मग आतां चांगलं जीव तोडून लक्ष घाल आणि शक्य तितक्या लवकर मला या प्रश्नाचं उत्तर दे." असें म्हणून चंपा तिथून निघून गेली.

तारिणीच्या मनावर हा पहिलाच आघात झाला होता.

---

# १३ काशिनाथ

कांहीं दिवस असेच निघून गेले. येणें—जाणें, चर्चा—बैठका, पुस्तक-प्रसिद्धी, वगैरे गोष्टी पूर्वीप्रमाणेंच सुरू होत्या. अजूनही गोपीनाथ शारदा-बाईला किंवा तारिणीला भेटायला आला नव्हता. शरयूशीं धरलेला अबोला मात्र त्यानें सोडला होता, तरीही पूर्वींच्या ठरलेल्या लग्नाच्या कराराच्या बाबतींत बोलायचें मात्र तो अजूनही टाळीत होता.

शरयू आतां बी. ए. झाली होती. गोपीनाथचा कायद्याचा अभ्यास तसाच सुरू होता. अभ्यास सुरू असतांना तो कुठें तरी नोकरी करीत होता. कॉलेजला हजर राहण्याची वेळ साधून असलेली ही नोकरी मिळाल्यामुळेंच तो या नोकरीच्या भानगडींत पडला होता. गृहस्थिति तितकीशी चांगली नसलेली, कुटुंबाचा भार वाढत आलेला, लढाईमुळें उत्पन्न झालेली अवास्तव महागाई वगैरे कारणें लक्षांत घेऊन त्यानें ही नोकरी पत्करली होती. निदान शरयूला तरी तो असें सांगत असे.

मधुकरची गृहस्थिति देखील तितकीच समाधानकारक नव्हती. तो एम्. ए. च्या टर्म्स् भरीत होता. भरपूर वेळ असतांनासुद्धां त्यानें नोकरी पत्करली नाहीं याचें सर्वांनाच आश्चर्य वाटत होतें. त्याचा सारा वेळ अलीकडे शारदाबाईच्या घरीं जात असे. परदेशी लेखकांचे जसे सेक्रेटरी असतात, तसेंच पण विनावेतन सेक्रेटरीचें काम त्यानें पत्करलें होतें. लढाई सुरू झाल्यापासून थोडा काळ गेल्यानंतर पुस्तकांना अतोनात मागणी येऊं लागली होती. कागदाच्या टंचाईची चोहीकडून हाकाटी होत असतांनाही नवीं नवीं वर्तमानपत्रें, मालांच्या नांवाखालीं मासिकें, कादंबऱ्या आणि कथासंग्रह प्रसिद्ध होण्याची एकच झुंबड उडाली होती. पुस्तकांच्या बाजाराला इतकी तेजी आल्याचा दाखला यापूर्वींच्या मराठी पुस्तकप्रसिद्धीच्या इतिहासांत शोधून सांपडला नसता.

मागणीप्रमाणें पुरवठा करण्याचें काम बिनतक्रार पत्करल्यामुळें शारदा-बाईला आपलें लेखनकार्यही वाढवावें लागलें होतें. बरेंचसें लेखन जरी ती स्वतः करीत असे, तरी मागणी आणि पुरवठा यांचा मेळ घालण्यासाठीं

अलीकडे लेखकाला सांगून लिहिण्याची नवी संवय तिनें सुरू केली होती. तें लेखकाचें काम मधुकरनें पत्करलें होतें. त्यामुळें मधुकर म्हणजे आतां एक घरचाच मनुष्य होऊन बसला होता. प्रकाशक आणि पुस्तकविक्रेते यांच्याबरोबर व्हायचे सारे व्यवहार मधुकरच पहात असे. व्यवसायाच्या कामीं करायला लागणाऱ्या साऱ्या उलाढाली आणि घासाघिशी करायचें सामर्थ्य त्याच्या अंगीं असल्यामुळें शारदाबाईनें आतां सारा भार त्याच्यावरच टाकला होता. आतां चंपादेखील थोडीशी बाजूलाच पडली होती—म्हणजे चंपेवरचा शारदाबाईचा विश्वास डळमळला होता असें नव्हे, किंवा ते व्यवहार करायला चंपा आतां पूर्वीप्रमाणेंच समर्थ राहिली नव्हती असेंही नव्हे—तर चालू धकाधकीच्या मामल्यांत अट्टल व्यवहारी माणसाशीं दोन हात करण्याचें सामर्थ्य चंपेपेक्षां मधुकरच्याच अंगीं जास्त आहे असें दिसून आल्यावरून, तिच्याच संमतीनें या कामाची सारी जबाबदारी मधुकरवर टाकण्यांत आली होती आणि ती जबाबदारी पार पाडण्याच्या कामीं तो आपलें शक्तिसर्वस्व खर्चीं घालीत आहे असें प्रत्यक्ष पुराव्यानें सिद्ध होत होतें.

अत्यंत कामसू आणि प्रामाणिक वृत्तीमुळें शारदाबाईचे सारे आर्थिक व्यवहार आतां मधुकरच्या हातीं गेले होते. त्याच्या अभावीं सारे व्यवहार अडून बसले असते. असें होतें तरीही या व्यवहारापलीकडे इतर कोणत्याही घरगुती बाबतींत तो यत्किंचित्‌ही लक्ष घालीत नव्हता. तारिणीशीं त्याचा संबंध क्वचितच येई.

तारिणी आतां एम्. ए. झाली होती. मधुकरसुद्धां याचवेळीं एम्. ए. झाला असता पण वर्ग मिळविण्याच्या अपेक्षेनें म्हणा, किंवा इतर कोणत्या कारणानें म्हणा, यावर्षी तो परीक्षेला बसला नव्हता. तारिणी मात्र पहिल्या वर्गात आली होती.

नोकरी करण्याची आवश्यकता भासण्याइतकी तारिणीची गृहस्थिति कांहीं हलाखीची नव्हती. पण नोकरी करण्याच्या हुल्लडीचा तो काळ होता. प्रत्येक पुरुष आणि स्त्री मिळेल ती नोकरी पत्करीत होती. नवें उघडलेलें रेशनिंग खातें तर बहुतेक सारें मुलींनींच व्यापून टाकलें होतें. मॅट्रिक झालेल्या प्रत्येक मुलीला पन्नास रुपये पगार आणि चवदा रुपये भत्ता मिळत असल्यामुळें, कॉलेजांत जायचें टाकूनसुद्धां मुली या रेशनिंग खात्यांत नोकरी पत्करीत होत्या. वरच्या वर्गात पास झालेल्या पदवीधर मुलांना

आणि मुलींना १४४ रुपये पगार मिळत असल्यामुळें शाळांतून मास्तर आणि मास्तरणी मिळणें सुद्धां मुष्किलीचें होऊन बसलें होतें. या नोकरी पत्करण्याच्या हुल्लडींत सारेच उमेदवार गरजू होते असें मुळींच नाहीं. वशिले लागत होते ते सुखवस्तु लोकांचे किंवा श्रीमंत लोकांचे. त्यामुळें नुसत्या चैनीसाठीं पुष्कळशा सुखवस्तु लोकांच्या मुली अशा नोकऱ्या पत्करीत होत्या. गरीब उमेदवारांच्या तोंडचा घास आपण काढून घेत आहोंत याची त्यांना जाणीव नव्हती—किंवा जाणीव असूनही स्वतःच्या चैनीची आवड दुसऱ्याच्या गरजेपेक्षां मोठी वाटत असल्यामुळें अशाप्रकारें नोकरी पत्करण्यांत त्यांना दिक्कत वाटत नव्हती. तारिणीनें जी नोकरी पत्करली ती मात्र या रेशनिंग खात्यांत नव्हे—आपलें आवडतें शिक्षणाचें कार्य करण्यासाठीं आपण ही कॉलेजांतील लेक्चररची नोकरी पत्करली, असाच तिचा दावा होता. शरयूनेंही नोकरी पत्करली होती—आणि ती सुद्धां रेशनिंग खात्यांत. आवडतें काम करण्याची लंगडी सबब सांगायलाही या बाबतींत तिला आधार नव्हता. पुढें अभ्यास करायचें तिच्या मनांत नव्हतें. घरीं रिकामें बसणें असह्य झाल्यामुळेंच तिनें ही नोकरी पत्करली होती.

एक मधुकरखेरीज बाकी सारीं आतां नोकर झालीं होतीं. नोकरी करीत असूनही नोकर नव्हता काय तो एक मधुकर. चंपेला तें पटत नव्हतें. ती शारदाबाईला म्हणाली, "या गर्दीच्या काळांत मधुकरसारखा सेक्रेटरी मिळाला हें खरोखरच आपलं भाग्य होय. प्रत्येक काम कसं अगदीं बिनचूक करतो तो. व्यवहारांत तुझ्याकडून वारंवार जी ढिलाई होत असे ती आतां बंद झाली आहे. कामही चांगलं येतंय आणि आवकही चांगली होतेय, मग त्याचा फायदा मधुकरला कां देऊं नये ?"

"तेंच मी म्हणत होतें," शारदाबाई म्हणाली, "मी त्याला विचारलं पण तो साफ नाकबूल करतो. माझं मुळींच ऐकून घेत नाहीं. मला तें जाणवतं. त्याच्याबद्दल आपल्याला एव्हढासुद्धां परकीपणा वाटत नाहीं. तारिणी मुलगा असती तर तिनंसुद्धां एव्हढ्या कसोशीनं काम केलं नसतं. मुलीला सुद्धां हें काम करतां येणं अशक्य आहे असं नाहीं पण तें कधीं तिच्या लक्षांतच आलं नाहीं. ती अगदींच एकमार्गी आहे. मोठा विलक्षण मुलगा आहे हा मधुकर. केव्हां या व्यवहाराकडे पहायला त्यानं सुरवात केली अन् केव्हां तो व्यवहार त्यानं आपल्या हातीं घेतला तें मला कळलंसुद्धां

नाहीं. आजच्या पिढींत अशी मुलं मिळणं मोठं दुर्मिळ आहे. कोणत्याही पिढींत का होईना, बुद्धिमत्ता नि व्यवहारचातुर्य एका जागीं क्वचित्‌च दिसून येतं. पण आजच्या पिढींत अगदीं दुर्मिळ असलेला हा गुण मधुकरच्या अंगीं आहे असं पाहून मला फारच आपुलकी वाटूं लागली आहे त्याच्याबद्दल ! "

" तें खरं आहे, " चंपा म्हणाली, " पण मला कांहीं तें पटत नाहीं. त्याची गृहस्थिति कांहीं तितकीशी चांगली नाहीं. सारीं माणसं आतां नोकरीला लागलीं आहेत. सुशिक्षितांची बेकारी अजिबात नाहीशी झाली असं सारीं वर्तमानपत्रंसुद्धां म्हणताहेत. अशावेळीं मधुकरनं आमच्या घरीं येऊन फुकट राबावं हें मला कांहीं पटत नाहीं. तुला कसं पटतं हेंच मला कळत नाहीं. उत्पन्नाचा कांहीं वांटा त्याला द्यावा असं म्हटलंस तर तें तो पत्करील असं मला मुळींच वाटत नाहीं. तो व्यवहारी माणूस आहे खरा—पण मी सांगतें, तो कांहीं मोठासा भावनाशील नाहीं. माझं म्हणणं तुला पटो कीं न पटो, पण मला तो माणूस मोठा स्वार्थी वाटतो—

" भलतंच कांहींतरी ! " शारदा तिला मधेंच थांबवून म्हणाली, " कसला स्वार्थ आहे त्याचा ? मी कांहीं कुणी अधिकारी नाहीं, कीं माझं कुठं वजन नाहीं. माझी मर्जी संपादून काय मिळवणार आहे तो ? "

" तेंच मला सांगायचं आहे. " चंपा म्हणाली, " किती दिवस सांगेन सांगेन म्हणून म्हणतें आहें पण तशी संधीच आली नव्हती. घरसंसाराकडे तूं कांहीं पाहत नाहींस—मी तो भार घेतला आहे खरा--तारिणीबद्दलसुद्धां तूं कांहीं काळजी करीत नाहींस—तिचाही भार मी घेतला आहे खरा, पण आतां कांहीं गोष्टी माझ्या आटोक्याच्या बाहेर जाऊं लागल्या आहेत. आपली दोघींचींही आयुष्यं मोठीं विलक्षण झालीं. नातं एक, झालं भलतं. तुला एक कांहीं दिशा लागली—मी हा घरसंसार घेऊन बसलें ! घरसंसार घेऊन बसलें हेंच मोठं कठीण झालं मला. तारिणीचा भार त्यामुळं माझ्यावर पडला. तिचा अभ्यास सुरळीत चालला होता, ती सारखी परीक्षा पास होत होती—आतां तिनं नोकरी पत्करलीय पण तिनं नोकरी पत्करली हेंच मला आवडलं नाहीं. संसारांत पडायचं तिचं हें वय—"

" थांब, थांब—" शारदा उद्गारली, " या जुन्या कल्पना आतांच्या नव्या मुलांना सांगून पटायच्या नाहींत. त्यांचीं तींच काय तें ठरवतील—"

"तें खरं आहे!" चंपा हंसून म्हणाली, "—कितीही जुन्यानव्याची वाटाघाट आपण केली तरी जित्या माणसाची घडण कांहीं बदलतां यायची नाहीं. परिस्थितीमुळं थोडासा फरक होतो, नाहीं असं नाहीं, तो दिसूनसुद्धां येतो—पण ज्या वयांत ज्या गोष्टी व्हायच्या त्या वयांत त्या झाल्या नाहींत तर माणसाच्या आयुष्यांत होऊं नये ते फरक होतात. मी कांहीं अगदीं जुन्या काळची नाहीं. रोज पुष्कळसं इथं ऐकतें त्याचा परिणाम होतोय माझ्या मनावर. पण आज जें कांहीं चाललंय त्यांत कुठं तरी चुकतंय असं मला वाटतंय. बालविवाह गेले खरे पण विजोड विवाह होताहेत आज. नवरा आणि बायकोंत दहा दहा बारा-बारा वर्षांचं अंतर येत असलेलं मला कांहीं पटत नाहीं. तुला पटतं का?"

"मुळींच नाहीं! जोडपं समवयस्क असणं बरं असंच मला वाटतं."

"मग होतंय का तसं? आजचीं जोडपीं समवयस्क आहेत का? मला तरी समवयस्क जोडपीं आज कुठं दिसत नाहींत. आतां तारिणीकडेच पहा, नोकरीचा हट्ट धरून ती अशींच कांहीं वर्षं घालवील तर समवयस्क नवरा मिळणं तिला कठीण जाईल, असं नाहीं का तुला वाटत?—" शारदाबाईनें कांहींच उत्तर दिलें नांहीं असें पाहून क्षणभर थांबून चंपा म्हणाली, "हेंच मला जाणवतंय. तूं कांहीं विचार केलायस का याचा? पहिल्यापासून ती अगदीं एकलकोंडेपणानं वागत आलीय. कुणाची ओळख करायला अशी तिनं कुठंच कांहीं संधि साधली नाहीं. ओळख झाली होती काय ती या दोघांचीं. एक गोपीनाथ अन् दुसरा मधुकर. गोपीनाथ अन् ती पूर्वीं बरोबर अभ्यास करीत होतीं. पुढं तोच येईनासा झाला. मधुकर कधीं तिच्या वाटेला जात नव्हता. त्याची अन् तिची पहिली ओळख झाली तीही वितुष्टांतूनच—पुढं त्यानंसुद्धां तिच्याशीं बोलाचालीचा फारसा संबंध ठेवला नाहीं. तो असतो काय तो तुझ्याकडे, तेवढीच तिची अन् त्याची ओळख. या झाल्या प्रत्यक्ष ओळखीच्या गोष्टी! आमची तरी कुठं कुणाशीं ओळख आहे? एक प्रकारें आम्ही वाळींत पडलेलीं माणसं आहोंत. तसा कुणा कुटुंबांचा आमच्याशीं घरोब्याचा संबंध नाहीं. बरं, जुन्या काळाप्रमाणें का आतां तारिणीचं लग्न ठरवायचंय?—कां? उगीशी राहिलीस? तारिणीचं लग्न झालं पाहिजे असं कधीं वाटलं आहे का तुला?"

शारदा गहिंवरलेली दिसली. क्षणभर तिच्या तोंडांतून एकही शब्द बाहेर फुटला नाहीं. तशाच गहिंवरल्या आवाजानें ती म्हणाली, "ही कल्पनाच

मोठी दुःसह होतेय मला. लहानपणापासून तारिणीचा सारा भार तूं घेतलायस. मी कांहीं तिला कडेखांद्यावर घेऊन खेळवली नाहीं, कीं जवळ घेऊन शिकवलंही नाहीं. तें सारं कांहीं तूं पाहत होतीस. तुझ्या हातीं ती कशी वाढतेय एवढंच नुसतं पाहत मी माझ्या कामांत डोकं खुपसून बसलें होतें. तसा तारिणीला माझा लळासुद्धां नसे. पण मला तिच्याबद्दल काय वाटतं तें कसं सांगूं ? माझ्या या दुःखी आयुष्यांत जगायला आधार म्हणून तारिणीच काय ती बुडत्याला काडी होती मला. त्या काडीच्या आधारावर मी आजवर हा दुःखाचा सागर पोहून गेलें होतें. तारिणीचं लग्न होणार, ती दुसऱ्याच्या घरीं जाणार, दुसऱ्याची होणार, तिच्यावरची माझी सत्ता—सत्ता कशी म्हणूं ?—तिच्या बद्दलचा माझा जिव्हाळा कुणामुळं तरी तुटणार, ही कल्पनाच मला सहन होत नाहीं. मी कांहीं तिच्या आयुष्याला पुरणार नाहीं खरी. पण मी जिवंत आहे तोंवर ती माझ्या नजरेपलीकडे जाऊं नये असं मला वाटलं तर तो माझा दोष का ? लेखनाच्या कार्यात मी माझा सारा जीव जरी गुंतवून टाकला आहे तरी माझा तो सारा जीव तारिणीभोंवतीं घुटमळतोच. ती कुठं तरी समोर दिसते म्हणून माझ्या हातून हें एवढं लेखन होतंय. माझी स्फूर्ति आहे ती ! ती माझ्या नजरेआड झाली तर माझं काय होईल तें कांहीं सांगतां यायचं नाहीं, इतका मी माझा जीव तिच्यां भोंवती गुंतवून ठेवलाय. तिचं लग्न होऊन तिनं मला सोडून जावं अशी कल्पना तरी कशी येईल माझ्या मनांत ? जशी मी तशीच तूं. मला वाटतं तसंच तुलाही वाटत असेल, अशी कल्पना करून मी स्वस्थ होतें. नि आतां तूं तिच्या लग्नाची गोष्ट बोलूं लागलीस ? कसं बोलवलं हें तुला ? ”

चंपा स्तब्ध झाली. शारदाबाई असें कांहीं बोलेल अशी तिला कल्पनासुद्धां नव्हती. कौटुंबिकतेच्या अभावामुळें या संसारांत जें वैशिष्ट्य आपणाला लाभलें नाहीं, तें आपलें दुर्भाग्य तारिणीच्या नशिबीं येऊं नये म्हणून तिचा जीव तळमळत होता. लग्नाचे दोन्ही प्रकार तिनें पाहिले होते आणि अनुभवले होते. लग्न म्हणजे जुगार आहे असें जें म्हटलें जात असे तेंही तिला पटत नव्हतें असें नाहीं. लग्न झाल्यानें शारदाबाई सुखी झाली नाहीं, लग्न न झाल्यानें आपण स्वतःही कांहीं सुख मिळवलें नाहीं, हेंही ती विसरली नव्हती. तरी पण जगांत नांदत असलेलीं सुखी कुटुंबें तिच्या नजरेसमोर होतीं. तें सौख्य तारिणीला लाभावें याच एका आंतरिक तळमळीनें तिचें लग्न होण्यासाठीं ती व्याकुळ झाली होती.

ती म्हणाली, " तूं म्हणतेस तें सारं खरं पण आपल्या सौख्यासाठीं तारिणीला का खर्ची घालायचीय ? तिचं सुख नको का पहायला ? आजन्म अविवाहित राहून तिचं जीवन सुखाचं होईल असं का तुला वाटतं ? "

" आज लग्न करून ती सुखी होईल अशी हमी तरी कोण देतंय ? तुला आहे का ती खात्री ? मी म्हणतें, चाललंय असंच चालूं द्या. तिला बरं वाटेल तसं ती करील. लग्न करावं असं तिला वाटलं, तर आपण कांहीं तिला अडथळा करूं नये, पण स्वतः लग्नाची गोष्ट ती जोंवर काढीत नाहीं तोंवर उगीच कां स्वतःच्या जिवाला त्रास करून घ्यायचा ? "

चंपा क्षणभर स्तब्ध राहिली. तिला देखील असेंच वाटत होतें. तरीही तारिणीच्या लग्नासाठीं ती तळमळत होती. जो प्रश्न तिला विचारायचा होता तो प्रश्न तसाच राहून गेला हें ध्यानांत येऊन ती म्हणाली, " आतां मला असं सांग, मधुकरबद्दल तुला काय वाटतं ? "

" तें मी सांगितलं ना आत्तांच ? "

" तसं नव्हे—मधुकरचं आणि तारिणीचं लग्न झालं तर तें आवडेल का तुला ? "

शारदाबाई क्षणभर स्तब्ध राहिली. ती बोलत नाहीं असें पाहून चंपा म्हणाली, " मधुकरनं कधीं अशी कांहीं गोष्ट काढली होती का तुझ्याकडे ? "

" छेः छेः मुळींच नाहीं ! " शारदाबाई उद्‌गारली, " त्यानं कधीं तारिणीचं नांव सुद्धां काढलं नाहीं माझ्याकडे—अन् मीही कधीं तसला कांहीं विचार आणला नाहीं मनांत. मधुकर हुशार आहे, कर्तृत्ववान आहे, माझ्यावर त्याची मोठी श्रद्धा आहे, तरीपण तारिणीचा नवरा व्हायला तो लायक आहे असं कांहीं मला वाटत नाहीं. "

" खरंच ? " चंपा हंसून म्हणाली, " आपलं तोंडाला आलं तें बोललीस कीं यावर कधीं विचार केला होतास ? "

तशीच हंसून शारदाबाई म्हणाली, " अगदीं बरोबर विचारलंस ! आपलं तोंडाला आलं तें बोललं हेंच खरं. केव्हांतरी असं कांहीं तरी माझ्या मनांत येत असे. नाहीं असं नाहीं. असं वाटे, उपयुक्त माणूस आहे, श्रद्धाळू आहे, कामसू आहे—नोकर रहा असं त्याला म्हणण्याइतकी मी कांहीं श्रीमंत नाहीं, कीं माझ्याकडे त्यानं नोकरीला राहावें—माझ्यासाठीं राबावें आणि चार पैसे

मिळवावे, असं वाटण्याइतका तोही कांहीं दुबळा नाहीं. तेव्हां वाटे, जमलं या दोघांचं तर आयतंच सारं कांहीं ठाकठीक होईल—" थोडा वेळ विचार करून ती म्हणाली, "—असं कांहीं मनांत येणं क्षुद्रपणाचं होतं असंही केव्हां केव्हां वाटे. किती झालं तरी आपण निराधार माणसं. पुरुष म्हणायला घरांत कुणीच नाहीं. कुणाला तरी घरजांवई करून घरीं ठेवून घेण्याइतकी मीही कांहीं श्रीमंत नाहीं. म्हणूनच वाटे, असं कांहींतरी व्हावं !—पण लगेच मनांत येई, ही वृत्ति स्वार्थी आहे. स्वतःच्या सुखासाठीं कां उगीच दुसऱ्याला कुठं तरी गुंतवून टाकावं ? पूर्वीच्या काळच्या माणसाच्या दृष्टीनं तो व्यवहार ठरला असता, पण आजच्या काळांत तें बरं दिसायचं नाहीं. थोडासा तरी स्वाभिमान असणाऱ्या कुणाही माणसाला घरजांवई व्हायची कल्पना कधींही पटायची नाहीं. दुसरं असं वाटे, माझ्यासाठीं तारिणीनं तरी कां खर्चीं पडावं ? मला घरजांवई मिळाला पाहिजे म्हणून तिनं तरी मी म्हणेन त्या माणसाशीं कां लग्न करावं ?—"

"एकूण तूं या गोष्टीचा विचार केला होतास तर !" चंपा म्हणाली, "अगदींच कांहीं मी विचारलं म्हणून तोंडाला येईल तें उत्तर दिलं नव्हतंस ! एवढं झालं तरी पुरे झालं. सध्यां हा विषयच नको. थोडासा अंदाज घ्यावा असं मला वाटलं होतं म्हणून मी बोललें. खरं पाहिलं तर मला मात्र तारिणीच्या लग्नाची तळमळ लागली आहे. तुला कांहीं वाटो, पण मला वाटतं, आपण आहों तोंवर तिचा संसार थाटलेला आपल्याला दिसला कीं जन्माचं सार्थक झालं, असं निदान मला तरी वाटेल."

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. चंपेला खरोखरच तळमळ लागली होती. तारिणीनें नोकरी पत्करली हें तिला पटलें नव्हतें. तशी नोकरी पत्करण्याची जरूरी नव्हती असें तिनें तिला बजावून सांगितलें तरीही तिचा शब्द न जुमानतां तारिणीनें ही नोकरी पत्करली होती. नोकरी पत्करल्यापासून तारिणीच्या वृत्तींत बराच फरक पडला होता. ती प्रोफेसर नव्हती खरी पण आपल्या कामाबद्दल तिला हार्दिक कळकळ असल्यामुळें कोणत्याही विषयाची तयारी केल्याशिवाय शिकवायला जाणें तिला पत्करत नसे. कॉलेजचा वेळ सोडून इतर वेळांत म्हणूनच ती बरेंचसें वाचन करीत असे. तें वाचन घरीं झालें असतें तर चंपेला कांहीं वाटलें नसतें. पण हा तिचा सारा वेळ बहुधा कॉलेजच्या किंवा युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत जात असे.

सारख्या परीक्षा पास होत गेल्यामुळें आणखी एकादी पदवी मिळवण्याचा हव्यास तारिणीच्या मनांत उत्पन्न झाला होता. रोजच्या कामाला अवश्य असलेलें वाचन करण्याकरतां जे परिश्रम करावे लागत, त्यामुळें डी लिट्साठीं एखादा निबंध पाठविण्याची कल्पना तिच्या मनांत येऊं लागली आणि त्या अनुरोधानें तिनें आपल्या अभ्यासाचें क्षेत्र वाढवायला सुरवात केली होती. या वाचनापार्थींच ती उभा दिवस घरीं नसे हें चंपेला जाणवत होतें.

चंपेनें तसें तिला बोलूनही दाखवलें पण त्याचा परिणाम कांहीं तिच्या मनावर झाला नाहीं. परीक्षेच्या वेडानें तिच्या मनाची पकड घेतली होती. त्या पकडींतून आतां तिला सोडवणें कठीण आहे असें चंपेला वाटलें.

कॉलेजांत ती सर्वांशीं फटकून वागत असे. इतर कुणा प्रोफेसरशीं ती फारशी मिसळत नसे इतकेंच नव्हे, तर कुणाशीं परिचय करायचें देखील ती शक्य तोंवर टाळीत असे. तिथें तिचा परिचय झाला होता तो एकाच व्यक्तीशीं. तो कॉलेजचा कारकून होता. लायब्ररीची व्यवस्था पाहण्याचें कामही त्याच्याकडेच होतें. त्याचें नांव काशिनाथ असें होतें. या जुन्या काळच्या नांवामुळें कॉलेजांत त्याची थट्टा होई. त्याचें आडनांव कुणी हिशेबांत घेत नसे. मॅट्रिकच्या परीक्षेला तीनचार वेळ बसून नापास झालेला हा माणूस कॉलेजच्या प्रपंचांत आला कसा, याचेंच सर्वांना आश्चर्य वाटे.

तो सर्वांच्या थट्टेचा विषय झाला होता म्हणूनच तारिणीचें लक्ष त्याच्याकडे वेधलें. लायब्ररींत जाऊन बसण्यापेक्षां टेनिस कोर्टवर जाणाऱ्यांची संख्या अर्थातच जास्त होती. तसाच गळ्याला फांस लागल्याशिवाय लायब्ररींत कुणी बसत नसे. असा फांस लावून घेतला होता म्हणूनच तारिणीला लायब्ररींत बसावें लागत होतें आणि म्हणूनच तिचें लक्ष काशिनाथकडे वेधलें.

काशिनाथला वाचनाचें वेड होतें. कारकुनीचें काम शक्य तेवढ्या लवकर आटोपून तो लायब्ररींत येऊन बसत असे. विद्यार्थ्यांना पुस्तकें काढून देण्याचें काम फारसें जिकिरीचें नसल्यामुळें वाचनाचा हव्यास पुरवायला त्याला भरपूर अवकाश मिळे. लायब्रेरिअन या नात्यानें काम करणारा हा माणूस असें वाचतों तरी काय, तें पहाण्यासाठीं तारिणीनें त्याच्यावर नजर ठेवली, तेव्हां तिला दिसून आलें कीं त्याची आवड विविध प्रकारची होती. तत्त्वज्ञानाच्या पुस्तकापासून अगदीं कालपरवां प्रसिद्ध झालेल्या एकाद्या सामान्य कादंबरीपर्यंत बहुतेक पुस्तकें त्याच्या नजरेखालून जात असत. सायन्सवरील जुनीं

आणि आधुनिक पुस्तकेंही केव्हां केव्हां त्याच्या हातीं दिसून येत. त्याच्या हातीं पुस्तक दिसून येत नसे ते एकच—गणितांच्या प्रमेयांचें. गणितशास्त्र त्याला आवडत नव्हतें म्हणा, कीं आकळत नव्हतें म्हणा, तेवढ्याच विषया-पासून तो दूर राहिला होता. त्याच्या नापास होण्याचें रहस्य देखील याच नावडींत होतें.

काशिनाथ सहसा कुणाशीं बोलत बसत नसे. त्याची वृत्तीच अशी होती, कीं त्याच्याशीं बोलत बसावें असें कुणाला वाटलें नसतें. तो स्वभावानें फार भित्रा होता. परक्याजवळ तो अगदीं अंगचोर होता. केलेल्या प्रश्नाला मोजक्या शब्दांत उत्तर देण्यापलीकडे तो सहसा कुणाशीं बोलत बसत नसे, म्हणूनच तारिणीनें एके दिवशीं त्याच्याशीं बोलायचा उपक्रम केला. थट्टेनें कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांनीं त्याला ‘ पंत ’ म्हणायला सुरवात केली होती. म्हणूनच तारिणी म्हणाली, “ काय पंत, आज कसलं नवं पुस्तक वाचतांहां ? ”

बायकांना तो फार भीत असे. कॉलेजांतल्या मुली सदोदित त्याची टिंगल उडवीत, तशीच टिंगल उडवण्याच्या उद्देशानें या अध्यापिकेनेंही बोलायला सुरवात केली आहे अशी कल्पना करून तो म्हणाला, “ नवं काय कीं जुनं काय, वेळ पुष्कळ असतो, कुठलं तरी एक पुस्तक घेऊन वाचीत बसत असतों झालं ! ”

“ कसलं पुस्तक आहे तें ? ”

“ डॉ. पटवर्धनांचं ‘ छंदोरचना ’ वाचतोंय खरं, पण तें मला चांगलंसं समजत नाहीं. विषय सामान्य असावा असं वाटलं—पण माझ्या आटोक्या-बाहेरचा दिसतो हा विषय ! ”

“ तत्त्वज्ञानापेक्षां ? ”

“ तत्त्वज्ञानांतसुद्धां मला कांहीं कळत नाहीं. पूर्वी लोक पुराणं वाचीत, तसल्याच भाविकपणानं वाचीत असतों झालं ! ”

बोलतांना आपण नित्याची वृत्ति सोडली आहे हें ध्यानीं येऊन काशीनाथ भानावर आला आणि म्हणाला, “ कोणतं पुस्तक पाहिजे आपल्याला ? ”

“ पुस्तक मी मघाच घेतलंय, ” तारिणी म्हणाली, “ पुस्तकासाठीं मी आलें नाहीं. तुम्ही एवढं काय वाचीत बसतां तेंच पाहायचं होतं मला. वाचनाचा तुम्हाला बराच नाद दिसतो ! ”

“ नाद कसला—? रिकामं बसायचं तें वाचतों झालं ! ”

" रिकामपणचं हें वाचन तुम्हाला कितीसं उपयोगी पडतं ? कांहीं फायदा होतो का त्यापासून ? "

" तें कांहीं मला कळत नाहीं. हातीं पुस्तक पडलं कीं तें वाचायचं अशी संवय लागली आहे मला. इथली लायब्ररी बरी आहे, नवीं नवीं पुस्तकं पुष्कळशीं येतात, कुणी फारशीं वाचीत नाहींत तीं, तशींच पडून राहतात म्हणून मी वाचतों. असलीं पुस्तकं वाचून त्यांचा उपयोग करून घेण्याचं सामर्थ्य कुठंय माझ्या अंगीं—? तुम्हाला माहित आहे ना, चार वेळ बसलों परीक्षेला तरी मॅट्रिक सुद्धां झालों नाहीं मी अजून—"

" अजून बसायचा विचार आहे का ? "

तारिणी जिव्हाळयानें प्रश्न करते आहे असें पाहून काशिनाथलाही वाचा फुटली. नित्याची संकोचवृत्ति विसरून तो म्हणाला, " केव्हां केव्हां वाटतं, पुनः बसावं एकदां परीक्षेला. पण त्या गणित विषयाचं आणि माझं कांहीं पटत नाहीं. पुनः पुनः त्याच विषयांत नापास होतों म्हणून आतां सोडून दिलाय तो नाद. पदवीधर व्हावं अशी माझी मोठी महत्त्वाकांक्षा होती, ती पुरी होण्याचं लक्षण कांहीं दिसत नाहीं म्हणून हें असं वाचन करीत असतों. "

" म्हणजे तुमचं वाचन कांहीं अगदींच निरर्थक नाहीं तर. कांहीं तरी उणीव आहे आपल्यांत, तिची भरपाई केलीं पाहिजे, असं वाटूनच ना तुम्ही वाचीत असतां ?—" तो कांहीं उत्तर देत नाहीं असें पाहून तारिणी म्हणाली, " मला रिकामा वेळ असतो म्हणून वाचतों, असं कां सांगितलंत मला ?—"

तारिणीच्या सरळ सरळ प्रश्नामुळें काशिनाथला आतां अवसान आलें होतें. सहानुभूतीनें केव्हां कुणीच त्याच्याकडे पहात नव्हतें म्हणून प्रत्येकाबद्दल तो साशंक असे. तारिणीच्या भाषणांतला सहानुभूतीचा ओलावा वाढत आहे असें पाहून तो म्हणाला, " खरं सांगूं ? सारेच माझी थट्टा करतात. मी थट्टेला पात्र आहें याची मलाही जाणीव आहे. मी विद्वान् नाहीं, बुद्धिवान नाहीं, श्रीमान तर नाहींच नाहीं ! कोणत्या आधारावर मी या सर्वांना तोंड देऊं ? ज्ञानाचा मला हव्यास आहे. सर्वज्ञ होण्याइतकी गगनाला गवसणी घालण्याची वृत्ति जरी माझ्याठायीं नसली तरी सर्व सामान्य बहुश्रुत माणसापेक्षां आपल्यांत कांहीं उणीव असूं नये असं मला वाटत असतं. मी इतके दिवस पहात आलों आहें,

कॉलेजच्या अभ्यासक्रमाच्या मळलेल्या चाकोरींतून गेल्यामुळेंच कांहीं ज्ञान मिळत नाहीं असा माझा समज झाला आहे. अभ्यासक्रमांत निश्चित केलेल्या पुस्तकांतील ज्ञानापलीकडे ज्यांची मजल गेली आहे असे, किती विद्यार्थी–कितीसे पदवीधर दिसताहेत आपल्याला?—जो तो कामापुरतं पाहत असतो. त्या पलीकडे कुणाची नजर जात नाही. आतां इथं हीं इतकीं पुस्तकं येताहेत, कितीजण हीं वाचताहेत? मी वाचतों म्हणून पानं तरी फाडतों, नाहींतर कित्येक पुस्तकं आलीं तशींच पडून राहिलीं असतीं. जे कोणी हीं पुस्तकं मागवतात ते सुद्धां यांतलीं पुस्तकं क्वचितच वाचतात. म्हणूनच येईल तें पुस्तक वाचून टाकायचा मी निश्चय केला आहे. म्हणूनच मी असा सदोदित वाचीत बसलेला दिसतों. "

" पण त्यामुळं तुमच्या ज्ञानांत कांहीं भर पडली आहे असं वाटतं का तुम्हांला ? "

" आज तरी परीक्षेशिवाय ज्ञानाची कसोटी ठरत नाहीं. मला कुठल्याच परीक्षेला बसतां येत नाहीं. कुठलीही परीक्षा दिल्याशिवाय एकादं थीसीस लिहून परदेशांत जशा डिग्र्या मिळतात असं म्हणतात, तसं असतं तरच माझ्या वाचनाचा उपयोग झाला कीं नाहीं याची कसोटी निदान मला तरी कळली असती. "

" लेखनाची आवड आहे का तुम्हांला ? "

काशिनाथ स्तब्ध राहिला. या प्रश्नाचें उत्तर देण्याची त्याची इच्छा नसावी असें दिसून आल्यामुळें तारिणी म्हणाली, " माझ्या आईचीं पुस्तकं वाचलीं आहेत का तुम्ही ? "

काशिनाथचा चेहरा एकदम उजळून उठला. तो म्हणाला. " उभ्या महाराष्ट्रांत मला कोणता लेखक आवडत असेल तर ती तुमची आई. तुम्ही इथं येऊं लागलांत तेव्हांपासून मला वाटे, कीं तुमचा परिचय करून घ्यावा आणि त्याबरोबरच तुमच्या आईचाही परिचय व्हावा. पण तसं करायचा मला धीर झाला नाहीं. परोपरीनें छळून सर्वांनीं मला भित्रा बनवलं आहे. कुणाचीही भीति वाटते मला. कुणी विचारल्याशिवाय कुणाशीं बोलायचा सुद्धां धीर होत नाहीं मला. तुम्ही आज बोलायला सुरवात केली तेव्हां पहिल्यानं मी घाबरलों. तुमच्याबद्दल मला आदर होता. मी पहात असतों, तुम्ही इथल्या विद्यार्थ्यांत मिसळत नाहीं, कीं प्रोफेसरांतही मिसळत नाहीं. म्हणूनच ज्यावेळीं तुम्ही माझ्याशीं बोलायला सुरवात केली त्यावेळीं मला भीति

वाटली. म्हटलं इतक्यां सरळ माणसाला सुद्धां माझी टिंगल करायची बुद्धि झाली कीं काय ! "—

" पण आतां नाहीं ना तसं वाटत ? "

" आतां तरी वाटत नाहीं. तरीपण मी एकंदरींत मोठा भित्रा माणूस आहें हेंच खरं. कुणाचीच खात्री वाटत नाहीं मला—"

विषय बदलण्याच्या उद्देशानें तारिणी म्हणाली, " मग माझ्या आईला भेटायची इच्छा आहे का तुमची ? "

" छेः छेः मुळींच नाहीं ! " तो अगदीं घाबरटपणानें म्हणाला, " तिकडे पुष्कळ मंडळी जमतात म्हणे. मोठमोठ्या विषयांच्या चर्चा चालतात असंही मी ऐकलंय. तिथं मी येऊन काय करूं ? तसल्या मंडळींत तोंडसुद्धां उघडायचा मला धीर होणार नाहीं. "

हंसू येत होतें तरीही तें आवरून तारिणी म्हणाली, " मग एकटंच भेटायचं आहे का माझ्या आईला ? "

" छेः छेः मुळींच नाहीं ! " तितक्याच घाबरटपणानें तो उद्गारला, " येऊन त्यांच्याशीं बोलूं काय ? त्यांच्याबद्दल मला फार आदर आहे—परिचयामुळं झालेला तो आदर नव्हे—मला परिचय आहे तो त्यांच्या लेखनाचा—व्यक्तीचा नव्हे. भेटावं असं वाटतं खरं, पण भेटून तरी काय बोलणार ? त्यांना पहावं—अगदीं जवळून पहावं—कुठंतरी आड राहून पहावं, इतर चार विद्वान् मंडळी त्याच्या बरोबर काय बोलतात तें ऐकावं—पण आपण ऐकतों आहों हें त्यांना मात्रं दिसूं नये, असं वाटतं मला. असा मी हा जरा विचित्र माणूस आहें. उगीच नाहीं हे लोक माझी थट्टा करीत ते ! मी सांगितलं ना, त्यांच्या थट्टेला पात्र होण्याजोगंच माझं वर्तन असतं. त्या माझ्या चालचलणुकीची माझी मलाच ओळख आहे म्हणूनच मी सर्वांपासून दूर रहायचा प्रयत्न करतों—"

तितक्यांत कांहीं विद्यार्थ्यांचा घोळका आंत आला. त्यासरशीं काशिनाथ एका कपाटाकडे जाऊन त्यांतील एक कुठलें तरी पुस्तक काढून तें तारिणीच्या हातीं देत म्हणाला, " हेंच का तें ? "

त्याचे धोरण तारिणीच्या लक्षांत आलें. ती म्हणाली, " हें नव्हें तें पुस्तक. आज राहूं दे. उद्यां मी स्वतःच शोधून काढीन. " त्यापेक्षां जास्त कांहीं न बोलतां तारिणी तिथून निघून गेली.

आपल्या आयुष्यांत आठवण राहण्याजोग्या एका व्यक्तीचा आपल्याला आज परिचय झाला असें तारिणीला वाटलें.

---

## १४ जवानी

गोपीनाथनें एकदां जें तारिणीचें घर वर्ज्य केलें, त्यानंतर त्या घरीं येण्याचा त्यानें केव्हांच प्रयत्न केला नाहीं. शरयूच्या घरीं आतां तो पूर्वीप्रमाणें येऊं लागला होता. शरयू स्वतः नोकरीवर जात असल्यामुळें हें त्याचें येणेंजाणें नुसतें तात्पुरतें असे. मुळींच आलों नाहीं असें होऊं नये एवढ्यापुरतेंच असे. शरयूसुद्धां तारिणीकडे क्वचितच येई. चंपा मात्र वारंवार येऊन शरयूची चौकशी करी. गोपीनाथ आणि शरयू या दोघांमधल्या जुन्या नात्याचे धागे जरी अगदींच तुटले नव्हते तरीही त्यांत जी ढिलाई आली होती त्यामुळें शरयूशीं बोलत बसायला चंपेलाही विषय नाहींसा झाला होता.

पण आतां अकस्मात एक नवा धागा निर्माण झाल्याचें चंपेला दिसून आलें. तारिणी मधून मधून चंपेजवळ काशिनाथच्या गोष्टी सांगूं लागली होती. त्या सांगण्यांत नुसता चौकसपणा असला तरीही चंपेच्या संशयी स्वभावाला अनुसरून थोड्याशा विचक्षण बुद्धीनें ती या भाषणाकडे पाहूं लागली होती. तारिणीचें लक्ष नुसत्या चौकसपणापेक्षां जास्त नाजुक रीतीनें काशिनाथकडे वळेल असें तिला वाटत नव्हतें. तरीही तारिणी ज्या प्रकारें काशिनाथबद्दल कळकळ दाखवीत होती, त्या प्रकारावरून चंपेला वाटे, कीं कदाचित या सामान्य ओढींतून कांहींतरी असामान्य प्रकारही निपजण्याचा संभव उत्पन्न होणें अशक्य नाहीं.

हा काशिनाथ कोण म्हणून चंपा जेव्हां तपास करूं लागली तेव्हां तो परिचित मंडळीच्या चक्रांतच कुठें तरी सांपडेल असें तिला वाटलें नव्हतें. पण चमत्कार असा झाला, कीं तो गोपीनाथच्याच घरीं राहणारा, गोपीनाथचाच एक अनाथ आतेभाऊ असल्याचें तिला कळून आलें. तिला आश्चर्य वाटलें. हा माणूस कुणीतरी दूरचा निपजावा अशी तिची अपेक्षा होती. आहे या चोळक्याच्या पलीकडे जाऊन कुठें तरी लागेबांधे निर्माण व्हावे अशी तिची

इच्छा होती. हा एक नवीन मनुष्य नजरेंत भरल्यामुळें तारिणीचें लक्ष्य त्याच्याकडे वेधलें तर तिचा त्याला अडथळा नव्हता. ठराविक चाकोरींत फिरत राहण्याची तारिणीची दृष्टी त्या मर्यादेपलीकडे कुठें तरी जावी, घर सोडून तिनें नोकरी पत्करली असल्यामुळें नव्या नव्या माणसांशीं तिची ओळख व्हावी; अशी इच्छा असतांना हा नवा धागा पुनः जुन्याच गुंतवळांत अडकून पडलेला दिसून आल्यामुळें चंपेला एक प्रकारें वाईट वाटलें.

काशिनाथ हा गोपीनाथच्याच घरचा माणूस आहे हें कळलें तेव्हां तारिणीलाही बरेंच आश्चर्य वाटलें. ती केव्हांच गोपीनाथच्या घरीं गेली नव्हती त्यामुळें त्याच्या घरच्या माणसांची तिला माहिती नव्हती. वडील माणसांचा नुसता उल्लेख करण्यापलीकडे गोपीनाथ सुद्धां कधीं आपल्या घरच्या माणसांची हकीगत तिच्याकडे बोलत नसे. त्याचमुळें काशिनाथ आणि गोपीनाथ हे नातेवाईक आहेत, एकाच घरचे आहेत, हें तिला हा वेळपर्यंत कळलें नव्हतें. आतां जेव्हां कळलें तेव्हां ती काशिनाथला म्हणाली, " गोपीनाथची आणि माझी ओळख आहे हें माहीत होतं का तुम्हाला ? "

काशिनाथ क्षणभर घुटमळला आणि नंतर म्हणाला, " माहित होतं— अगदीं पाहिल्यापासून माहित होतं. तो तुमच्याकडे अभ्यास करायला जात असे तेव्हांपासून माहित होतं. आतां कशाला तुमच्यापासून चोरून ठेवूं, त्यावेळीं मला त्याचा मत्सर वाटे. घरांत तो कुणाशींही फारसा मोकळेपणानें बोलत नसे. माझ्याशीं तर तो कधींच बोलत नसे—अजूनही बोलत नाहीं. आतां गोष्ट निघालीच आहे तेव्हां सारं कांहीं एकदां सांगून टाकतों. फारा दिवसांचा भार आहे हा माझ्या मनावर. आपलं म्हणायला मला कुणी नाहीं. माझे आईबाप मी चारपांच वर्षांचा असतांनाच वारले. तेव्हांपासून गोपीनाथच्या बापानेंच माझा प्रतिपाळ केला. एक बरं होतं, कीं मला दुसरं कुणी भावंड नव्हतं. पण या एका लहानशा जिवाचा भारसुद्धां गोपीनाथच्या आईला दुःसह वाटला. मामाचं—म्हणजे गोपीनाथच्या बापाचं मन माझ्यासाठीं तळमळत होतं खरं, पण ते तरी सारा दिवस घरांत कुठं रहात होते ? लहानपणापासून घरचीं कामं—गड्यामाणसांनीं करायचीं कामं मामी माझ्याकडून करून घेई. त्यामुळं पाहिल्यापासूनच माझं अभ्यासाकडे दुर्लक्ष होई. मी वारंवार नापास होत असें म्हणून मामी मला घालूनपाडून बोले पण मामांच्या जिव्हाळ्यांत कांहीं अंतर पडलं नव्हतं. मी एक प्रकारें जो

मित्रा झालों आहे तो याच परिस्थितीमुळं. कुणाला कोणत्याही प्रसंगीं उलटून बोलायचं मला धैर्य होत नाहीं तें लहानपणापासून असलेल्या मामीच्या जरबेमुळं. मॅट्रिकमधें मी वारंवार नापास होत गेलों तेव्हां तर मामीनं आकांतच केला. मी सारखा पास होत गेलों असतों तर गोपीनाथच्या पूर्वीच बी. ए. झालों असतों, ही जाणीव असल्यामुळंच मी मनांतल्या मनांत झुरून गेलों होतों. म्हणूनच मी ही नोकरी पत्करली. प्रिन्सिपॉलसाहेबांचं लिहायचं खाजगी काम पहिल्यानं मी त्यांच्या घरीं करीत असें. त्यांची मर्जी बसली म्हणूनच मला ही जागा मिळाली. नाहींतर हल्लींच्या काळांत बिनपरिक्षेच्या माणसाला कुठं नोकरी मिळणार होती ? प्रिन्सिपॉल साहेबांच्या सहवासामुळंच मला वाङ्मयाची आवड लागली. तुमच्याकडे कशाला चोरून ठेवूं,—मी दोनतीन पुस्तकंही लिहिलीं आहेत. पण तीं माझ्या नांवानं नाहींत. खोटंच नांव धारण करून मी माझ्या लेखनाची कसोटी वाङमयाच्या बाजारांत कशी लागते याचा अंदाज घेतों आहें—"

" कोणतीं पुस्तकं तीं ? " तारिणीनें विचारलें.

" तशीं कांहीं फारशीं महत्त्वाचीं नाहींत. एक लघुकथांचा संग्रह आहे, एक लघुनिबंधाचा संग्रह आहे आणि एक टीकाविषयक लेखाचा संग्रह आहे. तुमच्या आईच्या कांहीं पुस्तकांवर मी समीक्षणात्मक लेख लिहिले आहेत, ते आहेत त्या पुस्तकांत. इतक्यांतच माझी एक कादंबरी प्रसिद्ध व्हायची आहे. पण ती माझी आहे हें कांहीं तुम्हांला कळणार नाहीं—"

" कां कळणार नाहीं ? तुमचं रहस्य मी फोडणार नाहीं. मी सुद्धां एक कादंबरी लिहिली होती. आणखी एकादी लिहावी असं मला वाटत होतं पण हें थीसीस पुरं केल्याशिवाय दुसरं कांहींच लिहायचं नाहीं असं मी ठरवून टाकलंय, म्हणूनच अजून मी कांहीं नवीन लिहिलं नाहीं. "

" मी वाचलीय ती कादंबरी—अन् त्या नाटकाचा इतिहासही मला माहीत आहे. प्रयोगसुद्धां पाहिला आहे मी तो. मला वाटतं, कादंबरी लिहिण्यापेक्षां तुम्हीं नाटक लिहायचं हातीं घ्याल तर त्यांत तुम्हांला जास्त यश येईल—रागावूं नका—एक सामान्य वाचक या नात्यानं ही सूचना आहे माझी—"

" असं कां म्हणतां ? तुम्ही परीक्षणं लिहिलीं आहेत, विचक्षण बुद्धीनं कोणत्याही पुस्तकाचं अवलोकन केल्याशिवाय—पूर्वग्रहदूषित न होतां अवलोकन केल्याशिवाय यथायोग्य परीक्षण करतां यायचं नाहीं कुणा लेखकाला.

संकोच सोडून तुम्ही आपल्या या पुस्तकाचं मांव मला सांगाल तर मला मोठा आनंद होईल !—"

काशिनाथ कांहीं वेळ स्तब्ध राहिला. त्याला मनाचा निश्चय करतां येत नव्हता. तिनें आत्यंतिक उत्कंठा दाखवली नसली तरीही तिच्या प्रश्नांत जिव्हाळा होता हें त्याला स्पष्ट दिसत होतें. म्हणूनच तो म्हणाला, " बुरखा घेऊन मी इतके दिवस राहिलों आहें, बुरखा घेतल्यामुळेंच या पुस्तकावरची साधकबाधक टीका मला निःसंकोचपणें ऐकायला मिळते आहे, म्हणूनच हा बुरखा टाकून देऊं नये असा मी निश्चय केला आहे. माझ्या प्रकाशकांनींही अजूनपर्यंत आपलं वचन पाळलं आहे. तुम्ही विचारतां आहां—कळकळीनं विचारतां आहां—अशा वेळीं, तुम्हांला न सांगणं बरं नव्हे हें मला पटतं — पण मी सांगितलं ना तुम्हांला, माझ्या गृहस्थितीमुळं जो भित्रेपणा माझ्या अंगीं आला आहे तो या क्षेत्रांत देखील मला नडतो आहे. हें एवढं माझं नवं पुस्तक प्रसिद्ध होऊं द्या, टीकाकार त्या पुस्तकाबद्दल काय म्हणतात तें मला कळून येऊं द्या—तुमच्या आईकडे देखील तें पुस्तक जाईल—त्यांना काय वाटतं तेंही मला कळूं द्या—"

" तें कसं कळणार तुम्हांला ? आई कांहीं कुठल्या पुस्तकाचं परीक्षण लिहित नाहीं. तो निश्चयच आहे तिचा. तिची चालते काय ती घरची चर्चा. त्या चर्चेत आई खूप बोलते—खूप छाननी करते प्रत्येक पुस्तकाची—पण लिहित नाहीं केव्हांच. मग तुम्हांला कसं कळणार तिचं मत ? "

" माझे प्रकाशक जातात तिकडे ते विचारतील त्यांना—" असें म्हणतांना तो कांहींवेळ घुटमळल्यासारखा दिसला. या नव्या पुस्तकाचें नांव तारिणीला सांगून टाकावें असें एक क्षणभर त्याच्या मनांत आलें होतें. पण बळेंबळें मन आंवरून तो म्हणाला, " नकोच—नकोच तें ! कळेल मला कुठून ना कुठून तरी. निदान इतर टीकाकारांचीं मतं तरी कळतील !—"

" केव्हां प्रसिद्ध होणार आहे हें तुमचं पुस्तक ? "

" तेही विचारूं नका मला—क्षमा करा, मी तुमच्याशीं प्रतारणा करतों असं तुम्हांला वाटेल ! तसं वाटायला नको आहे तुम्हांला. मी एक टाकलेलं पोर आहें. कुणाशींच माझा कसला लागाबांधा नाहीं. कुणीच माझी कधीं काळजी घेतली नाहीं. कुणी मला सहानुभूतीसुद्धां दाखवली नाहीं. प्रत्यक्ष घरचीं माणसं—एक मामा सोडून कुणीच माझी चौकशीसुद्धां करीत

नाहींत त्यामुळं माझा स्वभाव मोठा चोरटा बनला आहे. आज तुमच्याजवळ मी जेवढं मन मोकळं करून बोललों एवढं उभ्या आयुष्यांत कुणाशींसुद्धां बोललों नव्हतों—प्रिन्सिपॉल साहेबांशींसुद्धां बोललों नव्हतों.—त्यांचा माझ्यावर लोभ आहे. मी त्यांचं काम चोख बजावतों म्हणून ते माझ्यावर खूष आहेत, म्हणूनच ते मला सर्व प्रकारच्या सवलती देतात—पण त्यांनींसुद्धां कधीं माझी चौकशी केली नाहीं. उभ्या आयुष्यांत कुणी माझी चौकशी केली असेल तर ती तुम्हींच—अन् उभ्या आयुष्यांत मी कधीं कुणाला माझी हकिगत सांगितली असेल तर ती तुम्हालाच. म्हणूनच म्हणतों, झालं एवढं पुरे. यापेक्षां मर्यादेचा जास्त अतिक्रम नको. परिचयाच्या मर्यादा ओलांडायची मला मोठी भीति वाटते—एक खोडच जडून गेली आहे ती माझ्या स्वभावाला. माफ करा हं !—" असें म्हणून तो एकाएकीं निघून गेला.

तारिणीला मोठें कौतुक वाटलें. मनुष्यस्वभावाचा हा एक अजब नमुना आपणाला पहायला मिळतो आहे असें वाटून तिनें ती सारी हकिगत चंपेला सांगितली.

शारदाबाईकडे येणारीं बहुतेक सारीं पुस्तकें चंपेच्या नजरेखालून गेलेलीं असत. तारिणी तिकडे फारसें लक्ष देत नसे. म्हणूनच काशिनाथचें पुस्तक कोणतें असावें याचा चंपा विचार करूं लागली. तिनें सारीं पुस्तकें एकदां चाळून पाहिलीं आणि त्यांत तिला एक पुस्तक आढळलं. पूर्वी तें पुस्तक तिनें वाचलें होतें त्यावेळींच तिला तें आवडलें होतें. शारदाबाईच्या तीन पुस्तकां-वरचे टीकालेख त्या पुस्तकांत होते. त्याशिवाय जे इतर लेख होते तेही तिला तितकेच आवडले होते. टीकाविषय झालेलीं या पुस्तकांतील मुळचीं सारीं पुस्तकें तिनें वाचलीं होतीं. म्हणूनच त्या टीकालेखांत दिसून येणारी लेखकाची सखोल दृष्टि, कथावस्तूविषयीं असणारी सहानुभूति, लेखनशैलीबद्दल केलेली अगदीं नवीन पद्धतीची छाननी, वास्तवता आणि कल्पकता या दोहोंचा समन्वय करून प्रत्येक पुस्तकाचा त्या लेखकानें घेतलेला आढावा पाहून हा टीकाकार असामान्य असावा असें तिला यापूर्वीच वाटलें होतें.

हा असामान्य टीकाकार म्हणजेच काशिनाथ असें दिसून येतांच तिला एक प्रकारें आनंद झाला. त्याचा परिचय होण्याची तिला उत्कंठा वाटूं लागली. तारिणीला सांगून तिनें आग्रह करून त्याला बोलावणें पाठवलें पण तो यायला तयार झाला नाहीं. तें पुस्तक त्याचेंच होतें कीं नव्हतें हेंही निश्चित-

पणें ठरलें नव्हतें. ही शंका घालवण्यासाठीं शरयूच्या घरीं गेल्यावेळीं एकदां तपास करायचा निश्चय करून तिनें तो अंमलांतही आणला. गोपीनाथच्या घरीं जाऊन काशिनाथची चौकशी चंपा करते आहे असें पाहून गोपीनाथची आई उसळून उठली. यत्किंचितही भीडमुर्वत न धरतां ती चंपेला म्हणाली, "कशाला पाहिजे काशिनाथ तुम्हांला ? त्याला पगार काय मिळतो तें आहे ना माहित ? कारकून आहे तो कॉलेजांत. प्रोफेसर नाहीं कांहीं.—त्याची चौकशी कशाला तुम्हांला ?"

"सहज चौकशी केली मी." चंपा म्हणाली, "तो कॉलेजचा लायब्रेरीअन आहे, तिथलें एक पुस्तक मला पाहिजे आहे—"

"मग सांगा ना तुमच्या तारिणीला !" गोपीनाथची आई म्हणाली, "त्याच कॉलेजांत असते ती. आणि कॉलेजांतलं पुस्तक तरी कशाला हवंय तुम्हांला ? विकत घ्या की !"—

"विकत मिळालं असतं तर घेतलं असतं." चंपा म्हणाली, "कांहीं कांहीं पुस्तकं बाजारांत मिळत नाहींत, विलायतेंतून आणावीं लागतात तीं—"

"इंग्रजी का ?" गोपीनाथच्या आईनें विचारलें, "इंग्रजी येतं वाटतं तुम्हांला ? असं पहा, त्याच्याकडून तुम्हांला कांहीं पुस्तक मिळायचं नाहीं. मोठा घुम्या आहे हा आमचा काशिनाथ. सरळ तर बोलायचा नाहींच पण कधीं कुणाच्या उपयोगी पडायचा नाहीं. आपला आहे पहिल्यापासून इथं म्हणून आहे ! यांना आवडतो ना तो ! नाहींतर या घरांत मी त्याला घडीभर सुद्धां राहूं दिलं नसतं. तुम्हीं त्याच्या भानगडींत पडूं नका. तुमच्या तारिणीलाच सांगा, ती देईल आणून तुम्हांला !"

चंपा जायला निघाली. दाराशीं आली त्यावेळीं तिच्या कांनीं शब्द आले, "किती झालं तरी या मेल्या कलावंतिणी—यांना कशाला हवींयत कॉलेजांतलीं पुस्तकं ? खोटंच कांहींतरी सांगत असेल मेली !"

असलीं बोलणीं ऐकून घ्यायची चंपेला संवयच होती. तिला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. पण तिला वाईट वाटलें तें एवढ्यासाठींच, कीं या बाईनें काशिनाथला नुसतें सांगितलें असतें तर काय बिघडलें असतें ? कदाचित काशिनाथ त्यावेळीं घरीं असणें अशक्य नव्हतें. झालेलें बोलणें जर त्याच्या कानीं गेलें असेल तर कदाचित् तो आपल्याला भेटायला शरयूकडे येईल असें तिला वाटलें.

आणि झालेंही तसेंच. ती शरयूच्या घरांत पाऊल टाकते न टाकते तोंच एक अपरिचित तरुण आंत आला आणि तिला नमस्कार करून म्हणाला, " मीच काशिनाथ. काय होतं काम आपलं ? "

पहिल्याच भेटीला एकदम मोकळेपणानें बोलायला चंपेला संकोच वाटला. ती स्वतःच्या घरीं असती तर तिला तसें वाटलें नसतें. दुसऱ्याच्या घरीं तिसऱ्याच माणसाला बोलावून आणून त्याच्याशीं बोलत कसें बसावें असें मनांत येऊन ती म्हणाली, " कांहीं महत्त्वाच्या बाबतींत मला बोलायचंय तुमच्याशीं. इथं परक्या घरीं बोलत बसणं बरं दिसायचं नाहीं. आमच्या घरीं येतां का माझ्याबरोबर ! "

क्षणभर विचार करून काशिनाथ म्हणाला, " मला क्षमा करा— तारिणीबाईनीं आपला निरोप मला सांगितला होता पण येण्याचा धीर झाला नाहीं मला. आतां आपण बरोबर असलां तर तेवढा संकोच वाटायचा नाहीं—"

" अन् तारिणीबरोबर यायला तुम्हांला संकोच वाटला होय ? " चंपा हंसत म्हणाली.

" बरोबर कुठं ? " काशिनाथ चांचरत चांचरत उद्गारला, " असा कधींच मी कुणा बाईबरोबर—तरुण मुलीबरोबर कधींच कुठं गेलों नाहीं—कधीं कुठं जाणं व्हायचं नाहीं माझ्याच्यानं. "

" माझ्याबरोबर याल आमच्या घरीं ? आतांच ? " चंपेनें विचारलें, " तसा संकोच धरायला नको अगदीं. मी तुमची आई शोभेन ! "

त्याच्या उदासवाण्या चेहऱ्यावर हंसण्याची रेषा उमटून गेली. कधीं न निघणारा उद्गार त्याच्या न कळत त्याच्या तोंडून निघून गेला. तो म्हणाला, " कुणी तरी आई हवीच आहे मला. फार उणीव जाणवतेय मला ती !—" शब्द तोंडांतून निघून गेल्यावर त्याचें त्यालाच जाणवलें.

तो ओशाळल्यासारखा झाला असें पाहून चंपा म्हणाली, " मलाही एक मुलगा हवाय. चला माझ्याबरोबर—नाहीं—चल रे काशिनाथ माझ्याबरोबर ! "

असे उद्‌गार आपल्या तोंडून कां निघाले याचें चंपेलाही तितकेंच आश्चर्य वाटलें.

त्याला बरोबर घेऊन ती आपल्या घरीं आली त्यावेळीं तिथें तारिणी नव्हती, शारदाबाईही कुठल्यातरी सभेला गेली होती, तें पाहून चंपेला एकप्रकारें समाधान वाटलें.

निवडून काढलेलें पुस्तक हातीं घेऊन काशिनाथला दाखवून चंपा म्हणाली, " हें पुस्तक मी वाचलं तेव्हांच मला आवडलं होतं. हल्लींचे टीकाकार बहुधा वरवर पाहणारेच फार. लेखकाच्या अंतरंगांत शिरून ठाव घेण्याचं सामर्थ्य असणारा टीकाकार आज तरी विरळा आहे, म्हणून मला हें पुस्तक आवडलं—" तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " तुमचंच ना हें पुस्तक ? "

" असं कां वाटलं तुम्हाला ? " काशिनाथनें विचारलें.

" तुम्ही वर्णन सांगितलं होतं तारिणीकडे, त्या अनुरोधानं मी आठवण करूं लागलें. लेखकाचं नांव टोपण नांवासारखं असतं तर मी निश्चितपणें सांगितलं असतं—पण हें अगदीं वेगळंच पण पुरं नांव घेतलंय तुम्ही— 'शंकर पांडुरंग कुळकर्णी '—म्हणूनच मला वाटलं, कीं हें तुमचं पुस्तक ! होय ना ? "

काशिनाथ कांहीं वेळ उगीच राहिला. चंपेच्या भाषणाचा झालेला परिणाम त्याच्या चेहऱ्यावर मुळींच दिसून येत नव्हता. चंपेला वाटलें, या माणसाचा आपल्या मनावर चांगलाच ताबा आहे. ती म्हणाली, " तारिणीला तुम्ही सांगितलंत तें जर बरोबर असेल, तर हें पुस्तक तुमचंच आहे यांत शंका नाहीं. कबूल करायचं नसलं तर नका करूं कबूल—"

" कशाला चोरून टेवूं तुमच्याकडे ? " काशिनाथ अस्वस्थपणें म्हणाला, " कुठल्याच वडील माणसाच्या तोंडचे एवढ्या आपुलकीचे शब्द मला ऐकायला मिळाले नव्हते. जगाच्या व्यवहाराच्या वरवंट्याखालीं चुरडून गेलेला मी एक दुबळा जीव आहें. आपलेपणा कबूल करण्याइतकी सुद्धां माझ्या अंगांत ताकद राहिलेली नाहीं. केव्हां केव्हां माझी मलाच भीति वाटते. मला कुणाचाच पाठिंबा नाहीं—लेखनाच्या क्षेत्रांत आवश्यक असलेली पदवीही—"

" असं कां म्हणतां ? शारदाबाईला कुठंय पदवी ? त्यांच्या लेखनाची कदर नाहीं का केली महाराष्ट्रानं ? तुमच्यापेक्षां सुद्धां ती अशिक्षित होती. उतारवयांत तिनं अभ्यास करायला सुरुवात केली. तुम्ही तर अजून अगदींच तरुण आहांत, भरपूर वाचताहांत, कॉलेजच्या वातावरणांत वावरताहांत, लेखनाला अवश्य असलेलीं सारीं साधनं तुमच्या हाताशीं आहेत, मग कां तुम्हांला एवढी भीति वाटावी ? "

" भीति वाटणं हेंच माझ्या स्वभावाला खिळून गेलंय. कसा हा दोष जाईल तो जावो, पण आज तरी मी आहें हा असा आहें—" एक मोठा सुस्कारा सोडून तो म्हणाला, " हो ! हें पुस्तक माझंच. मोठा अभिमान आहे मला या लेखांबद्दल. बरं असो कीं वाईट असो, इतरांपेक्षां मी कांहीं तरी वेगळं लिहिलंय असा मला आत्मविश्वास आहे. हीं परीक्षणं लिहायच्या पूर्वी मी या पुस्तकावरचीं इतरांचीं परीक्षणं वाचलीं नव्हतीं. नंतर वाचून पाहिली त्यावेळीं मला वाटलं, या पुस्तकांकडे माझ्या नजरेनं कुणीच पाहिलेलं नाहीं. चुकीची असो कीं बरोबर असो, या पुस्तकांकडे पाहण्याची माझी नजर इतरांपेक्षां भिन्न आहे—दृष्टिकोनच अगदीं वेगळा आहे—अशी माझी मलाच खात्री पटली. या पुस्तकाचं जें परीक्षण इतरांनीं केलंय त्यांत त्यांनीं मला सर्वस्वी खोडून काढलंय. मला आनंद झालाय तो याच गोष्टीचा. मी इतरांपेक्षां वेगळा आहें ! इतरांसारखा नव्हे—" तो क्षणभर स्तब्ध राहिला. पुढें कांहीं तरी बोलावें म्हणून तो सुरवात करीत होता पण त्याला काय वाटलें कोण जाणे, तो तसाच स्तब्ध बसून राहिला.

चंपा म्हणाली, " अगदीं अक्षरशः खरं आहे तुमचं म्हणणं. मला वाटलं तें हेंच. कुणाच्याही लेखनाकडे पाहण्याची तुमची दृष्टि अगदीं स्वतंत्र आहे याचाच मला आनंद वाटला—"

" तारिणीला मात्र सांगू नका हें ! " काशिनाथ एकदम मधेंच म्हणाला. चट्‌कन् आठवण होऊन त्यानें दुरुस्ती केली, " तारिणीबाईंना मात्र हें सांगू नका ! " ओशाळल्यासारखें करून केंविलवाण्या मुद्रेनें तो चंपेच्या तोंडाकडे पाहत राहिला.

मोठ्या प्रेमळपणें हंसून चंपा म्हणाली, " बोलतांना ही जशी खोडाखोड करतां, तशी लिहितांनाही करतां का ?—"

काशिनाथ ओशाळून म्हणाला, " कशाला मला लाजवतां ? आधीं मी बोलतोंच कमी, त्यामुळं शब्द चुकायची भीति थोडी—पण अशी कांहीं अक्षम्य चूक झाली, कीं दुरुस्ती केल्यावांचून राहवत नाहीं—" क्षणभर थांबून तो पुनः म्हणाला, " पण तुम्ही कां आपली भाषा बदलली ? ' अरे'नं सुरवात करून ' अहो ' कां म्हणतां मला आतां ? "

" खरंच !" चंपा उगीच थोडेसें हंसून म्हणाली, " मी अगदींच विसरून गेलें ! "

" कृपा करून एवढं विसरूं नका. " काशिनाथ सद्‌गदित होऊन म्हणाला, " एवढीं वर्षं वाट पाहून मला मिळालेली आई अशीच राहूं द्या जन्मभर ! " बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांतून टचकन् दोन आसवें खालीं पडलीं. तें पाहून चंपाही गहिंवरली.

" आतां नाहीं बरं ही चूक व्हायची. " चंपा म्हणाली, " मी सांगितलं ना, मलासुद्धां एक मुलगा पाहिजे होता. गोपीनाथ इथं येत होता—तो मधुकर माहीत आहे ना तुम्हाला ?—तोही येत असतो इथं पण इतक्या दिवसांच्या परिचयानंसुद्धां मला दोघांबद्दलही फारसा आपलेपणा वाटला नाहीं. कां कोण जाणे—" बोलतां बोलतां ती एकदम थांबली. बाहेर कुणाचीं तरी पावलें वाजल्याचें ऐकू आलें. दोघांचेही डोळे दरवाजाकडे वळले.

आंत येत असतांना काशिनाथ समोर दिसतांच दचकून तारिणी दारांतच उभी राहिली.

" तुम्ही इथं ? " तारिणी उद्गारली.

" हो ! " उठून उभा रहात काशिनाथ म्हणाला, " यांनीं आणलं मला इथं. येतों आतां ! " असें म्हणून तो एकदम निघून बाहेर गेला. तो जात असतांना तारिणी सारखी त्याच्याकडे पहात राहिली होती. ती संधि साधून हातांतलें पुस्तक चंपेनें बैठकीखालीं लपविलें.

काशिनाथ निघून गेला असें पाहून तारिणी चंपेला म्हणाली, " असा कां गेला तो ? "

" मोठा विलक्षण माणूस दिसतो ! " चंपा हंसून म्हणाली, " मी दत्तक घेतलाय त्याला !—"

" इतक्या लवकर ? " गंभीर होऊन तारिणी उद्गारली.

" असं पहा तारिणी, " चंपा तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली, " माणसाच्या आयुष्यांत कुठले लागेबांधे अचानकपणें कसे जुळून येतात तें कांहीं कुणाला सांगतां यायचं नाहीं. झालं हें असं झालं ! आतां राहूं दे, पुनः सांगेन सारी हकिगत केव्हांतरी ! " असें म्हणून चंपा निघून गेली.

तारिणी नुसती पहात राहिली.

---

## १५ झगडा

त्या दिवशीं शारदाबाईच्या बैठकीला मोठा रंग भरला होता. एक नवें पुस्तक आलें होतें त्याच्यावर सर्वांची चर्चा चालली होती. मधुकरखेरीज बाकी सर्वांना—शारदाबाईला सुद्धां—तें पुस्तक फार आवडलें होतें.

मधुकर म्हणाला, " होला हो देणं कांहीं मला आवडत नाहीं. कुणाला वाईट वाटलं तरी चालेल पण मला जें वाटतं तें स्पष्ट बोलून दाखवल्या-खेरीज माझ्यानं राहवत नाहीं. आजवर प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांपेक्षां ही कादंबरी निराळी आहे हें मला कबूल आहे—पण इतरांपेक्षां ती निराळी आहे एवढ्याचसाठीं मी ती डोक्यावर घेऊन नाचणार नाहीं. नावीन्य आणि विक्षिप्तपणा यांच्यांत फार मोठा भेद आहे. आपणा सर्वांना यांत नावीन्य दिसतं, मला विक्षिप्तपणा दिसतो. सर्वसाधारण वाचकाला ही कादंबरी आव-डेल असं मला तरी वाटत नाहीं. "

" खरं आहे तुमचं म्हणणं. " शारदाबाई म्हणाली. " सामान्य वाचकाला कदाचित ही आवडणार नाहीं. कुणी सांगावं, कदाचित सामान्य वाचकालाच ही आवडेल. माझा अनुभव इतरांपेक्षां निराळा आहे. अगदीं पहिले लिहिलेले माझे लेख वाचले आहेत ना तुम्ही, तशीच कांहींशी आहे ही कादंबरी. प्रथमपुरुषीं लिहिलेल्या कादंबऱ्या फार थोड्या आहेत. ही तशी आहे. माझे पहिले लेख नुसते आत्मोद्गारात्मक होते, ती कांहीं कादंबरी नव्हती, पण ही कादंबरी वाचतांना वाटतं, कीं अंतःकरणाच्या तळाला सांचून लपून राहिलेल्या भावनांना या कथेच्या द्वारें या कुळकर्ण्यानं तोंड फोडलं आहे. तुम्ही ओळ-खतां का या कुळकर्ण्याला ? "

" नाहीं ! " मधुकर म्हणाला, " तसा फारसा प्रसिद्ध माणूस दिसत नाहीं हा. बेट्यानं प्रस्तावना लिहिलीय पुस्तकाला पण पत्ता सुद्धां दिला नाहीं आपला. एकदां चौकशी केली पाहिजे या प्रकाशकाकडे. "

" मला एकदां भेटला पाहिजे हा माणूस " शारदाबाई म्हणाली, " लेखकाचं व्यक्तित्व सदोदित त्याच्या लेखनांत दिसतंच असं कांहीं नाहीं. भेटला तर कदा-चित तें तसं दिसायचंही नाहीं. पण मला एकदां भेटायला हवा हा माणूस !—"

मत्सराची एक लहानशी शिळक मधुकरच्या हृदयाला क्षणभरच जाणवून गेली. चट्कन् भानावर येऊन तो म्हणाला, "उद्यांच मी जाऊन भेटतों त्या प्रकाशकाला. शक्य झालं तर उद्यांच घेऊन येतों मी त्याला !—"

ही चर्चा चालू असतांना श्रोत्याच्या नात्यानें चंपा तिथें हजर होती. तें पुस्तक कुणाचें होतें याचा आतां तिला अंदाज आला होता. नांवाबद्दल तर शंकाच नव्हती म्हणूनच ती कांहीं बोलली नाहीं. तिनें तें पुस्तक वाचलें नव्हतें ती म्हणाली, " असं काय एवढं विलक्षण आहे त्या पुस्तकांत ?"

" म्हणजे ? " मधुकर म्हणाला, " अजून तुम्ही वाचलं नाहीं हें पुस्तक ? सारी मुंबई खळबळून उठली आहे हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यापासून. मुंबई म्हणजे साहित्यिक मुंबई !—कुणी स्तुति करताहेत तर कुणी निंदा करताहेत—स्तुति करताहेत तीही बेफाम, निंदा करताहेत तीही तितकीच बेफाम ! एवढं खरं, कीं हें पुस्तक सर्वांच्या नजरेंत भरलं आहे. "

" मग वाचलंच पाहिजे तें. " चंपा म्हणाली, " अलिकडे हीं भाराभर पुस्तकं निघताहेत पण मुद्दाम घेऊन वाचावं असं वाटण्याजोगं एकही पुस्तक अजून निघालेलं नाहीं—"

" मग वाचाच हें एकदां." मधुकर खंवचटपणें म्हणाला, " इथल्या सर्वांना आवडलं पण मला आवडलं नाहीं, अशा या पुस्तकाबद्दल तुम्हाला काय वाटतं तें एकदां पाहूं दे मला ! " असें म्हणून तो तितक्याच खंवचटपणें हंसला.

" मोठा विलक्षण स्वभाव आहे तुमचा मधुकर ! " शारदाबाई म्हणाली, " खरोखरच हें पुस्तक फार सुंदर आहे. मलासुद्धां मत्सर वाटला या लेखकाचा. मला असं कांहीं लिहितां आलं असतं तर मोठी धन्यता वाटली असती मला."

" इतकं का हें आहे तें पुस्तक ? " चंपेनें शारदाबाईला विचारलें.

" तूं पहाच एकदां वाचून. " शारदाबाई म्हणाली, " तुला खात्रीनं आवडेल तें. कोण माणूस आहे हा ? एकदां भेटला पाहिजे मला. माझ्यासारखीच असली पाहिजे याची मनोभूमि. ते माझे पहिले लेख तुला आवडले म्हणूनच ना तूं ते प्रसिद्ध केलेस ? म्हणूनच ना आज मी अशी ही लेखिका झालें ? मी सांगतें, तुलासुद्धां वेड लावील हें पुस्तक—इतकं तें सुंदर आहे ! "

तुच्छतेनें हंसून मधुकर म्हणाला, " फारच अवास्तव महत्त्व देतां आहां तुम्ही या पुस्तकाला. तो भेटला तर त्याच्याजवळ तरी असं बोलूं नका. भडकून जाईल बिचाऱ्याचं माथं अन् नाश करून घेईल स्वतःचा. "

" राहूं दे तुमची टीका— ' चंपा म्हणाली, " मी आधीं हें वाचून पाहतें. तुमची कुणाचींच मतं नकोयत मला. " असें म्हणून तें पुस्तक घेऊन ती निघून गेली.

त्या दिवसाच्या बैठकींत तीच चर्चा सुरू होती पण ती ऐकायला नित्या-प्रमाणें चंपा तिथें शेवटपर्यंत राहिली नाहीं याचें शारदाबाईला आश्चर्य वाटलें.

त्या दिवशीं जेवायच्या वेळींसुद्धां शारदाबाई त्याच पुस्तकाबद्दल बोलत होती. तोंड फाटेपर्यंत सारखी स्तुति करीत होती. तें तिचें भाषण ऐकून तारिणीला संशय आला. काशिनाथचेंच तर हें पुस्तक नव्हे ?

तिनें चंपेकडे तें पुस्तक मागितलें पण तिला आपली जिज्ञासा कांहीं काल आवरून धरावी लागली. पुस्तक वाचून झाल्याशिवाय आधीं तें देणार नाहीं असें चंपेनें सांगितलें तेव्हां तारिणी तिला म्हणाली, " त्याचंच आहे तें पुस्तक. शंकाच नाहीं. आईला थक्क करण्याइतका खरोखरच हा असामान्य आहे का ? "

" उगीच अंदाज कशाला ? " चंपा म्हणाली, " आधीं मी वाचतें आणि मग तूं वाचून पहा. वाचून पहायच्या पूर्वी भलत्या अटकळी बांधूं नको. मला नाहीं वाटत कीं तें काशिनाथनं लिहिलें असेल म्हणून. तो लेखक असेल, चांगलाच लेखक असेल पण तुझ्या आईला दिपवून टाकण्याइतकं सामर्थ्य काशिनाथसारख्या भित्रट माणसाच्या अंगीं असेल असं नाहीं वाटत मला. "

" व्यक्तीच्या स्वभावधर्मावरून त्याच्या लेखनाची कुवत अजमावणं बरोबर व्हायचं नाहीं. दिसणं आणि असणं याच्यांत केवढं तरी मोठं अंतर असतं. एकदां लवकर वाच तें पुस्तक म्हणजे मीही वाचून घेईन. मला अगदीं घाई झालीय वाचायची. " तारिणी म्हणाली.

चर्चा तेवढीच राहिली. चंपेनें तें पुस्तक वाचलें. तारिणीनेंही वाचलें. दोघीही आपापल्या परीनें दिपून गेल्या होत्या. मधुकरचें मत तसें कां व्हावें याचा उलगडा चंपेला होईना. बुद्धिपुरस्सर तो विरोधी मत प्रदर्शित करतो आहे असाच तिचा समज झाला. मधुकरच्या स्वभावाची तिला यथार्थ कल्पना होती. शारदाबाईची मर्जी संपादन करण्यांत यशस्वी झाल्यापासून तो चंपेवर-सुद्धां अलीकडे सत्ता गाजवूं लागला होता. चंपेला त्याबद्दल कांहीं वाटत नसे खरें, पण आजवर हातीं असलेल्या अधिकारांत उत्पन्न झालेला विक्षेप अल्प-स्वल्प प्रमाणांत तरी तिला जाणवल्यावांचून रहात नव्हता. हा नवा लेखक

आला, त्याची आणि शारदाबाईची ओळख झाली, शारदाबाईची त्याच्यावर मर्जी बसली तर आपण उत्पन्न केलेलें वातावरण भंगून जाईल, या भीतीनें तो त्या पुस्तकाला मुद्दाम विरोध करीत होता असें चंपेला वाटलें.

तारिणीनें मात्र त्या दिवशीं काशिनाथला एकदम चकित केलें. ती म्हणाली, "मी तुमची कादंबरी वाचली. आई तर त्या पुस्तकावर बेहाय खूष झाली आहे—"

"माझी कादंबरी !" काशिनाथ आश्चर्यचकित झाल्याचा आव आणून म्हणाला, "माझी कादंबरी अजून प्रसिद्ध व्हायची आहे."

"खोटं कशाला बोलतां ?" तारिणीनें सरळ सरळ विचारलें, "ती कादंबरी तुमचीच आहे. तुम्ही आपलं चरित्र मला सांगितलंत. त्या चरित्राला अनुसरून ज्या वेदना तुमच्या हृदयाला जाणवत असाव्या अशी माझी कल्पना होती, त्यांचं सहीसही चित्र त्या कादंबरींत आहे. एक माझ्या आईखेरीज तशा प्रकारच्या भावना कुणाला जाणवल्या नसतील. तुमच्या न् तिच्या चरित्रांत एकप्रकारचं साम्य आहे. माणूस ज्यावेळीं आपलं पहिलं लिखाण करतो, त्यावेळीं स्वतःच्या दृष्टीनं पाहिलेल्या किंवा अनुभवलेल्या गोष्टी त्या लिखाणांत चितारतो. इतकंच नव्हे, तर त्या प्रसंगामुळं उत्पन्न होणाऱ्या अंतःकरणांतील वेदनाही नमूद करायला तो चुकत नाहीं. पुष्कळसे लेखक बनावट लिखाण करायचा प्रयत्न करतात, त्या लिखाणावर वाचकाला क्षणभर झुलवतात, पण वाचकांच्या अंतःकरणाची पकड घ्यायला ज्या प्रकारचं लिखाण झालं पाहिजे त्या प्रकारचं लिखाण अंतःकरणाच्या जिव्हाळयावांचून केव्हांच करतां यायचं नाहीं. हें तुमचं पुस्तक तसं आहे—"

"कां उगीच हा आरोप करतां माझ्यावर ?" काशिनाथ म्हणाला, "मी तें पुस्तक वाचलंय. मला आवडलंही आहे तें. तसलं पुस्तक लिहायची ताकद माझ्या अंगीं नाहीं—"

"मिस्टर काशिनाथ," तारिणी गंभीर होऊन म्हणाली, "मी कधींच कुणाशीं सलगी केली नाहीं. कधीं जिव्हाळाच वाटला नाहीं मला कुणाबद्दल. तुमच्याशीं मी परिचय केला तो माझ्या अंतःकरणाला तुमची परिस्थिती जाणवली म्हणून. त्या परिचयापोटीं लोभ उत्पन्न झाला, लोभाचं स्नेहांत रूपांतर झालं आणि त्या स्नेहांतून आतां आपुलकी निर्माण होऊं पहात असतांना माझ्याशीं अशी प्रतारणा करून कां उगीच मला दुःख देतां !"

क्षणभर दोघेंही स्तब्ध राहिलीं. कांहीं तरी बोलावें म्हणून काशिनाथ प्रयत्न करीत होता पण बोलायला त्याची वाचा वाहात नव्हती. पूर्वीप्रमाणेंच आणखी कांहीं तरी बोलावें असें जें त्याला वाटत होतें, तें यापुढें पचणार नाहीं अशी खात्री झाल्यामुळें तो म्हणाला, " मला क्षमा करा. खरोखरच मीं तुमच्याशीं प्रतारणा केली. तें पुस्तक माझं आहे—अन् तें माझं आहे हें एक चंपाताईच सांगूं शकतील. तो पुरावा त्यांनीं आधींच मिळवला आहे. कांहीं तरी असामान्य ठरेल असं मी लिहिलं आहे, असा माझा आत्मविश्वास होता. म्हणूनच मी तुमच्या आईचं मत कळायची वाट पाहत होतों. आतांच तें कळलं—कळल्याबरोबर मला काय वाटलं तें तुम्हांला सांगायला माझ्याकडे शब्दच नाहींत. त्या आनंदाच्या भरांत मी खोटं बोलत होतों—बेछूट खोटं बोलायचा यशस्वी प्रयत्न करीत होतों. दुसऱ्या कुणाकडे तें पचलं असतं—" एक क्षणभर थांबून तो म्हणाला, "—जाऊं दे त्या गोष्टी. आतां माझा आत्मविश्वास बळकट झाला. माझं दुसरं पुस्तक या पेक्षांही चांगलं होईल अशी आतां मला खात्री वाटूं लागलीय—"

" मग आतां हा बुरखा द्या फेंकून ! " तारिणी म्हणाली, " आडून बाण मारण्याचा काळ आतां संपलाय. उघडउघड रणांगणांत ठाण मांडून लढाई द्यायची तयारी झालीय आतां. आईच्या मतापेक्षांही माझ्या मताबद्दल मला जास्त अभिमान वाटत असतो. आईच्या दृष्टीला कांहीं मर्यादा आहे. अनुभवाचा तिचा वांटा माझ्यापेक्षां जास्त असला तरी ज्या काळांत मी जन्म घेतला तो काळ तिनं ओलांडलेल्या काळच्या पुढला आहे. ती आमच्या पिढीची नजर पुढली आहे. या पिढीच्या नजरेनं जेव्हां मी पाहतें तेव्हां तुमचं हें नवं पुस्तक मला अद्वितीय वाटतं.—थांबा–अवास्तव स्तुति करायची मला संवय नाहीं कीं भलतीं विशेषणं द्यायचीही मला संवय नाहीं. मी 'अद्वितीय' म्हटलं तें शब्दशः यथार्थ आहे. माझी आई हें पुस्तक वाचून दिपून गेली यांत कांहीं आश्चर्य नाहीं—पण मी दिपून गेलें हें विशेष आहे. खरोखरच तुमचं पुस्तक अद्वितीय आहे ! " असें म्हणून त्याच्या उत्तराची वाट न पाहतां ती एकदम निघून गेली.

बिचारा काशिनाथ नुसता पहात राहिला होता. तो आघात त्याला असह्य झाला. दुःखाप्रमाणें सुखाचा आघात देखील दुःसह होतो याचा अनुभव येण्याइतका सुखाचा भाग त्याच्या वांट्याला यापूर्वी कधीं आला होता, म्हणूनच तो सुन्न झाला. कितीतरी वेळ तो दगडासारखा स्तब्ध बसून राहिला होता.

ज्यावेळीं तो भानावर आला त्यावेळीं तारिणी कॉलेजांतून निघून गेली होती. आपलें रहस्य न फोडण्याबद्दल तिला सांगायचें राहून गेलें, असें वाटून तो अस्वस्थ झाला.

शारदाबाईच्या बैठकींत पुन: त्या पुस्तकाची चर्चा सुरू झाली त्यावेळीं तारिणी तिथें हजर होती. पुस्तकांतील गुणांना दोषाचा डूब देऊन ज्यावेळीं मधुकर बोलूं लागला त्यावेळीं नित्याची संवय सोडून तिनें त्या चर्चेंत तोंड घातलें. त्याचा प्रत्येक आरोप साधार आणि सप्रमाण खोडून काढायला जेव्हां तारिणीनें सुरवात केली त्यावेळीं मधुकरही फार अस्वस्थ झाला. तारिणी सहसा मधुकरशीं बोलत नसे. तसा कधीं प्रसंगच येत नसे. चर्चेच्या वेळीं जेव्हां जेव्हां ती हजर असे तेव्हां तेव्हां तिचे उद्गार सार्वत्रिक स्वरूपाचे असत. पण काशिनाथच्या पुस्तकाच्या अभिमानामुळें यावेळीं तिचा तोल सुटला आणि सरळ सरळ मधुकरवर तोंड टाकायला तिनें सुरवात केली ती म्हणाली, "—हें पुस्तक वाचायचीसुद्धां तुमची पात्रता नाहीं. या पुस्तकांतली जी मध्यवर्ती व्यक्ति आहे त्या व्यक्तीचें आत्मकथन ज्या स्वरूपांत झालं आहे, तें स्वरूप कळायला माझ्या आईचं सामर्थ्य पाहिजे आहे. तसलं सामर्थ्य यायला जे क्लेश अनुभवले पाहिजेत, ज्या संकटपरंपरेला तोंड देण्याचा प्रसंग आला पाहिजे, जी आत्मत्यागाची जाणीव पाहिजे, तिचा मागमूससुद्धां तुमच्या ठायीं नाहीं. तुम्हीं स्वार्थी आहां, आपमतलबी आहां, मत्सरी आहां—असलं पुस्तक हातीं घेऊन त्याचं समीक्षण करण्याची पात्रताच मुळीं तुमच्या अंगीं नाहीं."

तिचें तें भाषण ऐकून शारदाबाई अस्वस्थ झाली आणि म्हणाली, "काय बोलतेस हें तारू ? पुस्तकाची चर्चा करायची ही रीत नव्हे. प्रत्येक वाचकाला प्रत्येक पुस्तकावर आपलं मत देण्याचं स्वातंत्र्य पाहिजे. तुला हें पुस्तक आवडलं, तसंच तें दुसऱ्या कुणाला आवडणारही नाहीं. प्रत्येकाला ते आवडलं पाहिजे असा तुझा आग्रह कां ? प्रत्येकाच्या आवडीनिवडी वेगळ्या असणं स्वाभाविक आहे. तिथं कुणी कुणावर कां सक्ती करावी ? तूं मधुकरचीं मतं सप्रमाण खोडून काढलींस तें मला पटलं—पण हे आतां तोल सोडून त्याच्यावर जे वैयक्तिक आरोप केलेस ते मात्र मुळींच पसंत नाहींत मला. तुझ्या हातून हा गुन्हा झालाय. या गुन्ह्याबद्दल तूं मधुकरची क्षमा माग—"

"तें शक्य नाहीं." तारिणी उसळून उठून म्हणाली, "मी जें जें कांहीं बोललें तें बुद्धीपुरस्सर बोललें. माझे कांहीं अंदाज होते—कांहीं संशय होते

म्हणेनास—पण या पुस्तकाच्या चर्चेमुळं माझे ते अंदाज खरे आहेत असं मला वाटूं लागलं म्हणूनच मी तसं बोललें. पण त्यांतला एकही शब्द मागं घ्यायची माझी तयारी नाहीं. " असें म्हणून तारिणी ताड्कन उठून तिथून निघून गेली.

अशा रीतीनें तारिणी निघून गेल्याचें शारदाबाईला आवडलें नाहीं. मधुकरला उद्देशून ती म्हणाली, " तुम्ही कांहीं वाईट वाटून घेऊं नका मधुकर. तारिणीचं वर्तन मला मुळींच पसंत पडलं नाहीं. तिनं असं बोलायला नको होतं. तिचं मस्तक एवढं कां भडकलं हेंच मला कळत नाहीं. तिच्या वतीनं मी तुमची क्षमा मागितली तर तुमचं समाधान होईल ना ? "

" हें काय बोलतां ? " मधुकर म्हणाला, " तुम्ही कसली माझी क्षमा मागतां ! तारिणी बोलली त्याचं मला एवढंसुद्धां कांहीं वाटलं नाहीं. तें पुस्तकच असं आहे ! त्या पुस्तकाच्या वाचनानं कोणाचंही मस्तक भडकेल, म्हणूनच मी त्या पुस्तकाच्या रचनेवर एवढे कोरडे हाणले. तारिणी चिरडीला आली, हाच पुरावा आहे माझे आरोप खरे असल्याचा—" एक क्षणभर थांबून तो म्हणाला, "—तारिणीचं म्हणणं मी मुळीं हिशेबांतच घेत नाहीं, हें पुनः एकदां सांगतों. तिनं माझ्यावर केलेले आरोप गंभीर आहेत यांत शंका नाहीं. तिनं तसे आरोप करावे अशी कोणतीही गोष्ट माझ्या हातून घडलेली नाहीं. तिनं मला स्वार्थी आणि आपमतलबी म्हणावं असं वर्तन माझ्या हातून केव्हांही घडलेलं नाहीं. जोपर्यंत माझ्या वर्तनाबद्दल मला खात्री आहे तोंपर्यंत कुणी कसलेही आरोप माझ्यावर केले तरी मला त्याची पर्वा नाहीं, एवढंच मी तुम्हांला सांगून ठेवतों.—" पुनः क्षणभर थांबून तो म्हणाला, " मला राग आला आहे असं कदाचित या माझ्या बोलण्यावरून तुम्हांला वाटेल—तसा गैरसमज करून घेऊं नका. क्षणभर मला उद्वेग झाला असेल—पण तो राग नव्हे कीं रोषही नव्हे. मला जर वाईट वाटलं असेल तर तें एवढ्याच करतां, कीं ही बाकीची मंडळी इथं बसलेली असतांना ती तसं कांहीं बोलली नसती तर बरं झालं असतं. मला कांहीं वाटत नसलं तरी आतां इथं बसलेल्या या लोकांच्या दृष्टीनं मी दोषी ठरलों असेन. तारिणीचं अन् माझं भाषण व्हायचा प्रसंग सुद्धां क्वचितच येतो हेंही यांना माहीत नाहीं. यांना माहीत आहे तें एवढंच, कीं या जागीं मी अगदीं घरोब्यानं वागतों. घरच्या माणसाप्रमाणें तुम्ही मला वागवतां म्हणूनच हिच्या त्या बोलण्याचा यांच्या मनावर परिणाम व्हायचा

संभव आहे. एवढयासाठींच मी हें बोलून टाकतों आहें. मी पुनः एकदां सांगतों, कीं रागाच्या भरांत—तें पुस्तक वाचल्यामुळं झालेल्या मनावरच्या परिणामामुळं तारिणी जें कांहीं बोलली, त्याचा दोष आपणा सर्वांना असामान्य वाटणाऱ्या या पुस्तकाच्या कर्त्याला मी देतों."

"झालं गेलं सारं विसरून जा." शारदाबाई म्हणाली, "मला वाटतं तारिणीला थोड्या वेळानं खात्रीनं पश्चात्ताप होईल."

बैठक बहुतेक मोडल्यासारखी झाली होती. मधुकरच्या भाषणाचा इतरांच्या मनावर कोणताही परिणाम होओ पण चंपेला मात्र त्याच्या उद्‌गारांत मूर्तिमंत दीर्घद्वेषीपणा दिसून आल्यासारखें वाटलें. तारिणीच्या उद्‌गारांचा संबंध त्या पुस्तकाच्या लेखकाकडे लावून आपलें भाषण संपवायचा त्यानें जो डाव टाकला, तो पाहून त्याच्या दुर्बुद्धीबद्दल क्षणभर तिला कौतुक वाटलें. मनांत कांहीं आलें तरीही तें दिसूं न देतां अगदीं बेमालुमपणें दुसऱ्यावर छाप टाकण्यासाठीं त्यानें ज्याप्रकारें भाषण केलें, तें पाहून त्याच्याबद्दल आधींच असलेला तिचा तिटकारा अधिक वाढला.

तारिणी आपल्या खोलींत जाऊन मुसमुसत बसली होती. चंपा तिच्या खोलींत गेली तेव्हां कांहीं वेळपर्यंत तिनें तिच्याकडे पाहिलें सुद्धां नाहीं. चंपा आल्याचें तिला कळलें तें तिनें बोलायला सुरुवात केली तेव्हां. चंपा म्हणाली, "आज केवढी तरी मोठी चूक केलीस तूं तारू! भलत्या माणसावर भलते आरोप करणं—कोणत्याही प्रकारचं निमित्त मिळाल्याशिवाय असे अवास्तव आरोप करणं चांगलं नव्हे."

"काय चांगलं नव्हे?" तारिणी तिरमिरीला येऊन म्हणाली, "मी बोललें त्यांतलं अक्षर न् अक्षर खरं आहे. माझी अगदी खात्री झाली, हा लेखक कोण आहे तें मधुकरला खास माहीत आहे. पहिल्यापासून अगदीं व्यवस्थितपणें या लेखकाबद्दल आईचं मन कलुषित करायचा जो प्रयत्न तो करतो आहे तो उगीच नाहीं! मी या पुस्तकाची तरफदारी केली हेंच त्याला फार जाणवलं. आजवर त्याच्याशीं मी फारसा संबंध येऊं दिला नाहीं तरीही तो मला ओळखतो. आईची मर्जी संपादन करून माझ्या गळ्यांत माळ घालायचा त्याचा डाव आहे याची मलाही कल्पना आहे म्हणूनच मला अशी चीड आली. त्याला वाटलं, कदाचित या पुस्तकाच्या लेखकावर मी फिदा होईन—त्याचा अंदाज चुकीचा नाहीं—प्रेमाचा प्रश्न क्षणभर बाजूला

ठेवला तर या लेखकाबद्दल खरोखरच मला मोठा आदर उत्पन्न झालाय. मानवी अंतःकरणाच्या अथांग सागरांत बुडी मारून त्यानं जीं रत्नं बाहेर काढून दाखवलीं आहेत तीं पाहून जो दिपून जाणार नाहीं तो जित्या माणसाचा जीवच नव्हे असं मी म्हणेन !—"

अंतःकरणाच्या उमाळ्यानें बोलत असल्याचा परिणाम होऊन तारिणी क्षणभर स्वस्थ राहिली. तिला काय वाटत होतें याची अचुक कल्पना चंपेला आली होती. त्या पुस्तकाच्या वाचनानें तिच्या मनावर कोणत्या प्रकारचा परिणाम झाला होता याचाही अंदाज तिला आला होता. तिनें स्वतः तें पुस्तक चांगलें दोन वेळ वाचलें होतें. तें वाचल्यावेळीं तिला वाटलें होतें, कीं तो लेखक इतर बाबतींत कसाही असो, सहृदयतेबरोबरच त्याची अवलोकनशक्तीही असाधारण असली पाहिजे. तिनें त्याला प्रत्यक्ष पाहिलें होतें. भित्रेपणाचा बुरखा पांघरून म्हणा, किंवा त्याच्या इच्छेविरुद्ध तसला बुरखा त्याच्यावर पडला असल्यामुळें म्हणा, जगाच्या दृष्टीला त्याचें खरें स्वरूप दिसून येत नव्हतें. कुणाही व्यक्तीच्या लेखनावरून त्या लेखकाची मनोभूमि ताडतां येईल असें केव्हांही म्हणतां यायचें नाहीं. एकादा सज्जन माणूस जसें दुर्जनाचें चित्र बेमालूम रंगवतो, तसेंच एकादा दुर्जन देखील सज्जनाचीं चित्रें यथातथ्य रेखाटण्यास समर्थ होईल हेंही तिला माहित होतें.

प्रश्न होता तो बुद्धिमत्तेचा. या लेखकाच्या ठायीं तसली बुद्धिमत्ता आहे याचा प्रत्यय त्या पुस्तकावरून तिला आला होता. मधुकर देखील बुद्धिमान होता. पण तो आपल्या बुद्धिमत्तेचा उपयोग कशा रीतीनें करीत होता हें ती प्रत्यक्ष पहात होती. मधुकरची बुद्धिमत्ता कसोटीला लागली होती. विश्वविद्यालयाच्या पदव्या यशस्वीपणानें मिळवून तो बुद्धिमान ठरला होता— पण वाङ्मयनिर्मिती करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं असल्याचा पुरावा मात्र अजून मिळाला नव्हता.

शारदाबाईला मिळालेल्या असामान्य यशामुळें तारिणीच्या दृष्टीनें बुद्धिमत्तेचें एक गमक ठरलें होतें. त्याच दृष्टीनें ती योग्य माणूस हुडकीत होती याचीही तिला कल्पना होती. म्हणूनच तिचे हे उद्गार ऐकून तिला एक प्रकारचें समाधान वाटलें.

कोणतेंही कारण नसतांना काशिनाथबद्दल तिला जिव्हाळा उत्पन्न झाला होता—वात्सल्य वाटूं लागलें होतें. काशिनाथलाही तिच्याबद्दल कांहींतरी

वाटत होतें हेंही तिला कळून आलें होतें. मधुकर आणि गोपीनाथ यांचा संबंध काशिनाथपेक्षां जास्त आला असतांही तिला त्यांच्याबद्दल किंवा त्यांना तिच्याबद्दल असें कांहींच वाटलें नव्हतें. या सर्व गोष्टी ध्यानीं घेऊन ती तारिणीच्या या भाषणाशीं मेळ घालून पहात होती.

चंपा कांहीं बोलत नाहीं असें पाहून तारिणी म्हणाली, " तुला माझा राग आला का ? तोंडदेखलं बोलणं मला साधत नाहीं—तोंडदेखलं बोलणाऱ्या माणसाबद्दल मला मोठा तिटकारा आहे–मग ही खुषामत तो कितीही बेमालूमपणें करणारा असो—म्हणूनच मला मधुकरची चीड येते. तसं पाहिलं तर तूंच ही दृष्टि दिलीस. त्यामुळंच मी मुकाट्यानं आजवर त्याचं वर्तन अजमावीत आलें होतें. या पुस्तकाच्या बाबतींत त्यानं आखलेलं धोरण पाहून मला मोठी चीड आली. मी तसं बोलायला नको होतं खरं पण बोलून टाकलं यांत कांहीं बिघडलं नाहीं असं या क्षणालासुद्धां मला वाटतंय. एकदां त्याला हें कळायलाच हवं होतं. मला त्याच्याबद्दल काय वाटतं हें कळल्यावर आतां तरी तो सावध होईल."

" पाहूं काय होतं तें." चंपा म्हणाली, " मी सुद्धां म्हणतें, झालं तें बरं झालं. पण एवढ्याशा गोष्टीनं हटण्याइतका तो कच्च्या दिलाचा नाहीं—"

बोलतां बोलतां ती एकदम थांबली. कच्च्या दिलाचा उल्लेख झाल्यामुळं तिला गोपीनाथची आठवण झाली. ती म्हणाली, " बऱ्याच दिवसांत गोपीनाथची कांहीं खबर कळली नाहीं—म्हणजे तशी शरयूकडून त्याची खबर कळते पण त्याची प्रत्यक्ष भेट कांहीं झाली नाहीं. शरयूसुद्धां बऱ्याच दिवसांत इकडे फिरकली नाहीं. दोघांचीही वृत्ति अशी एकदम कशी बदलली, एवढा लोभ लागलेला असतांही त्या दोघांनीं जुनीं नातीं अशीं तोडून टाकलीं याचंच मला आश्चर्य वाटतं. काय म्हणावं या माणसाच्या स्वभावाला ! जितका जितका मी विचार करतें तितकं तितकं माझं मन कावून जातं. तुला भेटली होती का कधीं शरयू ? "

" छे : मुळींच नाहीं ! " तारिणी म्हणाली, " नि मीसुद्धां तिला भेटायचं विसरून गेलें होतें. कॉलेजांत जाऊं लागल्यापासून अन् त्याबरोबरच हा नव्या अभ्यासाचा बोजा माथीं घेतल्यापासून मी सारं कांहीं विसरून गेलें होतें. ही नवी ओळख झाली नसती तर मी एकाद्या यंत्रासारखी अभ्यासाच्या चरकांत फिरत राहिलें असतें. एकदां वाटतं, बरं झालं असतं तसं झालं

असतं तर ! पण झालं तें कांहीं वाईट नाहीं. तसल्या त्या यांत्रिक जीवनापेक्षां माणसाच्या आयुष्यांत कांहीं ना कांहीं खळबळ निर्माण झालेलीच बरी. या साऱ्या प्रकारानं मला एक नवी दृष्टि आली आहे. एक नवी जाणीव उत्पन्न झाली आहे. या जाणिवेच्या पायीं माझ्या आयुष्यांत कांहींतरी क्रांति घडून येणार असं वाटूं लागलंय मला. तुला नाहीं असं वाटत ?"

चंपा म्हणाली, "मला काय वाटतं तें मी तुला कसं सांगूं ? जन्म देणारी ती असली तरी तुझी खरी आई मी आहें. तुझी नजर कशीही असो, पण मी तुझ्याकडे पाहतें ती या नजरेनं. तुला त्याची कल्पना यायची नाहीं. ती कल्पना यायला माणसाच्या वयांत बदल व्हावा लागतो. तारुण्याची मर्यादा संपल्याशिवाय खऱ्या वात्सल्याची कल्पना जशी यावी तशी येत नाहीं—" थोडेंसें हंसून ती म्हणाली, "चाललंय तसंच चालूं दे. माझा त्याला विरोध नाहीं एवढंच मी तुला सांगून ठेवतें !"

चंपेच्या त्या आश्वासनानें तारिणीला मोठा धीर आला.

---

## १६ कैफियत

त्या दिवशीं चंपेला मोठा धक्का बसला. गोपीनाथचें लग्न झालें अशी बातमी आली. तें लग्न शरयूशीं झालें नव्हतें. शरयूला आधीं ही बातमी कळली होती कीं नाहीं, कळली असल्यास तिनें आपल्याला कां कळवलें नाहीं, याचें चंपेला आश्चर्य वाटलें.

चंपा शरयूच्या घरीं गेली त्यावेळीं शरयू घरीं नव्हती. गोपीनाथ राहत असलेल्या शेजारच्या ब्लॉकच्या दरवाजाला कुलूप होतें. ती मंडळी तात्पुरती बाहेर गेली होती, कीं अजिबात तें घर सोडून गेली होती याची शरयूच्या घरच्या मंडळीला माहिती नव्हती.

थोड्या वेळानें शरयू आली त्यावेळीं तिचा चेहरा प्रफुल्लित असलेला पाहून चंपेला आश्चर्य वाटलें. चंपेला पाहतांच ती म्हणाली, "कळलं ना तुला ? गोपीनाथचं लग्न झालं ! कुठल्याशा एक खेड्यांतल्या मुलीबरोबर झालं. उभ्या जन्मांत त्यानं ती मुलगी कधीं पाहिली नव्हती. चांगली देखणी आहे

मुलगी—वाढाळ आहे—माझ्यापेक्षां वयानं लहान असली तरी दिसायला माझ्यापेक्षांही मोठी दिसते. शिकलेली असावी पण तशी फारशी शिक्षणांत पुढं गेलेली नाहीं असं मला कुणी सांगितलं—"

"बरीच माहिती मिळवलीस म्हणायची!" चंपा उद्गारली, "कुणी दिली ही माहिती तुला?—कीं लग्नाला गेली होतीस?"

"आमंत्रण होतं, मग नको का जायला? ही जुन्या पद्धतीनं केलेलीं लग्नं फारशीं पहायला मिळत नाहींत इथं मुंबईत. बाहेरगांवीं जायची संधि होती, म्हटलं थोडी बाहेरची दिशा दिसेल, तसंच खेडेगांवच्या थाटाचं लग्नही पहायला मिळेल. मोठी करमणूक झाली माझी. पंचवीस वर्षं मागं गेल्यासारखं वाटलं. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतून असल्या प्रसंगांचे ओझरते उल्लेख वाचले होते, ते प्रसंग चांगले ढळढळीत स्वरूपांत पहायला मिळाले. त्या विहिणी, त्या करवल्या न् तीं रासन्हाणीं, त्या पायघड्या, तीं रुसणींफुगणीं, भांडणतंटे, सारं कांहीं पहायला मिळालं मला. हें वैभव कुठं पहायला मिळतं आम्हां लोकांना?"

"चुकतेस शरयू, हीं सारीं वैभवं आमच्या आईमावश्यांनीं पाहिलीं होतीं. मंगळसूत्राचे मणी पहिले आम्हीच ओंवीत होतों ना? अखंड सुवासिनी ना आम्ही? तिकडे आमच्या प्रांतांत लग्नांतल्या मुख्य करवल्या आम्ही असायच्या. केवढा मान असायचा आमचा तिथं. आमचा हात लागल्याशिवाय किती तरी सोहळे होत नसत पूर्वींच्या लग्नांत. इकडे आतां मुंबईला आलों नि ते सारे मानपान गमावून बसलों! बरं बरं, एकूण तूं लग्नाला गेली होतीस गोपीनाथच्या. कुणी बोलावलं होतं तुला?"

"आमंत्रणच होतं कीं आमच्या घराला."

"काशिनाथ गेला होता का त्या लग्नाला?"

"खरंच! तो दिसला नाहीं कुठं! नव्हता गेला वाटतं! आतां त्यांनीं हें बिऱ्हाड सोडलं. गोपीनाथच्या बापानं तिकडे खारला घर बांधलंय वाटतं. तिकडेच गेलीं तीं सारीं रहायला. तेवढंच वाईट वाटलं मला. म्हटलं एकदां त्याचा संसार कसा काय थाटतोय तें पाहिलं असतं इथं असता तर."

चंपा क्षणभर स्तब्ध राहिली. गोपीनाथचें लग्न झाल्याचा शरयूच्या मनावर कांहींच परिणाम कसा झाला नाहीं याचें तिला आश्चर्य वाटलें. मनावर परिणाम झाला असूनही ती मुद्दाम स्वतःबरोबर दुसऱ्याची फसवणूक करते

आहे कीं काय अशीही तिला शंका आली. ती म्हणाली, " एकूण तूं लग्नाला गेली होतीस तर ! काय वाटलं तुला या लग्नाबद्दल ? "

" सांगितलं ना तुला आतांच ? "

" तें नव्हे—गोपीनाथनं वचन मोडलं, तुला तोंडघशीं पाडलं—अगदीं तुझ्या नजरेसमोर जन्मांत कधीं न पाहिलेल्या मुलीबरोबर लग्न केलं अन् उलट तुला या लग्नाला हजर रहायला आमंत्रण दिलं याचं कांहींच का वाटलं नाहीं तुला ? "

" एरवीं का गेलें असतें ? काय वाटायचंय त्यांत ? त्या पूर्वींच्या गांठी त्यानं केव्हांच तोडून टाकल्या होत्या. आतां तसं कांहीं व्हायचं नाहीं असं अगदीं स्पष्ट शब्दांत त्यानं सांगितलं होतं. मग काय वाटायचं त्याबद्दल ? थोडंस चमत्कारिक वाटलं खरं, पण तें एवढयाचसाठीं, कीं माझं नातं तोडायला जें कारण झालं होतं त्याचं काय झालं ? ती आकांक्षा असाध्य वाटली म्हणून का त्यानं ही अशी खाईंत उडी घेतली, असाही प्रश्न क्षणभर उभा राहिला माझ्यापुढं. तसंच असेलसं वाटलं. इच्छा कांहीं पुरी होत नाहीं, लग्न तर करायचं, मग कुठली का मुलगी असेना—पूर्वींच्या अल्पवयी मुलांच्या लग्नासारखं हेंही लग्न होऊन गेलं तर काय बिघडलं, असंही कदाचित वाटलं असेल त्याला. "

" कशी काय वृत्ति होती त्याची लग्नाच्या वेळेला ? "

" फारसा खुषींत नव्हता. पण फारसा कुठं विरोधही करीत नव्हता—जुन्या काळचे ते सारे सोहळे—आजच्या माणसांना पोरकट वाटणारे ते सारे चाळे अगदीं मुकाट्यानं आचरणांत आणीत होता. मला मोठी गंमत वाटत होती तें पाहतांना. केव्हां केव्हां कींवही येत होती त्याची. पण त्यानंतर त्याचं माझं कांहीं भाषण झालं नाहीं नि आतां यापुढं तो योग येईल असं कांहीं दिसत नाहीं—" बोलतां बोलतां तिची वृत्ती एकदम बदलली आणि एकदम तिला रडूं कोसळलें.

तिला जवळ घेऊन कुरवाळीत चंपा म्हणाली, " कां अशी उगीच फसवणूक करून घेतेस स्वतःची ? झालं तें बरं झालं. तो नव्हताच तुझा. सक्तीखालीं लग्न झालं असतं तुझ्याशीं, तर तुझ्या आयुष्याचं मातेरं झालं असतं. मला आश्चर्य वाटतं तें एवढंच, कीं आमच्याकडे कशी कुंकोत्री आली नाहीं त्याची ? "

आवंढा गिळून शरयू म्हणाली, "कशाला येईल कुंकोत्री तुम्हांला? माझ्याशीं तो बोलत तरी होता पण तुमचं घर त्यानं अजिबात वर्ज्य केलं होतं. तो सबंधच ठेवायचा नव्हता त्याला. ती आशाच सोडली होती त्यानं. म्हणूनच ना त्यानं हें लग्न केलं? बरं झालं—इथनं निघून गेले हेंही बरं झालं—नजरेसमोर तरी दिसायला नको तें! समोरासमोर रोज ढोंग करीत राहणं मला मोठं कठीण गेलं असतं. तुला फसवायला पाहत होतें, स्वतःची फसवणूक करीत होतें, पण तें कांहीं मला साधलं नाहीं. आमची जात फसवणूक करण्यांत मोठी तरबेज असते असं कुलीन माणसं म्हणतात तें किती खोटं असतं, याचा माझा मलाच प्रत्यय आला. एक स्वप्न होतं तें. तें गेलं विरून. आतां मागमूससुद्धां राहणार नाहीं त्याचा—" पुनः तिला उमाळा आला. चंपेच्या गळ्याला घट्ट मिठी मारून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. कोणत्या शब्दांनीं तिचें समाधान करावें याची चंपेला पंचाईत पडली. कोणत्याही भाषेनें तिचें समाधान झालें नसतें याची तिला खात्री होती म्हणून तशीच तिला जवळ घेऊन कुरवाळीत ती स्वस्थ बसून राहिली.

पोटभर रडून घेतल्यावर अंतरींच्या दुःखाचा उमाळा जेव्हां ओसरला तेव्हां पदरानें डोळे पुसून घेऊन चंपेकडे पहात हंसत हंसत ती म्हणाली, " आतां मन अगदीं निधडं केलंय मी! तुला पटायचं नाहीं—पण मी ठरवलंय, काय होईल तें होवो, यापुढं लग्नाच्या फंदांत पडायचं नाहीं—" दांत ओठ खाऊन ती म्हणाली, "—अन् ब्रह्मचर्यही पाळायचं नाहीं!"

" गप्प रहा!" रागाला येऊन चंपा म्हणाली, " असलं भलतंच कांहीं बोलूं नकोस."

" काय बिघडलं त्यांत?" शरयू तितक्याच बेफिकीरपणें उद्गारली, " आमचा कुळधर्म आहे तो. पदवीधर झाल्यानं कांहीं जात बदलत नाहीं. बिनजातीचीं माणसं आम्ही. भगवद्गीतेंतलं वचन सार्थ होत असेल तर तें आमच्या बाबतींत—'मत्स्थानि सर्व भूतानि नचाहं तेश्ववस्थितः'. सारे आमच्या जातीचे आहेत पण आम्ही कुणाच्याच जातीच्या नाहीं. जगांत राहून जगावेगळ्या आहोंत आम्ही. मग कुलीनांच्या जगाचे आचार पाळायला हें शिक्षण का आडवं यावं आम्हांला? कुलीनांतूनही पतिता नाहीं का जन्माला आल्या? सुशिक्षित असलेल्या किती जणी पतिता झाल्या आहेत? चांगल्या वावरताहेत समाजांत. कोण कदर करतंय त्यांच्या चालवणुकीची? पैशाच्या

जोरावर सारं कांहीं खपून जातंय. आमच्या कुळधर्माच्या कृपेनं मी चांगली संपन्न आहें. आतां एकाद्या पुरुषासारखं करणार आहें मी—समजलं का तुला ?—पुरुषासारखी वागणार आहें मी. पगारी नवरा आणणार आहें एकादा—नवरा म्हणजे नवरा नव्हे, आपलासखासोबती म्हणेनास !—रखेली असते तसा रखेला म्हणेनास !—" चंपेच्या मुद्रेवर आलेली भयानक छटा पाहून तिला उलट गुदगुल्या झाल्या. ती अधिकच हुरळून म्हणाली, "—अशी पाहतेस काय माझ्याकडे ? तुला खोटं वाटलं हें ? कुणी केलं नाहीं असं कधीं ?— कुलीनांतलीं असलीं उदाहरणं मला माहीत आहेत. मी कांहीं कुलीन नाहीं—मग जीं बंधनं कुलीनांतले कुणी पाळीत नाहींत तीं मी तरी कशाला पाळूं ? पुरुषांच्या जातीवर कां सूड उगवूं नये मी ?—" ते उद्गार काढीत असतांना तिची मुद्रा चंपेइतकीच भयानक झाली होती.

दोघींच्या मनावर जरी दोन प्रकारचे आघात झाले होते तरी त्याचे परिणाम मात्र एकाच प्रकारचे होते. दोघींनाही जगांतल्या कुलीनांच्या अप्रामाणिकपणा-बद्दल तिटकारा आला होता. पण त्या अप्रामाणिकपणाकडे पहायची दोघींची वृत्ति मात्र अगदीं भिन्न होती. कुळधर्माला अनुसरून वागणाऱ्या आपल्या बहिणी-मुलींनीं संसारांत पडावं, माणुसकीनं वागावं, त्यांना दर्जा यावा, जात यावी असें चंपेला वाटत होतें; शरयूलाही एकाकाळीं तसेंच वाटत होतें. पण त्या तिच्या आवडीवर गोपीनाथनें जो फटका मारला त्याची प्रतिक्रिया झाल्यामुळें शरयू बेफाम झाली होती. बेफामपणा दोघींच्याही ठायीं उत्पन्न झाला होता—पण तो दोन दिशांनीं !

दुःखाचा उमाळा आल्यामुळें शरयूच्या तोंडून शब्द निघत नव्हता आणि जुनी वृत्ति शरयूच्या ठायीं उसळून उठल्याचें पाहून झालेल्या उद्वेगामुळें चंपेच्या तोंडून शब्द येत नव्हता. कांहींवेळ त्या दोघीही एक शब्दसुद्धां न बोलतां स्वस्थ बसल्या होत्या. अंतःकरणांतलें वादळ उचंबळून आल्यामुळें दोघींनाही दाही दिशा शून्य भासत होत्या. तो उद्वेगाचा भर थोडासा ओसरल्यावर चंपा म्हणाली, "असं पहा शरयू, एकदम अविचार करूं नकोस. पैशाचा कैफ मोठा वाईट असतो. पुष्कळांचा अधःपात झालाय या पैशाच्या कैफामुळं. पैशाच्या जोरावर जगाला आपल्या पायाशीं आणूं, असं म्हणणारे मोठमोठे तालेवार माणूससुद्धां शेवटीं रसातळाला गेले आहेत. पैशानं कधीं कुणाचं कल्याण केलं नाहीं—पैशाच्या कैफानं तर नाहींच नाहीं. माणुसकीला

दुरावणारी जर कोणती एकादी चीज असेल तर ती ही दौलत—पैशाची दौलत. हा कैफ झाडून टाक. सूडाची भावना वाईट. तुला काय वाटतं, गोपीनाथला हें लग्न करतांना मोठा आनंद झाला असेल असं का वाटतं तुला? एक प्रकारचा आत्मघात आहे हा त्याचा. तोही अविचारच! या अविचारामुळं त्यानं आपल्या जन्माचं मातेरं करून घेतलं आहे तसं तूं तरी करूं नकोस."

"तर काय करूं मी?" शरयू चिरडीला येऊन म्हणाली, "जन्मभर अशीच राहूं? कां म्हणून? मला काय भावना नाहींत कीं माणुसकी नाहीं? माझ्याबरोबरच्या चारचौघी संसारी होऊन लेकुरवाळ्या झाल्यायत, यापुढंही होतील, त्या नजरेसमोर प्रत्यक्ष दिसत असतांना कां म्हणून मी सक्तीचं ब्रह्मचर्य पाळून राहूं? कां म्हणून मी आपल्या जिवाचा कोंडमारा करून राहूं? कीं गोपीनाथसारखंच कुणातरी एकाद्या अपरिचित पुरुषाशीं लग्न करून जन्माचं मातेरं करून घेऊं? प्रेमावर तुझा विश्वास नाहीं तें मला माहित आहे.—माझा विश्वास होता, प्रेम म्हणजे सर्वस्व असं मला वाटत होतं, पण आतां तो माझा भ्रम दूर झालाय. ती विलायती कल्पना आतां नाहींशी झालीय माझ्या अंतःकरणांतून! खूप विचार केला मी अन् शेवटीं ठरवलं—" क्षणभर चंपेच्या तोंडाकडे पहात दांतओठ खात ती म्हणाली, "—शेवटीं ठरवलं तें हें!"

शरयूला हृदयाशीं कवटाळून धरून चंपा म्हणाली, "पुनः सांगतें, असा अविचार करूं नकोस. हा उद्वेगाचा भर जरा ओसरूं दे. मन जरा शांत होऊं दे.—तुला नवा मार्ग दिसेल. तो मार्ग कोणता असेल याची मला कल्पना नाहीं. माणसाच्या आयुष्यांत नकळत अशा कांहीं चमत्कारिक गोष्टी होतात, कीं आधीं त्यांची त्याला जाणीवसुद्धां नसते. तसंच कांहींतरी होईल. अगदीं स्वस्थ रहा. फारसा विचार करूं नकोस. उगीच शीण देऊं नकोस मेंदूला. शिणलेला मेंदू माणसाला अविचाराला प्रवृत्त करतो. नोकरी करतेच आहेस, आणखी दुसरं कांहीं तरी काम कर—जुळत असेल तर लिहायला घे कांहीं तरी—सामाजिक चळवळींत भाग घे—मनाची जाणीव दुसऱ्या कुठंतरी गुंतवून टाकायचा प्रयत्न कर—बुद्धीला कांहीं दिवस कांहीं तरी वेगळंच काम दे—अगदीं अगदीं विसरुन टाक या झालेल्या गोष्टी म्हणजे पुढला मार्ग तुला आपोआप दिसेल. ऐकलंस? मला वचन दे—मला सांगितल्या-

शिवाय कांहीं करणार नाहीं अशी शपथ घे माझ्या गळयावर हात ठेवून ! ” बोलतां बोलतां तिचा कंठ सद्‌गदित झाला होता.

शरयूचेही डोळे ओलावले होते. भारावलेल्या वाणीनें तिनें शपथ घेतली तेव्हां चंपेचें समाधान झालें.

ती हकिकत तारिणीला कळली तेव्हां तीही आश्चर्यचकित झाली. काशीनाथची भेट झाली त्यावेळीं तारिणीनें त्याला विचारलें, “ गोपीनाथचं लग्न झालं म्हणून ऐकलं—पण तुम्ही कुठं बोललां नाहीं ? ”

“ मी घर सोडलं तें ! ” काशिनाथ अगदीं रुक्षपणें म्हणाला.

“ केव्हां सोडलं ? गोपीनाथचं लग्न व्हायच्या पूर्वी ? ”

“ हो ! ”

“ कां सोडलं ? ”

उत्तर देण्याचें काशिनाथच्या जिवावर आलें. यापुढें तारिणीपाशीं खोटें बोलायचें नाहीं असा त्यानें निश्चय केला होता त्याची त्याला आठवण झाली. तो म्हणाला, “ हें त्याचं लग्न झालं म्हणूनच मी घर सोडलं. मला तें पटलं नाहीं. शरयूची हकिकत तुम्हांला माहित असेलच. त्या लग्नाला सुद्धां मामांनीं संमति दिली होती. आज ना उद्यां केव्हांतरी तें लग्न होणार असं आम्हांला वाटत होतं. मधें कांहीं दिवस त्यांचं बिनसलं असावं असा मला संशय आला होता. म्हटलं प्रेमी जोडप्यांचे असे हे प्रेमकलह व्हायचेच. पुनः त्यांची ये जा सुरू झाली तेव्हां माझा अंदाज बरोबर ठरला याचं मला समाधान वाटलं. तितक्यांत मामीनं उचल खाल्ली. तिच्याच नात्यांतली कुठलीशी मुलगी होती. चांगली श्रीमंताची होती. पांच हजार रुपये हुंडा दिला त्यांनीं. मामीला तें आमिष आवडलं याचं कांहीं मला आश्चर्य वाटलं नाहीं. पण मामासुद्धां जेव्हां त्या आमिषाला बळी पडले असं मी पाहिलं तेव्हां मला धक्का बसला. त्याहीपेक्षां धक्का बसला तो गोपीनाथ या लग्नाला तयार झाल्याचा. तोही थोडासा माझ्यासारखाच भित्रा आहे. माझं भित्रेपण थोडं वेगळ्या प्रकारचं आहे—अगदीं आंतल्या गांठीचा नसला तरी तो थोडासा आंगचोर आहे—पण तत्त्वभ्रष्ट होऊन पांच हजाराच्या आमिषाला तो बळी पडेल असं मला केव्हांच वाटलं नव्हतं. ती मुलगी फारशी शिकलेलीही नाहीं. दिसायला बरी आहे—मी फोटो पाहला होता तिचा—प्रत्यक्ष पाहिली नाहीं—तरी बाकीचीं माणसं म्हणतात, कीं ती चांगली सुंदर आहे. असेलही कदाचित्—पण

गोपीनाथला काय हवं होतं ? सहचारिणी हवी होती कीं शेजेची सोबतीण हवी होती ? मला चीड आली ती याच गोष्टीची. ती मुलगी पहायला तो गेला होता तेंही मला आवडलं नाहीं. मामांचं आणि माझं त्याबाबतींत बोलणं झालं. बोलतां बोलतां माझा तोल सुटला. यापूर्वी कधीं एका शब्दानं देखील मी त्यांना टाकून बोललों नव्हतों. पण त्यावेळीं काय झालं कोण जाणे, मी तडातड बोलायला सुरवात केली. इतक्या दिवसांत मनांत सांचून राहिलेली सारी खळमळ त्या उद्वेगासरशीं मी ओकून टाकली. माझ्यावर गोपीनाथ-सारखाच प्रसंग येण्याची भीति नव्हती खरी—माझ्यासारख्या दरिद्री कारकुनाला कुणी एवढा हुंडा दिला नसता—तरी पण अशीच कुठली तरी नात्यागोत्याची मुलगी शोधून माझ्या गळयांत बांधण्याची मामीनं सक्ति केली असती अशी मला भीति वाटली. त्यामुळंच माझा तोल सुटला आणि रागाच्या तिरमिरींत मी घराबाहेर निघालों तों हा वेळपर्यंत त्यांना भेटलों नाहीं—" बोलत असतांना तो अगदीं आवेशांत आला होता. यावेळीं सुद्धां आपला तोल सुटतो आहे हें ध्यानांत येऊन सांवरून घेण्यासाठीं तो म्हणाला, "झालं तें बरं झालं. किती दिवस मी दुसऱ्यावर अवलंबून राहूं ? थोडासा का होईना पण मी पगार मिळवीत होतों म्हणून मला तेवढं कांहीं वाटत नव्हतं. नोकरी पत्करल्यापासून माझ्या अन्नवस्त्राचा बोजा त्यांच्यावर पडत नाहीं एवढं तरी मला समाधान वाटत होतं. पण आतां मोठी पंचाईत आली आहे. इथला पगार फारच थोडा आहे. सध्यां मी माझ्या एका ओळखीच्या माणसाकडे राहिलोंय खरा पण आतां कुठं तरी एकादी खोली मिळवायच्या प्रयत्नाला लागलं पाहिजे. अन् खोली घेतली तर आहे या पगारांत खर्च कसा भागेल याची मला काळजी पडलीय. पुस्तकाचे आलेले पैसे कांहीं मी मामां-कडे दिले नव्हते—म्हणजे त्यांना फसवायचं नव्हतं मला—पण पैसे द्यायला गेलों असतों तर माझं गुपित मला उघडं करावं लागलं असतं. ते पैसे माझ्या हातीं आहेत. तेवढ्यावर कदाचित वर्षसहा महिने निभावून जातील पण 'पुढं काय' हाच प्रश्न पडला आहे मला !"

"दुसरी नोकरी धरणार आहांत तुम्हीं कुठं ?"

"मॅट्रिक नसलेल्या माणसाला आज लढाईवर गेल्याशिवाय दुसऱ्या कुठं चांगलीशी नोकरी मिळत नाहीं. वर्तमानपत्राच्या एकदोन ऑफिसांत मी प्रयत्न करून पाहिला पण त्यांच्याकडे सुद्धां अलिकडे माणसं कमी करताहेत. पानं

कमी झालींयत ना वर्तमानपत्रांचीं ? शिवाय जोंपर्यंत मी माझी लेखनक्षेत्रांतली पूर्वीची कामगिरी कबूल करायला तयार नाहीं तोंपर्यंत कोणत्या आधारावर त्यांनीं तरी मला आपल्या कचेरींत घ्यावं ? लढाईच्या कुठल्याही खात्यांत जायला माझा तात्विक विरोध आहे. म्हणूनच मी मोठ्या संकटांत पडलों आहें. ”

यावर काय बोलावें तें तारिणीला सुचेना. कांहीं तरी बोलायचें म्हणून ती म्हणाली, “ मग आहे इथंच पगार वाढवून घ्यायची कां खटपट करीत नाहीं तुम्ही ? ”

“ तेंही करून पाहिलं. तसं पाहिलं तर प्रिन्सिपॉलसाहेबांनीं केवळ माझी सोय व्हावी म्हणून ही नवी जागा अस्तित्वांत आणली होती. कमिटीचे लोक पगार वाढवायच्या ऐवजीं कदाचित ही जागाच काढून टाका म्हणून म्हणतील अशी प्रिन्सिपॉलसाहेबांना भीति वाटतेय. परीक्षेच्या अभावीं माणसाची काय दुर्दशा होत असते याची आज चांगलीच कल्पना येतेय मला. आतां एकच आधार आहे— गिरणींत जायचं. तिथं चांगला पगार मिळतो म्हणतात— कारकुनापेक्षांही चांगला पगार मिळतो पण तिथं गेलों तर आवडत्या कामाला फांटा द्यावा लागेल. हातून कांहींच लेखन व्हायचं नाहीं—”

तारिणीच्या मनांत एक कल्पना आली आणि ती मधेंच म्हणाली, “ मी माझ्या आईला विचारतें. खूप मोठी जागा आहे आमच्या घरीं. एक दोन खोल्या तर मोकळयाच पडल्याहेत. त्यांतली एकादी खोली—”

“ छे: छे: भलतंच काय बोलतां ? ” काशिनाथ घाबरून म्हणाला, “ तें जमायचं नाहीं. कुणाचेच उपकार नको आहेत मला. रागावूं नका, तुम्हांला तसं वाटत नसेल—पण माझं मन मोठं दुबळं झालंय. मामांच्या उपकाराच्या ओझ्याखालीं जन्मभर चिरडून गेलों होतों, आतां कुणाचे उपकार घ्यायचे जशी भीति वाटते तशी लाजही वाटते मला. कांहीं दिवस हाल काढावे लागतील, पुढं काय व्हायचं असेल तें होईल. लढाई केव्हां तरी संपणार आहे ना ? केव्हां तरी परिस्थिति बदलेल ना ? कदाचित् माझ्या पुस्तका-बद्दल देखील मला चार पैसे अधिक मिळायचा संभव आहे. हें पुस्तक चांगलं खपलं तर आणखी महिनाभऱ्यांत त्याची दुसरी आवृत्ति काढावी लागेल असं माझे प्रकाशक म्हणत होते. त्या दुसऱ्या आवृत्तीसाठींही कांहीं पैसे द्यायचे त्यांनीं कबूल केलंय. नव्या पुस्तकालाही सुरवात केलीय मी—” एक मोठा

सुस्कारा टाकून तो म्हणाला, "—आतां एवढाच काय तो आधार आहे मला."

आत्माभिमानाची त्याची तिखट भावना पाहून तारिणीला जास्त कांहीं बोलण्याचें धैर्य झालें नाहीं.

झालेली हकिकत तिनें चंपेला सांगितली. तिची सूचना चंपेलाही आवडली. प्रश्न होता तो हा, कीं तें त्याला पटवायचें कसें? घरच्या व्यवस्थेकडे शारदाबाई मुळींच पहात नव्हती. तो सारा अधिकार चंपेच्या हातीं होता.

तसें नसतें तर काशिनाथ हा कोण हें शारदाबाईकडे उक्त करावें लागलें असतें. तरीही काशिनाथ येऊन आपल्या घरीं रहावा हें शारदाबाईंना रुचेल कीं काय याची तारिणीप्रमाणेंच चंपेलाही शंका वाटत होती.

चंपेनें तारिणीकरवीं काशिनाथला बोलावून घेतलें आणि विचारलें तेव्हां तो म्हणाला, " उपकाराचा प्रश्न क्षणभर बाजूला ठेवला तरीही मी म्हणतों, कां मी तुमच्या घरीं येऊन रहावं ? "

" कां राहूं नये ? " चंपा म्हणाली, " काय हरकत आहे त्याला ? कुणी नातेवाईक असता आमचा, तर या अडचणीच्या वेळीं आम्ही नसती का त्याला जागा दिली ? "

" पण मी तुमचा कोण आहें ! परिचय झालाय तो अगदीं अलिकडचा. माझी कींव आल्यामुळं तुम्ही मला खोली द्यायची गोष्ट काढतांहां एवढाच काय तो लागाबांधा. मी कसा आहें हेंही तुम्हाला माहित नाहीं. गोपीनाथला तुम्ही ओळखीत होतां, चांगला घरोबा होता त्याचा न् तुमचा, पण त्यानं सुद्धां हा असा दगा दिला. त्याचाच मी भाऊ. माझ्यावर कां तुम्ही विश्वास ठेवावा ? "

" तुला आपला म्हटलाय म्हणून." चंपा त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली, " मी हें तोंडदेखलं बोलत नाहीं. कांहीं कारण नसतां मला मोठी आपुलकी वाटूं लागलीय तुझ्याबद्दल. माझा एक दत्तक मुलगा म्हणून तूं इथं रहा असं म्हणणं आहे माझं—" त्याच्या नजरेला नजर भिडवून ती म्हणाली, " तुला आई नव्हती— ती आई आतां मिळाली—मुलगा आपल्या घरीं ठेवून घ्यायला आईनं पुढं यायचं नाहीं तर यायचं कुणी ? "

काशिनाथच्या डोळ्यांतून टचकन् दोन आसवें खालीं पडलीं. गहिंवरल्या- मुळें त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना.

सद्गदित कंठानें तो म्हणाला, "आईचा शब्द कसा मोडूं ? शपथच घातली तुम्ही मला. पण अजून संकोच वाटतोय. घरचा अधिकार तुमच्या हाती असला तरी लोक ओळखतात हें शारदाबाईचं घर म्हणून. त्यांची संमति नको का घ्यायला ?"

"तूं होय म्हटलंस, कीं मग मी विचारीन तिला." चंपा डोळे पुसून म्हणाली, "नुसतं तिला कळवायचं एवढंच. तारिणीनंच हा प्रस्ताव केलाय तेव्हां तिच्या संमतीचा आतां प्रश्नच नाहीं. आजच मी या गोष्टीचा निकाल लावून टाकतें."

चंपेनें असें म्हटलें खरें पण शारदाबाईकडे ही गोष्ट कशी काढावी याचीच तिला पंचाईत पडली. काशिनाथचा आणि तिचा परिचय कसा झाला, कुठं झाला, इतकी आपुलकी कां वाटूं लागली, या सर्व गोष्टींचा उलगडा करणें कदाचित अवश्य झालें असतें.

तिची खात्री होती, कीं शारदाबाई असले कांहीं प्रश्न विचारणार नाहीं. तरीही विचारायच्या वेळीं तिनें भीतभीतच तो प्रस्ताव शारदाबाईपुढे मांडला.

शारदाबाई म्हणाली, "घरच्या व्यवस्थेंत मी कधीं मन घातलं नाहीं. घर तुझं आहे. कुणाला ठेवायचं कीं न ठेवायचं हा अधिकार तुझा आहे. मला त्यांत कांहीं विशेष वाटत नाहीं. रहायच्या जागेची मुंबईत आज प्रत्येकाला अडचण भासूं लागलीय हें मी पाहतेंय. एकच कां, अशीं चारपांच माणसं येऊन इथं राहिलीं तरी त्यांना पुरेल इतकी जागा आमच्या इथं आहे. पण हा एकच माणूस येणार आहे म्हणूनच मला थोडासा संकोच वाटतो. माझ्या घरीं एक लग्नाची मुलगी आहे हें विसरली नाहींस ना तूं ?"

"चांगलं ध्यानांत आहे माझ्या." चंपा म्हणाली, "माझ्या मुलीवर माझा विश्वास आहे. चांगली खंबीर आहे आमची मुलगी. खरं म्हटलं तर तिचाच प्रस्ताव आहे हा. आपल्या जबाबदारीची आठवण असल्याशिवाय कांहीं तिनं हा प्रस्ताव केला नसेल ! मग तुलामला संकोच कशाला ?"

दोघींचेंही एक मत झालें आणि दुसऱ्या दिवसापासून काशिनाथ शारदाबाईच्या घरीं येऊन राहिला.

## १७ जिव्हाळा

काशिनाथ शारदाबाईच्या घरीं येऊन राहिला होता तरीही तो एकाद्या भाडेकऱ्याप्रमाणेंच वागत होता. पहिल्या भेटीला शारदाबाईचा परिचय झाला तेवढाच. त्यापलीकडे तो तिच्या बैठकींत बसायला केव्हांच गेला नाहीं. ऑफिसच्या वेळीं तो बाहेर निघून जात असे तो रात्रीं जेवल्यानंतर आपल्या खोलींत येऊन बसे. आल्याबरोबर दाराला कडी लावून घेई. एकाद्या वेळीं केव्हां गांठ पडली तर चंपेबरोबर चार दोन शब्द बोलत असे तेवढाच. तारिणीशीं त्याचें भाषण होत असे काय तें कॉलेजांत. घरीं आल्यावर कुणाही अपरिचिताइतक्याच वृत्तीनें तो तिच्यापासून दूर रहात असे.

या त्याच्या वर्तनाबद्दल चंपेला केव्हां केव्हां वाईट वाटे. तो एक नवें पुस्तक लिहीत आहे हें तिला माहित होतें. त्यासाठींच तो हा एकांतवास पत्करून बसला आहे असा ती समज करून घेत होती.

काशिनाथच्या पुस्तकाबद्दल वर्तमानपत्रांप्रमाणें प्रत्येक वाचकही तोंडफाटेपर्यंत स्तुति करीत होता. ती स्तुति साधार होती. कोणत्याही पुस्तकाला क्वचितच लाभला असेल इतका लोकाश्रय त्या पुस्तकाला मिळाला होता. तीन चार महिन्यांच्या अवधींत त्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघाली.

या पहिल्या पुस्तकाला जी लोकप्रियता लाभली त्यामुळें दुसरें पुस्तक लिहिण्याची जबाबदारी काशिनाथच्या दृष्टीनें वाढली होती. इतर लेखकांशीं स्पर्धा करण्यापूर्वी कुणाही लेखकाला पहिल्यानें स्वतःबरोबर स्पर्धा करावी लागते असें त्याचें म्हणणें होतें. आपल्या पहिल्या पुस्तकापेक्षां आपलें दुसरें पुस्तक जास्त चांगलें निघालें पाहिजे या ईर्ष्येनें तो मांडी मोडून बसला होता. त्यामुळें लेखनापेक्षां चिंतनांतच त्याचा वेळ जास्त जाई. एकदां लिहिलेलें बदलणें किंवा त्यांत खोडाखोड करणें त्याला मुळींच आवडत नसे. म्हणूनच जें लिहायचें तें पूर्ण विचारांतीं ल्याहायचें म्हणून ल्याहायची तयारी झाल्याशिवाय तो ल्याहायला सुरवात करीत नसे. म्हणूनच त्याचा सारा वेळ असा खोलींत कोंडून घेण्यांत जाई.

तारिणी आपल्या अभ्यासांत चूर होती. थीसिस लिहिण्याचें काम तिनेंही सुरू केलें होतें त्यामुळें काशिनाथकडे लक्ष द्यायला तिलाही अवकाश नव्हता.

दोघेंही अशा रीतीनें गुंतून पडल्यामुळें चंपा एकटी पडल्यासारखी झाली होती. तिचा बराचसा वेळ शरयूकडे जात होता. ज्या कारणासाठीं शरयूनें नोकरी पत्करली होती तें कारण आतां नाहींसें झाल्यामुळें नोकरी सोडून देण्याच्या विचारांत ती होती. पण नोकरी सोडल्यावर काय करावें हें तिला निश्चित ठरवतां येत नव्हतें. वाचनाचा हव्यास असला तरी लेखनाची स्फूर्ति तिला होत नव्हती. क्वचित मधून मधून कुठल्या तरी नियतकालिकांतून ती एकाददुसरा टीकाविषयक लेख लिहीत असे पण कसलेल्या लेखकाच्या दृष्टीनें तो कसोटीला उतरला नसता. तिचें तिलाच हें जाणवत असे. म्हणूनच लेखनाच्या बाबतींत ती उदासीन असे.

काशिनाथ शारदाबाईच्या घरीं येऊन राहिल्याचें शरयूला कळलें होतें. ही योजना तिला आवडली नव्हती. पण काशिनाथ कशा रीतीनें वागतो हें चंपेनें ज्यावेळीं तिला सांगितलें त्यावेळीं तेवढया वेळेपुरतें तिचें समाधान झालें. अलिकडच्या तरुणांबद्दल तिनें कांहीं निश्चित मतें करून घेतलीं होतीं. गोपीनाथचा जो अनुभव आला त्या अनुभवाच्या चष्म्यांतून ती इतरांकडे पहात होती आणि त्याच अनुरोधानें आपलीं मतें बनवीत होती. तिच्या ऑफिसांत मुलींबरोबरच बरेचसे तरुणही होते. कॉलेजप्रमाणेंच या ऑफिसांतून देखील मुलींच्या सभोंवार घोंटाळण्याची वृत्ति त्यांच्यांत दिसून येत होती, याचाच तिला तिटकारा येत असे. प्रत्येकाशीं ती अगदीं तुटकपणें वागत असे. त्या बाबतींत पुरुष आणि स्त्री हा भेद तिनें केला नव्हता. ऑफिसांतल्या कुणाही व्यक्तीशीं कोणत्याही प्रकारें स्नेहसंबंध जोडायचा नाहीं असें निश्चित ठरवूनच ती आपल्या कामाला लागली होती.

शरयूचें जीवन अशा प्रकारें अगदीं रुक्ष होऊन बसलें होतें. मनावर झालेला परिस्थितीचा परिणाम तिला निष्क्रिय करायला कारणीभूत झाला होता. तिची आई तिच्या भवितव्याच्या बाबतींत जरी उदासीन नव्हती तरी मुलीची मनोवृत्ति अजमावून तिला कोणत्याच प्रकारचा उपदेश करायला पुढें येत नव्हती.

चंपा तरी तिला काय सांगणार होती !

चंपेच्या पाखरीखालीं असलेल्या या दोन्ही मुली पूर्णपणें आत्मनिष्ठ होत्या. इतर मुलींप्रमाणें त्यांनीं मित्रमैत्रिणी जोडायचा मुळींच प्रयत्न केला नव्हता. वडील माणसांच्या मताप्रमाणें वागायचीही त्यांची तयारी नव्हती आणि वडील माणसेंही त्यांच्या भविष्यकालाबद्दल उदासीन होतीं.

तळमळ होती काय ती चंपेला! पण तिच्या हातीं कोणत्याही प्रकारचा अधिकार नव्हता. वडीलपणाच्या जोरावर कुणावरही सक्ति करण्याची तिला आवड नव्हती. म्हणूनच शरयूच्या बाबतींत काय करावें याची तिला पंचाईत पडली.

त्या दिवशीं मधुकर आणि तारिणी या दोघांचें भांडण झाल्यापासून शारदाबाईच्या बैठकींत बसायला तारिणी कधींच गेली नाहीं. शारदाबाईनेंही तिला बोलावलें नाहीं. पूर्वीप्रमाणेंच मधुकरचे सर्व व्यवहार ठाकठीक स्वरूपांत चालले होते. त्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघाल्याचें कळलें तेव्हां एकदां बैठकींत चर्चा झाली. हा प्रकार कांहींसा सामान्य नव्हता. इतक्या थोडक्या कालांत दुसरी आवृत्ति निघालेलें एकादें पुस्तक होतें कीं नाहीं याची शंकाच होती. म्हणूनच जमलेल्या सर्व मंडळीनीं पुनः एकदां त्या पुस्तकाची तोंडभर स्तुति केली आणि मधुकरनेंही पूर्वीच्या इतक्याच हिरीरीनें त्याला विरोध केला. तो म्हणाला, "असल्याच पुस्तकांची सध्यां चलती आहे. सामान्य माणसाची रुचि कशी बिघडत चालली आहे याचा हा पुरावा आहे. आजपर्यंत रूढ असलेल्या प्रत्येक गोष्टीवर आघात करण्याची जी घातुक वृत्ति या लेखकानं प्रकट केली आहे तिला वेळींच आळा घालणं अवश्य आहे. मला आश्चर्य वाटतं तें हेंच, कीं इतक्या सर्व लोकांना हें पुस्तक इतकं आवडलं कसं? कीं माझ्यांतच कांहीं दोष आहे? इथं चालत असलेल्या चर्चेत आजवर सहसा माझा मतभेद झाला नाहीं, एवढ्याच पुस्तकाच्या बाबतींत कां व्हावा?"

"त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं," शारदाबाई म्हणाली, "तुम्ही स्वतः लेखक असतां तर तुम्हाला या लेखकाबद्दल मत्सर वाटतो आहे असं कदाचित् म्हणतां आलं असतं. पण तसं कांहींच नाहीं. मानवी मनाच्या लहरी मोठ्या विलक्षण असतात. बहुजनांपेक्षां आपलं मत कांहीं तरी निराळं आहे असं प्रस्थापित करावं, अशी बुद्धिमान माणसाची प्रवृत्ति असते. तुम्हीं या पुस्तकाला विरोध करतांहांत हाच या पुस्तकाच्या असामान्यत्वाचा पुरावा आहे. कसंही असो, पण हा लेखक मला भेटला असता तर फार बरं झालं असतं. तुम्ही चौकशी केलीत का त्याच्या प्रकाशकाकडे?"

"हो, केली." मधुकर गालांतल्या गालांत हंसून म्हणाला, "मला एवढंच कळलं, कीं हें कांहीं त्या लेखकाचं खरं नांव नव्हे. त्याचं खरं नांव सांगायला प्रकाशक तयार नाहीं. त्याच्याकडे तो क्वचितच येतो. बहुतेक सारे व्यवहार पत्रद्वारें चालतात. पण एवढं खरं, कीं हा माणूस मुंबईचा रहिवासी आहे."

शारदाबाई म्हणाली, “ मला वाटतं आतां यापुढं गुप्त राहायची कांहीं या लेखकाला जरूरी नाहीं. त्याचीं पूर्वीचीं पुस्तकं आपण पाहिलीं आहेत. तींही आपल्याला आवडलीं होतीं. माझ्या पुस्तकावरची त्याची टीका इतर स्तुतिपाठकाप्रमाणें नुसतीच तोंडदेखली नव्हती. ती जितकी सहृदय होती तितकीच मार्मिक होती. टीकाकाराच्या हातून Creative work समाधानकारक रीतीनं क्वचितच होतं पण हा लेखक टीकाकार या नात्यानं जितका वाकबगार आहे तितकाच नवीन निर्मिती करण्यांतही कुशल आहे, म्हणूनच एकदां त्याची भेट व्हावी अशी मला तळमळ लागलीय. आतां असं करा मधुकर, माझ्या नांवानं वर्तमानपत्रांत एक जाहिरात द्या. या लेखकानं एकदां येऊन मला भेटावं, अवश्य असल्यास एकट्यानंच भेट घ्यावी, अशी एकदां जाहिरात तर देऊन पहा. ”

“ फारच ध्यास लागला आहे तुम्हांला या माणसाचा ! ” मधुकर म्हणाला, “ मोठं आश्चर्य आहे हें ! ”

“ तुम्ही लेखक नाहीं मधुकर ! ” शारदाबाई म्हणाली, “ लेखकाचं अंतरंग मोठं हळवं असतं. आपल्या जातीचा माणूस कुठं न्याहाळला तर त्याची भेट व्हावी, त्याच्याशीं बोलावं, त्याच्याशीं चर्चा करावी, असं जातिवंत लेखकाला वाटत असतं. माझ्या पहिल्या अमदानींत मला जो अनुभव आलाय त्याचीच ही प्रतिक्रिया आहे. एकदां देऊन टाकाच ती जाहिरात. ”

जाहिरात प्रसिद्ध झाली. पण कित्येक दिवस झाले तरी तिचें उत्तर न आल्यामुळें शारदाबाई हताश झाली. चंपेला तें फार जाणवलें. काशिनाथ मुद्दाम कधीं चंपेला भेटत नसे. तो अशा प्रकारें तुटकपणें वागतो याचें चंपेला वाईट वाटे. एके दिवशीं तिनें त्याच्या बंद असलेल्या दारावर मुद्दाम थाप मारली. यापूर्वी तिनें आपणहून त्याची भेट घ्यायचा प्रयत्न कधीं केलेला नसल्यामुळें त्याचें दार ठोठावतांना तिला क्षणभर संकोच वाटला.

दार उघडायला थोडासा उशीर लागला. ती आंत आली तेव्हां काशिनाथ बराचसा अस्वस्थ झाल्याचें तिला दिसून आलें. आंत आल्याबरोबर दार बंद करून घेऊन ती त्याच्या खाटेवर बसली. एक खुर्ची, एक टेबल, एक खाट आणि एक मोठी ट्रंक यांखेरीज कोणतेंच सामान त्या खोलींत नव्हतें. भिंतीला असलेल्या लांकडी रॅकवर बरीचशीं पुस्तकें होतीं. चंपा आंत आली त्यावेळीं टेबलावर एकही कागद नव्हता, शाईदौत नव्हती कीं फाउंटनपेनही नव्हतें.

लिहित असलेले कागद दृष्टीआड करण्यासाठींच त्याला दार उघडायला वेळ लागला असावा असें चंपेला वाटलें.

चंपा आंत येऊन बसली तेव्हां तो म्हणाला, " कांहीं तसंच जरूरीचं काम आहे का ? "

" असं कां वाटलं तुला ? कांहीं कामांत होतास का ? तुझ्या कामांत व्यत्यय आला का मी आल्यामुळं ? "

" नाहीं—तसं कांहीं नाहीं. मी अगदीं सहज विचारलं. यापूर्वी कधींच तुम्हीं आंत आलां नव्हतां—"

बोलत असतांना तो थांबला. त्याची स्वाभाविक वृत्ति जागी झाली. भित्रेपणानें उचल खाल्ली. तो घाबराघुबरा झाल्यासारखा दिसला.

चंपा हंसली आणि म्हणाली, " आतां हा तुझा घाबरट स्वभाव जाणार तरी केव्हां ! आतां इथं कांहीं तुझी मामी नाहीं. इथं तरी कुणाला भ्यायला नको. "

" असं कसं म्हणतां ! शारदाबाई आहेत ना ? "

" पण शारदाबाई म्हणजे तुझी मामी नव्हे ! ती तुझ्याकडे कधीं ढुंकूनसुद्धां पहात नाहीं. तारिणी कांहीं तुझ्या वाटेला जात नाहीं. तुझी चौकशी करणार तेवढी मी—अन् मीही कांहीं तुझी मामी नव्हे. आई आहें. होय ना ?—" तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून चंपा पुढें म्हणाली, " बोलत कां नाहींस ? मी तुला माझा मुलगा म्हणतें पण तूं कांहीं मला अजून आई म्हणत नाहींस. माझा जीव तुझ्यासाठीं तळमळतो पण तुला कांहीं तसं वाटत असल्याचं दिसून येत नाहीं. उगीच ओढून ताणून कुठंतरी नातं जोडावं म्हणून कांहीं मी तुला माझा मुलगा म्हटलं नाहीं ! कांहींसुद्धां कारण नसतांना माझं मन तुझ्या-कडे ओढलं म्हणून मी तुला माझा मुलगा म्हटलं. कांहीं कारण असतं, त्याला अनुसरून स्वार्थानं मी तुझ्याशीं नातं जोडलं असतं, अन् मग तूं अशी उपेक्षा केली असतीस तर तें योग्य झालं असतं. मला तुझ्यापासून कांहीं मिळवायचं नाहीं. तुला उणीव असलेल्या आईच्या जिव्हाळ्यापेक्षां तुला जास्त कांहीं द्यावं अशीही माझी इच्छा नाहीं. मग कां असा फटकून वागतोस माझ्याशीं ?—" तिचे शेवटचे उद्गार अगदीं काकुळतवाणीचे होते.

ते उद्गार ऐकून काशिनाथच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें. तोंड फिरवून डोळे पुसून तो म्हणाला, " मला क्षमा करा. माझी चूक झाली. मला

ही मोठी वाईट संवय जडून गेलीय. मामाच्या घरीं मी असाच एकलकोंडा रहात असें. पंक्तीवरसुद्धां मी कधीं बोललों नाहीं. कुणी विचारल्याशिवाय कधीं मुद्दाम होऊन कुणाशीं भाषणाचा प्रसंग आणला नाहीं. ती संवयच जडून गेलीय मला. वात्सल्याचा मला अनुभव नाहीं—तुम्हाला आहे. वात्सल्याच्या मोबदल्यांत काय केलं पाहिजे याची मला कल्पनाच नाहीं—"

"मग असा प्रसंग तुझ्या एकाद्या कथानकांत आला तर तो तूं कसा चितारशील ?"

"अगदीं तसंच झालंय !" काशिनाथच्या निर्विकार चेहऱ्यावर थोडेंसें हसूं झळकलें. तो म्हणाला, "नुकताच अगदीं तसंच लिहीत होतों. पण त्या प्रसंगांत थोडा फरक आहे. त्यांतल्या व्यक्तीला मी दोन प्रकारच्या ओढींत गुंतवलंय. स्वार्थापायीं त्याला उपकारबद्ध करणारे त्याचे नातेवाईक एका बाजूला खेंचतात आणि अकृत्रिम वात्सल्यानं त्याला आपला मुलगा म्हणणारा एक जन्मभर ब्रह्मचारी असणारा म्हातारा दुसऱ्या बाजूला खेंचीत असतो. त्या म्हाताऱ्याचे उद्गार मी आतां लिहीत होतों. आणि आश्चर्य हें, कीं ते उद्गार आतां तुम्ही बोललां तसेच आहेत—अगदीं तेच आहेत म्हणाना. माझ्या त्या कथानकाचा नायक त्या म्हाताऱ्याची उपेक्षा करून रक्ताच्या नात्याची ओढ धरून आपल्या नातेवाईकांबद्दल जो अभिमान बाळगतो तो पाहून त्या म्हाताऱ्याला झालेल्या मरणप्राय दुःखाचं वर्णनच मी आतां करीत होतों—" क्षणभर थांबून अत्यंत केंविलवाण्या मुद्रेनें चंपेकडे पाहून तो म्हणाला, "मला क्षमा कर आई, मी महान अपराधी आहें. माझं मलाच कळत नव्हतं. मला काय वाटत होतं तें तूं मला दाखवून दिलंस.—" असें म्हणून त्यानें तिच्या पायावर आपलें मस्तक ठेवलें.

तिनें त्याला वर उचलून आपल्या शेजारीं बसवलें आणि त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हटलें, "तारिणी माझी मुलगीच—पण तिला बाळपणांतच म्हातारपण आलेलं. मला हवं होतं नें मूल तसलं नव्हे. असं थोडंसं डिवचलं तर टप्कन् डोळयांत टीप आणणारं मूल हव होतं मला. तूं तसा आहेस असा माझा समज होता पण दूर दूर रहात होतास माझ्यापासून. आतां जवळ आलास—अगदीं अगदीं जवळ आलास असं वाटलं मला. आतां तें आपल्या मामाचं घर विसरून जा. कधीं सुद्धां मनांत आणू नकोस तें—" बोलतां बोलतां तिचा गळा दाटून आला. जिभेवरचे शब्द तिथल्या तिथेंच राहिले.

थोड्या वेळानें डोळे पुसून चंपा हंसून म्हणाली, " असं लिहीत होतास एकूण ? हे आपलं सहज सुचलं तुला, कीं आजच्या परिस्थितीचं चित्र कुठं-तरी त्या कथानकांत गुंतवावं म्हणून लिहीत होतास तसं ? "

" छे: छे: मुळींच नाहीं ! " काशिनाथ म्हणाला, "अगदीं ओघाओघानंच आलं तें कथानक—अगदीं माझ्या नकळत आलं. जाणिवेपलीकडे कुठंतरी दडून राहिलेली जागृति असेल, तर ती कांहीं माझ्या ध्यानीं आली नव्हती. माझी पद्धत अशी आहे,—कांहीं स्वभावचित्रांची कल्पना करायची, त्यांना कांहीं विशिष्ट प्रसंगांतून खेळवण्याची आंखणी करायची अन् मग लिहायला सुरवात करायची. कथानकाचा माझा सांगाडा कायम राहिला, तरी लिहीत असतांना माझ्या नकळत, अगदीं साहजिकपणें, नवे नवे तपशील उत्पन्न होतात. अन् मग माझं मलाच आश्चर्य वाटतं. तसंच आतां वाटतंय या प्रसंगाबद्दल. तूं बोलल्यानंतर वाटतंय—त्यापूर्वी मला त्याची जाणीवसुद्धां नव्हती—"

" आता पुरे." चंपा त्याचा हात धरून म्हणाली, "आतां एक सांगायचंय तुला—ती जाहिरात पाहिलीस शारदाबाईची ? "—त्यानें मानेनें होकार दिला त्यावेळीं ती पुढें म्हणालीं,—" त्या बाबतींतच बोलायला आलेंय मी. मला वाटतं, आतां जास्त ताणून धरूं नकोस. तिला कळलं पाहिजे कीं तूंच तो म्हणून. फार तळमळ लागलीय तिला. सारखी तेंच तेंच बोलत असते माझ्याजवळ—" त्याच्या नजरेला नजर देऊन अधिकारपूर्ण वाणीनें ती म्हणाली, " मी आतां तिची न् तुझी ओळख करून देणार आहें. नाहीं म्हणायचं नाहीं—ऐकलंस ? नाहीं म्हणायचं नाहीं !—आईचा हुकूम अगदीं मुकाट्यानं पाळायचा ! कुणीं सांगावं, कदाचित् यांतूनच तुला आणखीही एक आई मिळेल ! मोठा भाग्य-वान आहेस तूं काशिनाथ ! "

काशिनाथच्या डोळ्यांतून आसवें झिरपूं लागली. त्याचें ऊर भरून आलें होतें. तोंडावाटे शब्द बाहेर उमटत नव्हते. मोठ्या कष्टानें मन आवरून तो म्हणाला, " जशी तुझी आज्ञा ! "

" मग आतांच घेऊन येतें तिला ! " असें म्हणून चंपा एकदम उठून दरवाजा उघडून निघून गेली.

ताठरल्यासारखा होऊन काशिनाथ तिथेंच बसून राहिला होता. तो अगदीं सुन्न झाला होता. त्याची जाणिव पंगू पडली होती. त्याला वाटलें, आपल्या मनाच्या विरुद्ध गोष्टी घडूं लागल्या आहेत. त्यांना विरोध करणें आतां आपल्या हातीं राहिलें नाहीं.

उभ्या आयुष्यांत त्यानें असा प्रसंग कधींच अनुभवला नव्हता. त्याच्या मामानें त्याला लोभानें वागवलें होतें खरें पण तो लोभ पुरुषी होता—आईच्या हृदयाच्या ओलाव्यांतून निघणारे वात्सल्याचे उद्गार त्यानें स्वतःच्या कानानें कधींच ऐकले नव्हते. त्या वात्सल्याची त्याला कल्पना होती. त्या वात्सल्याची काल्पनिक चित्रें त्याच्या लेखनांत आलीं होतीं. ती कल्पना अवास्तव नव्हती असें जेव्हां त्याला आतां दिसून आलें, तेव्हां तो स्वतःवरच खूष झाला. मनाला आलेला अवसाद झाडून टाकून शारदाबाईची भेट घ्यायला तो मन घट्ट करून तयार झाला.

चंपेबरोबर शारदाबाई आंत आली. ती आंत येतांच त्यानें तिच्या पायांवर आपलें मस्तक ठेवलें. त्याच्या डोळयांतल्या आंसवांनीं आपले पाय भिजल्याची जाणिव झाली तेव्हां शारदाबाईनें त्याला वर उचलून उभा करून म्हटलें, "कोण आहेस तूं मुला?"

"यांनीं सांगितलं नाहीं?" तो तोंडांतल्या तोंडांत पुटपुटला.

"नाहीं!" चंपा म्हणाली, "अजून मी सांगितलं नाहीं तिला. आतां सांगतें. पाहिलंस? ज्या पुस्तकानं तुला वेड लावलं त्याचा लेखक तोच हा काशिनाथ."

"खरंच!" असें म्हणून शारदाबाईनें त्याच्या दोन्ही गालांवर आपलें दोन्ही हात ठेवून त्याला निरखून पहायला सुरवात केली.

सारखी नजरेला नजर भिडवून ती त्याच्याकडे पहात होती. डोळयांवाटे त्याच्या अंतरंगांत शिरून तिथला ठाव घेत होती. पहातां पहातां शारदाबाईचे डोळे पाण्यानें भरून आले. सद्गदित कंठानें ती म्हणाली, "शेवटीं माझा वारस मला मिळाला!—घरीं बसून त्रिखंडांत धुंडीत होतें, पण माझा वारस, माझा मुलगा माझ्याच घरीं होता हें कांहीं मला कळलं नाहीं. कां असा लपून राहिलास रे?"

"अगदींच भित्रा आहे तो!" चंपा उद्गारली, "मोठा आदर आहे त्याला तुझ्याबद्दल—"

"तें माहीत आहे मला—" शारदाबाई म्हणाली, "तें दिसतंच आहे त्याच्या लेखांतून. या उभ्या महाराष्ट्रांत एकाच माणसानं ओळखलं होतं मला—तो शेवटीं मला सांपडला!—माझ्याच घरीं सांपडला! एकदां डोळे भरून पाहून घेऊं दे तुला. ये, बैस असा इथं."

शारदाबाई खाटेवर बसली. तिनें त्याला आपल्याजवळ बसवून घेतलें. किती वेळ तरी त्या तिघांच्याही तोंडून शब्द बाहेर फुटला नाहीं.

तें मौन मोडण्यासाठीं चंपा आपला आवेग गिळून म्हणाली, "मोठं विलक्षण आहे याचं चरित्र. मी सांगेन तुला तें सावकाश. एकच सांगायचंय मला, मी त्याला वचन दिलंय, अजून उजेडांत यायची इच्छा नाहीं त्याची—"

"वेडा आहेस!" शारदाबाई त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत मोठ्या प्रेमळपणानें हंसत म्हणाली, "वेडा आहेस बेटया! आतां कशाला लपून राहायचं? मी सुद्धां अशी लपून राहिलें होतें—पण माझी परिस्थिती मोठी विलक्षण होती—"

"तसंच आहे त्याचं बहुतेक!" चंपा म्हणाली, "फारसा फरक नाहीं त्याच्या न् तुझ्या चरित्रांत. फरक एवढाच, कीं तुला एक चंपा लवकर मिळाली, त्याला ती मिळायला जरा उशीर लागला!" असें म्हणून ती मोठमोठ्यानें हंसत सुटली.

काशिनाथला अजून बोलायचा धीर होत नव्हता. लेखिका या नात्यानें शारदाबाईबद्दल त्यानें एक कांहींतरी कल्पना रेखून ठेवली होती. या घरीं तो राहायला आला त्यावेळीं त्यानें तिला नुसतें पाहिलें होतें. लेखक या नात्यानें एकमेकांची एकमेकांशीं ओळख पटली नव्हती. आतां ती ओळख पटली त्यावेळीं तें कल्पनाचित्र त्याच्या समोर उभें राहिलें. आपण काढलेलें तें चित्र मुळापेक्षां सुद्धां किती ठेंगणें होतें याचा त्याला प्रत्यय आला. त्याला वाटलें, शारदाबाईच्या जागीं हा पुरुषलेखक असता तर असेंच झालें असतें का? वारसाच्या शोधांत असलेल्या पित्याच्या जिव्हाळ्यापेक्षां पुत्रेच्छेनें तळमळणाऱ्या मातेचा जिव्हाळा वेगळा असतो का?

तो म्हणाला, "आजचा दिवस मोठा भाग्याचा आहे. माझ्या इच्छेविरुद्ध या माझ्या आईनं हा माझ्यावरचा बुरखा काढला. खुषीनं मी कबुली दिली नाहीं—पण आतां वाटतं, आईला जाणवलं ते मुलाला जाणवलं नाहीं. माझ्या आईची मला ओळख झाली नाहीं. आई म्हणजे काय तें मला माहित नव्हतं. मी कल्पना करीत होतों. तें कल्पनेचं चित्र असं वास्तवांत आलेलं पाहून क्षणभर माझं भान हरपलं. आतां वाटतं, ती माझी कल्पनासुद्धां कितीतरी अपुरी होती. दोनच शब्दांत मला तीन त्रिभुवनं सांठवलेलीं दिसलीं. काय वाटतंय मला हें कोणत्या शब्दांनीं सांगूं? सारखं बोलत सुटावंसे वाटतंय मला. जन्माचा उपास

पडला होता मन खुलं करून बोलायचा, तें पारणं आज फिटलं. असं वाटतंय कीं याच वेळीं मृत्यू येईल मला!—"

दोघींनींही एकाच वेळीं त्याच्या तोंडावर हात ठेवला.

" असं बोलूं नये वेड्या मुला ! " शारदाबाई म्हणाली.

" काय वेडा आहेस रे ! " चंपा उद्गारली.

दोघींचेही हात त्याच्या पाठीवर होते. दोघीही त्याला कुरवाळीत होत्या. दोघीही डोळे भरभरून त्याला पाहून घेत होत्या—

इतक्यांत तारिणी येऊन दारांत उभी राहिली. तें विलक्षण दृश्य पाहून तिला धक्का बसल्यासारखें झालें.

तिला वाटलें, आईलासुद्धां कळलें तर !

हंसत हंसत ती पुढें आली.

## १८ उघाडी

तारिणी समोर येतांच दोघीही दचकल्या. तारिणीची भीति वाटायला तिच्या या वडील माणसांना कांहीं कारण नव्हतें खरें, पण या कामीं आपला कसला तरी दुबळेपणा तारिणीच्या नजरेला आला हें बरें झालें नाहीं, असें त्यांना वाटलें असावें.

" एकूण तुला त्या पुस्तकाचा लेखक सांपडला तर आई ! " तारिणी हंसत हंसत म्हणाली, " किती घाई झाली होती तुम्हां लोकांना ? कुठलीं रत्नं कुठल्या उकिरड्यांत पडलेलीं असतात याचा पत्ता आकाशाकडे डोळे लावणारांना सांपडत नसतो. तुम्हा कुणाला अभिमान नको हा. हा पत्ता लावल्याचं श्रेय मला आहे ! "

" बरं—बरं ! " चंपा हंसून म्हणाली, " तुझं श्रेय मला कांहीं हिरावून घ्यायचं नाहीं. काय बक्षिस पाहिजे तुला याबद्दल ? "

" आजच कांहीं बोलत नाहीं मी." तारिणी म्हणाली, " बक्षिस मागायची वेळ येईल तेव्हां मात्र मागं हटूं नको म्हणजे झालं. "

त्यांचें हें बोलणें चाललें असतांना काशिनाथ घाबराघुबरा झाला होता. प्रेमळ कुटुंबाचें वातावरण त्याच्या परिचयाचें नव्हतें. हें काय चाललें आहे, कोणत्या उद्देशानें तारिणी त्यांना छेडते आहे, याची नीटशी कल्पना त्याला आली नाहीं. खाटेवरून उठून तो टेबलाला टेकून उभा राहिला आणि तारिणीला बसण्यासाठीं त्यानें नुसती हातानें खूण केली.

आपल्या आईच्या शेजारीं बसत असतांना तारिणी म्हणाली, "काय गंमत आहे पहा, माझंच स्वागत करताहेत हे माझ्याच घरांत! म्हणजे ही खोली माझी म्हणत नाहीं मी—ही खोली यांचीच आहे खरी, पण एक दिवस तरी कधीं मला या म्हणायचं होतं यांनीं इथं! कांहीं गृहस्थपणा म्हणून आहे ना!"

शक्य तेवढें अवसान आणून काशिनाथ म्हणाला, "गृहस्थ कुठंय मी? आजवर मामांचा आश्रित होतों, आतां तुमचा आश्रित आहें. गृहस्थपणाचा अनुभवच जिथं आला नाहीं तिथं वागायचं कसं गृहस्थासारखं?"

"बराच धीर केलात म्हणायचा!" तारिणी म्हणाली, "गृहस्थपणाचा अनुभव नसला तरी खूपखूप गोष्टी लिहिल्यायत तुम्ही आपल्या पुस्तकांत या गृहस्थापणाबद्दल—"

"नाहीं—" काशिनाथ उद्गारला, "मी लिहिलंय तें माणुसकीबद्दल. गृहस्थपणाबद्दल नव्हे. गृहस्थपणा आणि माणुसकी यांच्यांत पुष्कळच फरक आहे असा माझा समज आहे."

"कसला फरक आहे?" तारिणीनें विचारलें.

एक क्षणभर थांबून काशिनाथ म्हणाला, "गृहस्थपणा म्हणजे शिष्टाचार. अन् माणुसकी म्हणजे—" पुनः तो क्षणभर थांबला आणि म्हणाला, "माणुसकी म्हणजे माणुसकी—गृहस्थपणाच्या ढोंगाखालीं जगाला ने फसवण्याची वृत्ति."

"ऐक आई," तारिणी म्हणाली, "पाहिलंस हा तुझा शिष्य कसा तुझ्यासारखाच बोलतोय! तुझ्यासारखा म्हणजे तूं बोलतेस तसा नव्हे, तूं लिहितेस तसा."

"म्हणजे?" शारदाबाई खोट्या रागाचें अवसान आणून म्हणाली, "मी बोलतें निराळी अन् लिहितें निराळी असं का तुला म्हणायचंय कार्टे?"

"तें काय तें तुझं तूंच पहा." तारिणी म्हणाली, "मला कांहीं त्यांत कळत नाहीं. मला जें वाटलं तें मी बोलून गेलें. अगदीं स्वाभाविक उद्गार

होता तो माझा. झोंबला असेल तुला तर तुझा तूं पडताळून घे. तुझीच मुलगी आहें मी. कुणाला भ्यायची नाहीं खरं बोलायच्या कामीं ! "

चंपा मधेंच म्हणाली, " हें पहा काशिनाथ, हें कांहीं कानावर घेऊं नकोस तूं. आज तारिणीला नवी स्फूर्ति आलीय. मला नाहीं वाटत कीं यापूर्वी इतक्या खुलेपणानें ही आपल्या आईशीं बोलली होती म्हणून. हा सगळा तुझा पायगूण दिसतोय मला. सरळ मनाचीं माणसं कुठल्याही वातावरणांत गेलीं तर तेढं वळणसुद्धां कसं सरळ करून दाखवतात याचा पुरावा पाहिला आज मी."

" असं झालंय खरं." तारिणी म्हणाली, " खरोखरच असं कधीं बोललं नव्हतें मी माझ्या आईला. तसं पाहिलं तर मी कधीं बसलें होतें तिच्याबरोबर बोलत ? ती गुंतलेली असते आपल्या लिहिण्यांत किंवा काथ्याकूट करण्यांत. तो काथ्याकूट कांहीं मला आवडत नाहीं. केव्हां केव्हां त्या मेळाव्यांत मी बसतें पण तिथं खरं बोलायची सोय नाहीं. परवां सहज कुठं खरं बोलायचा प्रयत्न केला तर केवढं वादळ उठलं !—"

" ती मात्र चूक झाली तुझी." शारदाबाई म्हणाली, " त्याला स्वार्थी म्हटलंस, आपमतलबी म्हटलंस—असा आरोप त्याच्यावर करायचा काय आहे पुरावा तुझ्याजवळ ? "

तारिणीनें एकदां चंपेकडे पाहिलें आणि एक मोठा सुस्कारा सोडून म्हटलें, " खरं बोलायची सोयच नाहीं या जगांत. आतां मी सरळ सरळ विचारलं आईला तर काय सांगेल ती ? तूंच सांग ना, कशाला येतोय हा मधुकर इथं ? आजवर तूं सारे व्यवहार पहात होतीस—काय बिघडलं होतं त्यांत ?--केवढ्या कुशलतेनं त्यानं तुम्हा दोघींनाही नकळत—होहो !—तुम्हा दोघींनाही नकळत आईचे सारे व्यवहार आपल्या मुठींत घेतले ? काय करतां आलं तुम्हाला त्या बाबतींत ? आज त्यानं अडवलं तर आई पेंचांत येईल. तोच झालाय इथला कर्ता माणूस. कां त्यानं हा असा डाव टाकलाय ? आईच्या व्यवहारांत तो एक पैचीसुद्धां अफरातफर करीत नाहीं. आज त्याला स्वतः नोकरी करायची जरूरी आहे, तशी कांहीं नोकरी न करतां तो काय म्हणून तुझ्यासाठीं एवढा खपतोय !—"

" निःस्वार्थबुद्धी कुठं नसतेच का या जगांत ? " शारदा उद्गारली, " माझ्याबद्दल त्याला जो एक आदर वाटतोय त्यासाठीं निःस्वार्थबुद्धीनं तो खर्ची पडतोय असं कां म्हणूं नये मी ? "

" तुला वाटेल तें तूं म्हण—" तारिणी म्हणाली, " मला विरोध करायचा नाहीं कीं वादही घालायचा नाहीं. असा एक प्रसंग येईल, कीं त्यावेळीं पुराव्यानिशीं मी तुम्हा दोघींना पटवून देईन, कीं तो माणूस नुसता स्वार्थीच नव्हे तर पक्का लुच्चा आहे !—"

" हं हं तारू ! " शारदाबाई तिला दटावून म्हणाली, " याच्यासमोर तरी असलं कांहीं बोलूं नकोस. उगीच कुणाचा कुणाबद्दल गैरसमज करून देणं बरं नव्हे. उतावीळपणा आहे हा तुझा. कार्यनाश होतो असल्या या उतावीळपणामुळं. "

" राहिलं ! " तारिणी रुसल्यासारखें करून म्हणाली " तुला पटत नसलं तर मी बोलत नाहीं. पण मला मधुकरबद्दल काय वाटतं हें मी तुला वेळींच सांगून टाकलं—अगदीं त्याच्यासमोर—चारचौघांसमोर ! अन् हें आतांसुद्धां तितक्याच कडकपणानं सांगतेंय तुला—"

" कांहीं सांगूं नकोस मला. " शारदाबाई म्हणाली, " जाऊंदे तें. आतां असं कर, आजचा दिवस आपण साजरा करूं. हें नवं दालन उघडलंय आपण या आमच्या घरांतलं. माझ्यासारखी तूंही एक लेखिका होशील अशी आशा होती मला—तसं थोडंबहुत तूं लिहिलंयस देखील—पण आतां तुला हें पदव्यांचं वेड लागलंय. एकदां लिहिण्याची संवय गेली, कीं माणसाला निश्चित लेखन करतां येणं मोठं अशक्य होतं. शैलीसुद्धां बिघडते त्यामुळं. म्हणूनच हा एक लेखक सांपडला त्याचा मला आनंद झाला. आतां चहा करायला सांग. आजचा दिवस आपण इथंच चहा घेऊं. "

" मी चहा घेत नाहीं ! " काशिनाथ घाबरटपणें पुटपुटला.

" चहा घेत नाहीं ? " तारिणी उद्गारली, " लेखक चहा घेत नाहीं ! मोठं आश्चर्य आहे म्हणायचं हें ! "

" तसा कांहीं विरोध नाहीं माझा चहाला—" काशिनाथ म्हणाला, " चहा मिळाला असता तर मी एकदांच का—पंचवीस वेळ घेतला असता. सुखासमाधानं जेवायला मिळायचीच जिथं मुष्कील होती तिथं उठल्यासुटल्या कुणाकडे चहा मागणार होतों ? लिहितांना थकवा वाटे, ग्लानीसुद्धां येई—कुणी लिहितांना चहा घेतात, कुणी विड्या सिगरेट्स् ओढतात—मला सुद्धां वाटे, तसं कांहीं विरंगुळ्याचं साधन हातीं घ्यावं—" एक मोठा सुस्कारा सोडून तो म्हणाला, "—पण तसं कांहीं केलं असतं तर मी कर्जबाजारी झालों असतों.

उठल्यासुठल्या चहा घेण्यासाठीं मी दुकानांत धांवलों असतों तर विक्षेप झाला असता लेखनांत. सिगारेट्स् घ्यायला पैसे होते कुठं ! सिगारेट्स् ओढीत बसलों असतों तर वाभाडे काढले असते माझे माझ्या मामीनं. परावलंबी जिणं ज्यानं अनुभवलं नाहीं त्याला कळायच्या नाहींत त्या यातना—"

"त्या यातनांनींच दृष्टि दिली तुला." शारदाबाई म्हणाली, "दुःख सोसल्याशिवाय, दारिद्य अनुभवल्याशिवाय, दुःखदारिद्याच्या यातनांनीं अंतःकरण पिळवटून निघाल्याशिवाय जिवंत वाङ्मय निर्माण होत नसतं."

"टाळ्या !" टाळ्या पिटीत तारिणी उद्गारली.

"तुला झालंय काय आज तारु ?" चंपा रागारागानें म्हणाली, "पुरुष असतीस तर निशापाणी करून आलीयस असं म्हटलं असतं. अगदींच ताळ सुटलाय तुझा आज. काय झालंय असं ?"

एक हात चंपेच्या गळयाभोंवती टाकून ती म्हणाली, "या लेखकाचा पायगुण आहे हा. आजवर बंद होती ही खोली. कोंडून बसले होते हे राजेश्री. आज यांचा बंदिवास संपला म्हणून मला आनंद झालाय—त्या आनंदाचा कैफ चढलाय मला."

"कसं का होईना, हा बदल झालेला मला आवडला. इतक्या वर्षांनंतर आज घरच्या लाडक्या मुलीसारखी वागतेयस तूं. बोर्डिंगांतल्या विद्यार्थिनीसारखी या घरांत वावरत होतीस, तें पटत नव्हतं मला.—रुचत तर मुळींच नव्हतं. आतां अशीच जरा माणसांत ये. तूं हिची मुलगी आहेस याची आठवण होऊं दे हिला. विसरून गेलीय ती. माझीच चूक आहे ती—पण मी तरी काय करणार होतें ? आपल्या पोराला टाकून आई आपल्याच नादांत कुठं तरी घुमूं लागली तर कुणी तरी प्रतिपाळ केला पाहिजे होता ना त्या पाडसाचा ? म्हणून गुन्हा घडला तो माझ्याहातून ! पण आतां आपण या आजवरच्या रीतींत बदल करूं या. नुसतं खोलीचं दार उघडून भागायचं नाहीं, घरांत घेतलं पाहिजे या नव्या लेखकाला—"

"छेः छेः भलतंच कांहीं तरी !" काशिनाथ मधेंच ओरडला.

"एवढं घाबरायला काय झालं ?" तारिणीनें विचारलें, "हें कांहीं तुमच्या मामाचं घर नाहीं. इथं गड्या माणसासारखं कुणी राबवायचं नाहीं तुम्हांला.'

"तसं नव्हतं माझं म्हणणं—" काशिनाथ काचरत काचरत म्हणाला "तसा आपला कुणाचा जवळचा संबंध नाहीं—"

" मुलगा ना तूं माझा ? " चंपा हंसत हंसत पण थोड्याशा दटावणीच्या स्वरांत म्हणाली, " असला कसला रे तूं मुलगा ? कीं आपलं नुसतं मी म्हणायचं अन् तूं ऐकायचं ? मी म्हटलं तें नुसतं तोंडापुरतं होतं असं का वाटलं तुला ? कीं माझा मुलगा म्हणवून घ्यायला लाज वाटते ? "

" छे, छे, मुळींच नाहीं ! " काशिनाथ गंभीर होऊन म्हणाला, " असं उगीच कांहीं म्हणूं नका ! मी सांगितलं ना, कीं आपल्याच सावलीला भीत असतों मी. आपलेपणाच्या भावनेला मी आजवर पारखा होतों. उभं आयुष्य काढलं तिथं, पण तें घर माझं आहे असं कांहीं मला वाटलं नाहीं. आश्रितपणा जाणवत होता — तो परिणाम राहिलाय मनावर — म्हणून मी तसं म्हटलं. "

" मग आज संध्याकाळपासून खाणावळींत जेवायला जायचं नाहीं. " तारिणी टेबलावर जोरानें हात मारून म्हणाली, " कसं आई ? "

" मला काय विचारतेस ? " शारदाबाई म्हणाली, " या जेवणाखाण्याचा माझा काय संबंध ? ही आहे अन् हिचा हा मुलगा आहे—त्यांची तीं पाहून घेतील. तुला तरी कशाला त्या उठाठेवी ? "

" हें काय बोलणं झालं ? " तारिणी म्हणाली, " मी कोणच नव्हे का या घरांत ? इथं कांहींच अधिकार नाहीं का मला ? "

" आहे की ! " चंपा म्हणाली, " जेवायखायचा, जरूरी पडेल तेव्हां पैसे मागायचा अन् वेळीं अवेळीं मला छळायचा—त्याच तुझ्या अधिकाराखालीं बेजार झालेंय मी. म्हणूनच एक मुलगा हवाय मला. हा संसाराचा भार तेवढा तरी हलका होईल. "

थोडा वेळ कुणीच बोललें नाहीं पण तितक्यांत एकदम तारिणी मोठमोठ्यानें हंसूं लागली. हंसत हंसत ती म्हणाली, "काय झालंय आज हें ! कसं बदलून गेलंय सारं वातावरण ! आपण अशीं कधीं गंमतीगंमतीनं बोलत बसल्याचं आठवतं का तुला आई ? केवढा चमत्कार झालाय हा. एक अडगळीची खोली होती इथं, माणसासारखा दिसणारा एक प्राणी त्यांत येऊन राहिला, त्यानं कैद्यासारखं कोंडून घेतलं स्वतःला कांहीं दिवस,—एक दिवशीं माईनं त्या खोलीचा दरवाजा उघडला अन् त्या खोलींतल्या प्राण्यानं काय त्या खोलींत सांठवून ठेवलं कोण जाणे, त्या हवेनं सर्वांच्या प्रकृति एकदम बदलून गेल्या. नाहीं आई ? नाहीं पंत ? "

" हें पहा, " काशिनाथ पहिल्यानेंच हंसून म्हणाला, " तें कॉलेजांतलं पंतबिंत कांहीं आणूं नका इथं. "

" हें पहा, " तारिणी गंभीर होऊन म्हणाली, " तें कॉलेजातलं अहोजाहो कांहीं आणूं नका इथं या घरांत. "

एक क्षणभर विचार करून काशिनाथ म्हणाला, " छेः छेः तें कसंसंच वाटतं अगदीं ! तसं कसं म्हणूं ? नुसतंच 'तारिणी' कसं म्हणूं ? "

" आतां हें म्हटलं तसं ! " तारिणी हंसून म्हणाली, "नुसतं तारिणीच कां, आई म्हणते तसं ' तारू ' म्हणायला लागाल उद्यांपासून. तेवढी तयारी केली पाहिजे मनाची. आजवर पांघरलेला हा बुरखा एकदा फेंकून दिला, मोकळ्या मनानं इथं वावरायला सुरवात केली, तर काय वाटेल तें म्हणायला लागाल उद्यां मला ! "

" आतां हें पहा, अहोजाहो टाकायला मला सांगितलं पण स्वतः कांहीं तें सोडलं नाहीं. हें बरं दिसतं का आई ? "

" अर्थात नाहीं. " चंपा म्हणाली, " नुसतीं चिकटवून नातीं लावायचीं नाहींत, अगदीं खरोखरच मुलासारखं वागलं पाहिजे या घरांत तुला, तरच तुला इथं राहूं देईन ! बरं बरं—पहा बरं तारू, चहा झालाय कीं काय तो ! आज चहा घ्यायची दीक्षा दिली पाहिजे या पोराला. "

" छेः छेः ! " काशिनाथ उद्गारला.

" आतां पुरे झालं हें छेः छेः—" चंपा म्हणाली, " छेः छेः नाहीं न् काहीं नाहीं—आजपासून चहा घ्यायची सुरवात केली पाहिजे. अन् हें पहा तारू, कॉलेजांतसुद्धां हा चहा घेतो कीं नाहीं तें बघत जा वेळच्या वेळीं. "

" अन् सिगरेटसुद्धां ओढायला लावणार आहेस कीं काय याला ? " तारिणीनें विचारलें.

" अर्थात् ! " चंपा म्हणाली.

" छेः छेः ! " काशिनाथ उद्गारला.

" छेः छेः काय ! " तारिणी म्हणाली, " तें मर्दाचं लक्षण आहे. चहा पीत नाहीं, सिगरेट ओढीत नाहीं, तो मर्दच नव्हे ! "

" हीच का तुझी मर्दाची व्याख्या ? " शारदाबाई म्हणाली, " बाकी काशिनाथला आतां काय कमी आहे म्हणा ! एवढी मोठी ही गडगंज असलेली आई मिळालीय त्याला—"

" अन् तूं नाहीं वाटतं ? "—चंपा म्हणाली, " तसं पाहिलं तर तूं न् मी कांहीं दोन नाहीं. त्यांतून तूं याला आपला वारस म्हटलंयस—"

" वाङ्मयीन वारस ! " शारदाबाई म्हणाली.

" कुणी सांगावं—" तारिणीला डोळा घालून चंपा उद्गारली, " या लेखकाच्या जातीची कशी लहर फिरेल तें सांगतां यायचं नाहीं. "

चहा घेऊन तारिणी आली. हातीं पेला धरून चंपेनें तो काशिनाथच्या तोंडाला लावला. लहान मुलाला औषध पाजतात तशा थाटानें कप खाली होईपर्यंत ती त्याला एक एक घोट घ्यायला लावीत होती. तें पाहून तारिणीला हंसण्याच्या उकळ्यावर उकळ्या येऊं लागल्या. चहा घेतां घेतां तिला अळसूदसुद्धां गेलें तेव्हां चंपा म्हणाली, " वर पहा ! सासू कांदे खातेय ! "

" पण मिळणार आहे का सासू तुला ? " शारदाबाईनें विचारलें.

" म्हणूनच म्हटलं, वर पहा—" चंपा म्हणाली, " कदाचित् वरच असेल तिची सासू कुठं तरी—कदाचित् स्वर्गांतसुद्धां असायची ! "

त्या दिवशीं त्या घरचें सारेंच वातावरण अजिबात बदलून गेलें होतें. सारींच माणसें खुषींत आलीं होतीं. अशीच थट्टामस्करी करीत त्या दिवशींचें जेवण झालें. आपण माणसासारखे पहिल्यानेंच जेवलों असें काशिनाथला वाटलें.

संकोचाचा सांखळदंड बांधून घेऊन तो आजवर वावरत होता. आज तो सांखळदंड तुटतांच पंख फुटून आपण हवेंत तरंगत आहोंत असें काशिनाथला वाटूं लागलें. सारी रात्र त्याला झोंप लागली नाहीं. दुःखाप्रमाणें आनंदाचा धक्कासुद्धां कसा दुःसह होत असतो, याचें दुःखदायक सौख्य त्यानें त्या रात्रीं अनुभवलें. आपल्या अनाथपणाचें—अपंगपणाचें सार्थक झालें असें वाटून तो बेहोष झाला.

दुसऱ्या दिवशीं त्याच्या खोलीचें स्वरूप पार बदलून गेलें. एकुलती एक कॉट, एकुलती एक खुर्ची नि टेबल जाऊन तिथें साध्या खुर्च्या, आराम खुर्च्या, झुलती खुर्ची, कांचेचें तावदानी टेबल, पुस्तकांचीं कपाटें, भला मोठा पलंग आला. सामानानेंच सारी खोली भरून गेली. त्या सामानाच्या गर्दींपायीं काशिनाथचा जीव अवखळून गेला. आजवर भोगलेल्या क्लेशांचें अगदीं अचानकपणें पारणें फिटलें असें त्याला वाटूं लागलें.

गोपीनाथ पूर्वीं येत होता, मधुकर अजूनही येत होता, पण चंपेनें कधीं त्या दोघांकडे अशा प्रकारें लक्ष दिलें नव्हतें. काशिनाथबद्दल तिला एकदम एवढी आपुलकी कां वाटूं लागली याचें शारदाबाईला आश्चर्य वाटलें. काशिनाथबद्दल जिव्हाळा वाटायला शारदाबाईला कांहीं कारण तरी होतें—तिच्या भाषेंत

बोलायचें म्हणजे ती आपला वाङ्मयीन वारस शोधीत होती—तो मिळाल्या-मुळें तिला आनंद होणें स्वाभाविक होतें. पण चंपेनें त्याला असें माथीं घेऊन कां नाचावें, याचें कोडें शारदाबाईला उलगडेना.

तारिणीला सुद्धां याच गोष्टीचें आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. काशिनाथचा परिचय व्हायला तीच कारणीभूत झाली होती. कुतुहलाप्रमाणेंच त्या परिचयाच्या पोटीं दयेचा अंश होता. बाहेरच्या जगांत सर्वांच्या थट्टेचा विषय झालेला हा माणूस इतरांपेक्षां निराळा आहे असें वाटल्यामुळें तिनें त्याच्याकडे नजर वळवली होती. कुतुहलामुळें तिनें त्याचा परिचय करून घेण्याचा प्रयत्न केला. त्याची हकीकत कळली तेव्हां त्याच्याबद्दल दया उत्पन्न झाली. त्याच्या लेखनाचा परिचय होतांच आदर उत्पन्न झाला. त्या आदराच्या पोटीं आपुलकी दडून बसली होती हें त्याला ती घरीं घेऊन आली त्याचवेळीं तिला कळलें.

पण तिला प्रश्न पडला होता तो हाच, कीं चंपेनें काय म्हणून त्याच्या साठीं एवढें हुरळून जावें ? असे कोणते गुण दिसले म्हणून त्याच्याबद्दल तिला इतकी आपुलकी वाटावी ? व्यावहारिकतेच्या दृष्टीनें काशिनाथ मधुकरच्या पासंगालासुद्धां पुरला नसता. विद्वत्तेच्या दृष्टीनें गोपीनाथ त्याच्या-पेक्षां श्रेष्ठ होता. शरयूशीं त्यानें ज्या प्रकारचें वर्तन केलें त्यामुळें कदाचित् तो तिच्या मनांतून उतरला असावा पण मधुकरबद्दल तिनें आपल्या इतकाच—किंबहुना आपल्याहून ही जास्त तीव्रतेनें—तिटकारा कां दाखवावा याचा उलगडा तारिणीला होईना. मधुकर आज व्यवहाराच्या दृष्टीनें उपयुक्त ठरला होता. ती व्यवहारी वृत्ति काशिनाथच्या ठिकाणीं असल्याचा पुरावा अजून मिळाला नव्हता. आजवरचें त्याचें आपल्या मामाशीं झालेलें वर्तन अगदींच भावनात्मकतेचें नसलें, तरी उपकारबद्धतेच्या जाणीवेमुळें तो अव्यवहारी ठरला नव्हता—तरीही त्याच्याठायीं व्यवहारपटुत्व असेल असें मानायला कांहींच आधार नव्हता. गोपीनाथनें शरयूला फशीं पाडलें म्हणून तो आपल्या मामाशीं—ज्यानें त्याला लहानाचा मोठा केला त्या मामाशींसुद्धां—भांडून निघाला हें त्याच्या भावनावशतेचें लक्षण होतें, कीं कठोर तत्त्वनिष्ठेचें लक्षण होतें याचाही उलगडा तारिणीला करतां येत नव्हता. कदाचित त्याच्या याच वर्तनामुळें—शरयूबद्दल दाखवलेल्या या अकारण सहानुभूतीमुळें—चंपेचें लक्ष त्याच्याकडे वेधलें असेंही क्षणभर तिला वाटलें.

त्या घरांत आतां तारिणी आणि काशिनाथ अगदीं घरच्या माणसासारखीं वागूं लागलीं होतीं. दोघेंही सारखीं बोलत बसत, चर्चा करीत, भांडणें करीत, तक्रारी घेऊन निवाड्यासाठीं चंपामाईकडे जात. मुलाबाळांच्या घराची शोभा आतां त्या घराला आली होती.

मधुकरला मात्र या परिस्थितीचा कसलाच सुगावा लागला नव्हता. काशिनाथ येऊन शारदाबाईच्या घरीं राहिला आहे, अडचणींत असल्यामुळें तारिणीच्या शिफारसीमुळें त्याला राहायला एक खोली देण्यांत आली आहे, एवढेंच त्याला कळलें होतें. या कुटुंबांत पूर्णपणें मिसळून गेल्याचा पत्ता मधुकरला लागला नव्हता. शारदाबाईच्या चर्चामंडळाच्या बैठकींत तो कधीं येत नसे, त्याचप्रमाणें त्यानें येऊन त्या बैठकींत सामील व्हावें अशी इच्छा शारदाबाईही प्रदर्शित करीत नसे. तो स्वतःदेखील त्या चर्चा मंडळापासून दूर राहिला होता. लेखनाचें काम करण्याची त्याची वेळ आणि या बैठकीची वेळ एकच असे म्हणूनच कदाचित शारदाबाई त्याला या बैठकीला बोलावीत नसत. मधुकर आणि काशिनाथ हे दोघेही म्हणूनच कधीं समोरासमोर आले नव्हते.

गोपीनाथचा कांहींच पत्ता नव्हता. कोणत्या ऑफिसांत त्याला नोकरी होती तें शरयूप्रमाणें काशिनाथलाही माहित नव्हतें. शरयूसुद्धां गोपीनाथची फारशी चौकशी करीत नसे. तारिणी शरयूला जवळ जवळ विसरून गेली होती. चंपा मात्र शरयूकडे मधूनमधून जात असे पण काशिनाथच्या जागे-पालटाबद्दल तिनें शरयूकडे कधींच उल्लेख नाहीं.

तारिणी आणि काशिनाथ या दोघांच्या नात्यांत जो बदल झाला होता तो कॉलेजच्या व्यवहारांत दिसून येत नव्हता. तिथें मात्र ती दोघेंही पूर्वी-इतक्याच शिष्टाचाराच्या नात्यानें वागत होतीं. त्यामुळें काशिनाथ शारदाबाईच्या ब्लॉकमधील एक खोली घेऊन राहिला आहे, या पलीकडे कॉलेजच्या प्रपंचांत कुणालाच फारसा सुगावा लागला नव्हता. म्हणूनच त्या दोघांनीं कॉलेजच्या व्यवहारांत ठेवलेलें पूर्वीपासूनचें धोरण पचून' गेलें होतें.

अशाप्रकारें शारदाबाईच्या संसारांत झालेला हा फरक लाग्याबांध्याच्या इतर लोकांना मुळींच कळला नाहीं. या एकांतिकतेंतच एक विशेष प्रकारचा गोडवा आहे असें चंपेप्रमाणें तारिणीलाही वाटत होतें. हें एक आपलें गुपित आहे, त्याचा आनंद आपला आपणच अनुभवावा, बाहेरच्या कुणालाच त्याचा पत्ता लागूं नये आणि त्या आपण स्वतः घालून घेतलेल्या कुंपणाच्या

मर्यादेंतच कौटुंबिकतेचा आनंद अनुभवावा, असें त्या सर्वांनाच वाटत होतें आणि म्हणूनच कुणीही कुणाकडे त्याची वाच्यता केली नाहीं.

एके दिवशीं एक विलक्षण योगायोग घडून आला. आपल्या आईचा एक जरूरीचा निरोप सांगण्यासाठीं शरयू चंपेकडे आली होती तितक्यांत काशिनाथ 'आई-आई' म्हणत घाईघाईनें आंत आला आणि त्याच्या मागोमाग खिदळत खिदळत तारिणीही आंत आली. शरयूला पाहतांच तीं दोघेंही जशीं चपापलीं तशी शरयूही काशीनाथला पाहून दचकली. विषेशतः तो अगदीं घरच्या माणसासारखा—'आई—आई' म्हणत आला याचें तिला आश्चर्य वाटलें.

शरयूच्या मनावर झालेला तो परिणाम पाहून चंपा तिला म्हणाली, "तूं ओळखतेस का याला? तुझ्या गोपीनाथचा भाऊच आहे ना तो?"

"माझ्या गोपीनाथचा!" शरयू दांतओठ खाऊन म्हणाली, "उगीच कशाला दुःखावर डागण्या देतेस?"

"चुकलें बरं-" चंपा म्हणाली, "पण तूं ओळखतेस ना याला? आमच्याकडे एक खोली रिकामी होती ती दिली आहे याला राहायला. गोपीनाथच्या घरांतून तो कां निघाला तें माहित आहे ना तुला?"

"नाहीं." शरयू म्हणाली, "कां निघाला?"

"तुझ्यामुळं." चंपा म्हणाली.

"माझ्यामुळं?" शरयूनें विचारलें, "मी काय केलं त्याचं?"

"तूं कांहीं नाहीं केलंस त्याचं—" चंपा म्हणाली, "पण तुझ्यासाठीं तो गोपीनाथच्या बापाबरोबर भांडला. जन्मभर ताटाखालच्या मांजरासारखा राहाणारा हा माणूस, गोपीनाथनं तुला तोंडघशी पाडलं म्हणून कां भांडायला निघाला, याचं त्या सर्वांना आश्चर्य वाटलं अन् म्हणूनच त्याला तें घर सोडावं लागलं—" काशिनाथकडे पाहून ती शरयूला म्हणाली, "मी दत्तक घेतलंय त्याला!—म्हणूनच तो 'आई' म्हणतो मला. बराच साळसूद आहे मुलगा—"

"गोपीनाथसुद्धां साळसूद होता!" शरयू दांतओठ खात म्हणाली.

"नाहीं!" चंपा निश्चयात्मक वाणीनें म्हणाली, "गोपीनाथ साळसूद नव्हता. गोपीनाथ आंतल्या गांठीचा होता. लबाड होता असं मी म्हणत नाहीं—लबाडी करायची ताकदच नव्हती त्याच्या अंगीं—पण तो दुबळा होता यांत

मात्र शंका नाहीं. साळसूदपणा आणि दुबळेपणा याच्यांत फार अंतर आहे शरयू. "

" खरं आहे. " शरयू उद्गारली, " दुबळाच होता तो. हा कसा काय आहे—? "

" तें एव्हांच कसं कळेल ? " चंपा म्हणाली, " काय रे काशिनाथ, ही काय विचारतेय तें ऐकलंस ? हिच्या प्रश्नाला काय आहे तुझं उत्तर ? "

" पूर्वी दुबळा होतों मी—" काशिनाथ हंसून म्हणाला, " गोपीनाथसारखा नव्हे—गोपीनाथला सारी अनुकूलता होती तरीही तो दुबळा होता—हा त्याचा दोष होता. मी अनाथ होतों, कुणाचाच पाठिंबा नव्हता मला, म्हणून मी दुबळा होतों, म्हणूनच तो माझा दोष नव्हता. परिस्थितीनं मला दुबळा केलं होतं. माझी कसोटी आहे ती यापुढं. "

" मग उतरणार आहां का त्या कसोटीला ? " शरयूनें विचारलें, " माफ करा हं—परिचय नसतांना मी विचारतेंय म्हणून तुम्हाला संकोच वाटेल पण जळला पोळलेला जीव आहे माझा—असं काहीं दिसलं, कीं फट्कन् एखादा तेढा शब्द माझ्या तोंडून निघून जातो. विसरून जा माझा प्रश्न. "

एवढा वेळपर्यंत तारिणी मुकाट्यानें ऐकत होती. आता तिनें त्या भाषणांत तोंड घातलें. तिनें शरयूला विचारलें, " शेवटीं तुला माझी आठवण झाली म्हणायची ! "

" पण तुला कांहीं आठवण झाली नाहीं. " शरयू म्हणाली, " एवढे माझ्या जन्माचे धिंडवडे निघाले पण माझी चौकशी करावी असं कांहीं वाटलं नाहीं तुला ! "

" ती चूक झाली माझी—" तारिणी एकदम म्हणाली, " क्षमा कर मला. अजून मला व्यवहार कळत नाहीं—शिष्टाचारसुद्धां कळत नाहीं. कोरडे शिष्टाचार मला आवडत नाहींत खरे; पण आजवरचे लागेबांधे मी विसरायला नको होते. गोपीनाथनं तुला तोंडघशी पाडलं—" तिचे पुढले शब्द तोंडचे तोंडींच राहिले.

बोलतां बोलतां सहज तारिणीची नजर दरवाजाकडे गेली त्यावेळीं गोपीनाथ दारांत उभा असल्याचें तिला दिसून आलें.

---

# १९ नातीं

पूर्वी कांहीं कळवलेलें नसतांना गोपीनाथ आल्याचें पाहून त्या तिघांनाही आश्चर्य वाटलें. पण सर्वांत फोंफावून उठली ती शरयू. चंपेनें तिला दाबलें नसतें तर ती कांहींतरी भरमसाट बोलून गेली असती.

चंपा पुढें येऊन म्हणाली, "ये गोपीनाथ, दारांतच कां उभा राहिलास ?"

कांहीं न बोलतां गोपीनाथ पुढें आला आणि इकडे तिकडे पाहून तिथल्या एका खुर्चीवर मट्‌कन् बसला. आपल्याशींच पुटपुटल्यागत तो म्हणाला, "ही कल्पना नव्हती मला !—पण झालं तें बरंच झालं. एकाच बैठकींत सारं कांहीं होऊन जाईल. पुनः हिला शोधायला जायला नको."

"कुणाला ?" चंपेनें विचारलें.

"हिला—" गोपीनाथ म्हणाला, "शरयूला."

त्याच्याकडे न पहातां अगदीं उलट दिशेला तोंड फिरवून शरयू म्हणाली, "माझं नांव काढूं नकोस. माझा तुझा कांहीं संबंध नाहीं !"

"तें खरं आहे." गोपीनाथ म्हणाला, "पण तितकंच तें खोटं आहे. संबंध होता, क्षणभर तुटला होता, पुनः जोडला—"

"जोडला नाहीं." शरयू म्हणाली, "तें नुसतं ढोंग होतं."

"तें खरं आहे." गोपीनाथ म्हणाला, "तें ढोंग होतं हेंही खरं आहे पण लोकदृष्टया संबंध जोडला होता. माझ्या लग्नाला तूं आलीस त्याचा मला मोठा धक्का बसला. असं कांहीं असतं तर मी आलों नसतों. तुला कसं येववलं तें तुझं तुलाच ठाऊक ! पण त्याचमुळ मला वाटलं, कीं जोडलेला संबंध अजून शाबूत आहे—" तो क्षणभर स्तब्ध राहिला आणि शरयूकडे पाहूं लागला. चुकून त्याच्याकडे गेलेली नजर शरयूनें झट्‌कन् वळवली तें पाहून तो म्हणाला, "मनाशीं दांडगाई करून चालत नाहीं. मी तो प्रयत्न करून पाहिलाय—अन् म्हणूनच आज रडत बसलोंय. तूं तरी तसं करूं नकोस शरयू."

"तर काय करूं ?" शरयू त्याच्यासमोर येऊन उभी राहून म्हणाली.

"मला सांगतां येत नाहीं." गोपीनाथ म्हणाला, "तूं अमूक एक कर असं तुला सांगायला मला तोंड नाहीं. माझी चूक मला आतां कळून आली-"

"कोणती चूक ?" शरयूनें विचारलें.

" एकच कां ? " गोपीनाथ म्हणाला, " किती तरी चुका केल्यायत मी ! पण मूळ होतं तेंच खरं होतं हें मला आतां कळूं लागलंय. "

" असं का ? " शरयू म्हणाली. तारिणीकडे बोट करून तिनें त्याला विचारलें, "समोर ती कोण उभी आहे पहा–तिच्याबद्दल काय वाटतं तुला आतां ?"

" तीच सर्वांत मोठी चूक झाली. तो माझा भ्रम होता हें आतां मला कळतंय. मी गगनाला गवसणी घालूं पहात होतों. माझी ती पात्रता नव्हती. तिच्यापुढं मी किती ठेंगणा आहें तें आतां कुठं मला कळूं लागलंय. माझीच होती ती चूक. "

" गप्प बैस ! " शरयू ओरडली.

" नाहीं." गोपीनाथ म्हणाला, " इतके दिवस गप्प बसलों त्यानं एवढे अनर्थ झाले. आतां संधि आलीय, आतां तरी तसं कांहीं व्हायला नको—"

कांहीं तरी बोलायला शरयू पुढें सरसावत होती तिला मागें लोटून चंपा म्हणाली, " तूं उगी रहा शरयू. गोपीनाथ, तिकडे पाहिलंस ? तो कोण तिकडे बसलाय तें पाहिलंस ? "

अजूनपर्यंत गोपीनाथचें लक्ष काशिनाथकडे गेलें नव्हतें. मुकाट्यानें तो तिथें बसलेला असल्याचें पहातांच गोपीनाथ ताड्कन् उठून उद्गारला, " तूं ? इथं ? इथं काय तुझं काम ? "

"माझा मुलगा आहे तो !" चंपा म्हणाली, " मी दत्तक घेतलाय त्याला."

गोपीनाथ मट्कन् खालीं बसला आणि म्हणाला, " काय काय चमत्कार होणार आहेत कोण जाणे ! हा केव्हां आला इकडे ? "

" त्याच्याशीं तुला कांहीं कर्तव्य नाहीं ! " इतका वेळ मुकाट्यानें ऐकत उभी राहिलेली तारिणी म्हणाली, " काय बोलायचंय तें बोल आणि मुकाट्यानं जा पाहूं इथून. कीं आम्हीच जाऊं ? कुणाशीं बोलायचंय तुला ? चंपामाईशीं ?—" त्यानें मानेनें होकार दिला तेव्हां तारिणी म्हणाली, " मी जातें. तुला अजून थांबायचंय का शरयू ? "

" हो ! " शरयू म्हणाली, " हा काय सांगतो चंपामाईला, तें ऐकायंचय मला. "

" मग बैस तर ! " असें म्हणून तारिणी निघून गेली.

आतां आपण काय करावें याचा काशिनाथला विचार पडला. तो चंपेला उद्देशून म्हणाला, " मी जाऊं का ? "

" थांब ! " गोपीनाथ म्हणाला, " तारिणी तरी कशाला गेली? जी जायची ती कांहीं गेली नाहीं—आतां कशाला आडपडदा हवा ? काशिनाथ, तुला कदाचित कळलं नसेल—बाबा फार काळजींत आहेत तुझ्याबद्दल. इथं आहेस हें कळलं—बरं झालं. मी सांगेन आतां बाबांना—" बोलतांना तो बावरल्या सारखा दिसला. पुढें काय बोलावें याचा निश्चित विचार तो करीत असावा.

कितीतरी वेळ तो उगीच बसून राहिला होता. चंपेनेंसुद्धां त्याला कांहीं प्रश्न केला नाहीं. थोड्या वेळानें तो म्हणाला, " सारं कांहीं बदलून गेलंय. मी मोकळा झालोंय आतां. केलेल्या अविचाराच्या फासांतून सुटलोंय. उगीच डाग लावून घेऊन तुम्हां सर्वांच्या दृष्टीनं मूर्ख ठरलों. तूं भांडलास काशिनाथ, निघून गेलास—आयुष्यांत एवढाच शहाणपणा केलास तूं. आईनं हट्ट धरला तेव्हांच मी तसं कांहीं करायला पाहिजे होतं. मला तें सुचलं नाहीं. आतां पश्चात्ताप करून काय उपयोग ? "—बोलतां बोलतां तो स्तब्ध राहिला.

" काय झालंय ? " चंपेनें विचारलें.

" माझी बायको मेली ! " अगदीं रुक्षपणानें गोपीनाथ उद्गारला, "माझी बायको मेली. छान झालं ! ती सुटली अन् मीही सुटलों. दोघांच्याही आयुष्याचं मातेरं झालं असतं. यापुढं काय व्हायचं तें माझंच होईल—"

शरयू मट्कन् खालीं बसली. तिची मुद्रा भकास झाली होती. जसें कांहीं तिच्यावर एकादें भयंकर संकट कोसळलें होतें.

" म्हणून तूं इथं आलास ? " काशिनाथ म्हणाला, " शरयूकडे मध्यस्थी करण्यासाठीं सांगायला चंपामाईकडे आलास ? होय ना ? "—गोपीनाथ कांहीं बोलत नाहीं असें पाहून काशिनाथ म्हणाला, " काय तुझी दैना ही ! "

" तूं म्हणतोस असं ? " गोपीनाथ म्हणाला, " तूं माझी कींव करतोस ? एका भेकड माणसानं माझी कींव करावी इतका का मी नादान आहें ? "

ताड्कन् उठून काशिनाथ गोपीनाथच्या समोर येऊन उभा राहिला आणि म्हणाला, " कोण भेकड ? मी ? कसा झालों मी भेकड ? कुणी मला भेकड केलं ? परोपरीनं तुम्ही लोक कसा माझा छळ करीत होतां त्याची आठवण आहे का तुला ? तसाच प्रसंग आला त्यावेळीं मी राहिलों का तसाच भेकड-पणाचा बुरखा पांघरून ? उपकाराची आत्यंतिक भावना विसरून नाहीं का तुझ्या बापाशीं भांडलों ? त्यांत माझा स्वार्थ होता का ? कुणाच्या तरी पोरीशीं

लग्न करून तूं स्वतःचा सत्यानाश करून घेतलास म्हणून माझं कांहीं नुकसान होणार होतं का ? या शरयूला मी ओळखत सुद्धां नव्हतों. एका शब्दानं कधीं हिच्याशीं बोललों सुद्धां नव्हतों. हिचा कड घेऊन मी भांडलों त्यांत माझा कांहीं स्वार्थ होता का ? माझा भेकडपणा मी कां झुगारून दिला त्यावेळीं ? आज यांनीं मला आसरा दिला म्हणून मी सुखांत आहें. नाहींतर माझी केवढी दैना झाली असती ! ती दैना होईल या भीतीन मी तुझ्या बापाशीं भांडायला भ्यालों का तेव्हां ? तूं मला भेकड म्हणतोस ?—"

आयुष्यांत कधींहीं तो इतका बोलला नसावा. त्याला थकवा आला आणि दोन्ही हात मस्तकावर घेऊन तो एका कोचावर बसला.

चंपा त्याच्याजवळ गेली आणि त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत म्हणाली, " शांत हो, शांत हो काशिनाथ, तुला शोभत नाहीं असं कांहीं ! ज्याचं कर्म त्याच्याकडे. तूं कशाला उगीच आपल्या मनाला त्रास करून घेतोस ? काय निष्पन्न होणार आहे त्यांतून ? तुला तो भेकड म्हणाला त्याचा तुला राग आला—सहाजिक आहे—कुणालाही तसा राग येईल—पण तें खोटं होतं का ? जन्मभर तसाच राहिलास अन् एकाच दिवशीं त्या जुन्या पापाचं प्रायश्चित्त घेतलंस, तें कसं कुणाच्या हिशेबांत येईल ? आतां एक शब्दसुद्धां बोलूं नकोस. अगदीं मुकाट्यानं बसून रहा इथं !—" गोपीनाथकडे वळून ती म्हणाली, "आतां बोल."

" एवढ्यावरून नाहीं का तुम्हाला कळलं ?" खालीं मान घालून गोपीनाथ म्हणाला.

" तूं कां आलायस ?" चंपेनें विचारलें, " शरयूला मागणी घालायला आलायस ?"

नुसत्या मानेनेंच त्यानें होकार दिला.

" किती दिवस झाले तूं विधूर होऊन ?" चंपेनें विचारलें.

" एक महिना होऊन गेला." गोपीनाथ म्हणाला, " या एक महिन्यांत मी सारखा विचार करीत होतों. जुन्या काळचा सारा इतिहास पडताळून पहात होतों. त्रयस्थाच्या दृष्टीनं स्वतःकडे पहात, झाल्या चुकांचा आढावा घेत होतों. माझी चूक मला कळून आली. कुठं कुठं चुकलं तेंही कळलं. कां चुकलं तेंही कळलं. प्रत्येक गोष्टीची कां उगीच वाच्यता करूं ?—" तो उठला आणि शरयूसमोर जाऊन म्हणाला, " मला क्षमा करशील शरयू ?"

" कुठल्या इंग्रजी कादंबरींतलं वाक्य हें ? " शरयूनें विचारलें, " ही आमची रीत नव्हे. परदेशी प्रिस्क्रिप्शन आहे हें ! मी भेटलें म्हणजे असले परदेशी उद्गार काढून मला झुलवायचा विचार होता का तुझा ? "

क्षणभर थांबून तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " जा. तें पूर्वींचं आतां राहिलं नाहीं. तें सारं पुसून गेलंय—पार नाहींसं झालंय. तूं माझा कुणी नव्हेस आणि मीही तुझी कुणी नव्हे. आतां आपण शेजारीसुद्धां नाहीं. मुद्दाम भेटायचं मनांत आणल्याशिवाय आतां आपली भेटसुद्धां व्हायची नाहीं. जा–उगीच मला त्रास देऊं नकोस नि चंपाताईलाही त्रास देऊं नकोस. नीघ ! "

गोपीनाथ तसाच पाठ फिरवून उभा राहिला आणि चंपेला उद्देशून म्हणाला, " जाऊं का मी ? "

क्षणभर विचार करून चंपा म्हणाली, " जा—हो—जाच तूं ! आतां ही वेळ नव्हे बोलण्याची —"

तिच्या पुढल्या उद्गारांची वाट न पहातां गोपीनाथ तडक बाहेर निघून गेला.

क्षणभर तीं तिघेंही स्तब्ध राहिलीं होतीं.

काशिनाथ म्हणाला, "काय दुर्दशा झालीय ही याची ! पहिल्यापासूनच याचा कणा मोडका !— मी असं म्हणूं नये खरं—मीही याच्यापेक्षां भेकड दिसत होतों—पण मी भेकड नव्हतों. तो आव होता माझा—सक्तीनं पांघरलेलं तें पांघरूण होतं. याची परिस्थिति कांहीं माझ्यासारखी नव्हती. आतां मला वाचा फुटलेली असली तरी त्यावेळीं बोलायला मला तोंड नव्हतं. आतां मी माणसांत आलोंय. जुन्या संवयीचा विसर पडत गेला कीं लोक मला तिखट सुद्धां म्हणूं लागतील, त्याची सुरवात झाली आज. बरं झालं ! नाहीं आई ? "

" खरोखरच बरं झालं ! " चंपा म्हणाली, " मूळचा तूं कसा आहेस तें आज कळलं मला. तारिणी हवी होती यावेळीं—"

" मला वाटतं—" काशिनाथ म्हणाला, " तिला कल्पना आहे ही. तशी कल्पना असल्याशिवाय कांहीं तिनं मला इथं आणलं नाहीं. "

" म्हणजे ? " आश्चर्यचकित होऊन शरयू उद्गारली, " तारिणीनं इथं आणलं यांना ? "

" हो ! " चंपा म्हणाली, " तारिणीनंच आणलं याला इथं. मी नुसतं येऊं दिलं एवढंच. पण माझ्यावर पहिल्यानं फांस टाकला तो यानं. आई हवी होती याला अन् मुलगा हवा होता मला, असं जमलंय हें नातं. "

शरयू विचुकपणें पहात राहिली होती. चंपेचें भाषण कानीं ऐकूं येत असतांही तिला कळत नव्हतें. तिचें लक्ष गोपीनाथकडे गेलें होतें. त्याच्या वृत्तींत झालेला बदल आठवून ती जशी चकित झाली होती, तसाच योगायोगानें घडून येणाऱ्या घटना पाहून तिचा जीव गोंधळून गेला होता.

" मी आतां जातें !" शरयू म्हणाली, " तारिणी कुठंय ? "

तिनें विचारायला आणि तारिणी आंत यायला एकच गांठ पडली.

" गेला का तो ? " तारिणीनें विचारलें, " कशाला आला होता ? "

" त्याला झाडलं या काशीनाथनं. " चंपा म्हणाली, " एक चमत्कार झालाय. त्याची बायको मेली—" तारिणी दचकली असें पाहून चंपा तिच्या पाठीवर हात ठेवून म्हणाली, " असे चमत्कार नेहमीं घडून येतात. तें कांहीं कुणाला सांगतां यायचं नाहीं. वास्तवता कल्पनेच्या पलीकडची असते !—" ती हंसली आणि म्हणाली, "—अगदीं एकाद्या लेखकासारखीच बोललें नाहीं मी ? सहवासाचा परिणाम आहे हा !—तेव्हां हें असं झालंय. शरयूकडे मी मध्यस्थी करावी म्हणून आला होता वाटतं तो. "

" लाज नाहीं वाटली त्याला ? " तारिणी चिडून म्हणाली, " रिकाम्या च्हेकन्सीवर मालक बोलावणं करीत नाहींत कुणाला. तिथं अर्ज करायचा असतो तो अर्जदारानं. मानी माणूस कधींच असल्या भेकडपणाला बळी पडत नसतो. किती क्षुद्र मनाचा आहे हा !—" शरयूकडे वळून ती म्हणाली, " रागाऊं नकोस शरयू, तुझ्या जागीं मी असतें तर मी लाथ मारली असती त्याला. "

" तेंच केलं मी. तेव्हांच निघून गेला तो. कसं आंबटतोंड झालं होतं ! जाऊं दे. ती गोष्टच नको आतां. हं !—एकूण हा काशिनाथ आतां तुमच्याकडे राहायला आलाय ! मधुकरला आहे का माहित हें ? "

" आहे तर ! " चंपा म्हणाली, " पण तो इतका घरांतला झालाय हें कांहीं त्याला माहित नाहीं. "

" काय चाललंय मधुकरचं ! " शरयूनें विचारलें.

" काय चालायचं ? " चंपा म्हणाली, " हिच्या आईचे व्यवहार सध्यां तोच पहात असतो. तेवढा माझा भार हलका झालाय. आतां हा आल्यापासून घर जरा घरासारखं झालंय. पूर्वी हा खाणावळींत जात असे पण आतां इथंच असतो. जेवायलासुद्धां ! "

यावर शरयू कांहीं बोलली नाहीं. विचुकपणाची छाया पुन: तिच्या चेहऱ्यावर आली होती. एकदम दचकल्या सारखें करून ती म्हणाली, "मी जातें आतां. मन कसं कावून गेल्यासारखं झालंय. माफ कर तारिणी, यापूर्वींच मी यायला पाहिजे होतं पण या साऱ्या प्रकारामुळं मी अगदीं गांजून गेल्यासारखी झालें होतें. कुठंच कुणाशीं संबंध ठेवूं नये असं वाटत होतं मला. आतां सारे दरवाजे मोकळे झालेयत. आतां येत जाईन दर रविवारीं तरी. रोज येणं कांहीं शक्य नाहीं. ऑफिसांत फारसं काम नसलं तरी आठनऊ तास डांबून पडल्यामुळं कसा बेजार येतो जिवाला. येतें बरं!—" असें म्हणून काशिनाथ आणि चंपेला नमस्कार करून ती निघून गेली.

ती निघून गेल्यावर त्या तिघांनाही हायसें वाटलें. तोंडदेखलें बोलणं चालू ठेवणें तारिणीला आवडत नसे. काशीनाथ तर भडकून गेला होता. शांतपणें राहिली होती काय ती चंपा. त्यावेळीं शारदाबाई तिथें नव्हती म्हणून बरें झालें असें चंपेला वाटलें. हे असले प्रकार तिला उद्वेगजनक वाटले असते. असल्या प्रकारापासून मनावर होणारा परिणाम सहन करायची तिला संवय नव्हती. दुसऱ्याचे भार उचलून घेऊन स्वतःच्या जिवाचा आटापिटा करायची खोड असल्यामुळें झाल्या प्रकाराबद्दल चंपेला फारसें कांहीं वाटलें नाहीं.

काशिनाथचें पुस्तक आतां पुरें होत आलें होतें. छापायला घ्यायच्या पूर्वी शारदाबाईनें तें एकदां नजरेखालून घालावें अशी त्याची इच्छा होती पण शारदाबाईला तें पटेना. ती म्हणाली, "ज्याला आत्मविश्वास नाहीं त्यानं आपलं हस्तलिखित दुसऱ्याला दाखवावं. मला कांहीं तें आवडत नाहीं. त्यामुळं लेखकाच्या लेखनाला व्यंग येतं. प्रत्येक लेखकाची एक स्वतःची निश्चित दृष्टि असते. त्या दृष्टीनं तो लिहित असतो. परीक्षक या नात्यानं वाचून पहाणाऱ्याची दृष्टि मूळ लेखकापेक्षां निराळी असते. त्या दृष्टीनं पाहून त्या परीक्षकानं केलेल्या सूचना अंमलांत न आणल्या तर त्या परीक्षकाला वाईट वाटतं. अन् अमलांत आणल्या तर मूळ लेखकाच्या लेखनांत व्यंग येतं. म्हणूनच कुणाही लेखकानं आपलं लेखन दुसऱ्याला दाखवून दुरुस्त्या करायचा केव्हांच प्रयत्न करूं नये असं ठाम मत झालंय माझं. मी केव्हांच तसं केलं नाहीं. चंपा वाचून पहात असे आणि खूष होत असे. सूचना करायचा आव तिनं आणला असता तर मोठी कठीण स्थिती झाली असती माझी. पण तिनं तसं कांहीं केलं नाहीं

म्हणूनच मी बचावलें. अन् म्हणूनच मी तुझं पुस्तक वाचणार नाहीं कीं तुला कसल्या सूचना करणार नाहीं. वाचीन तें छापून प्रसिद्ध झाल्यावर—अन् तेव्हांच काय मत द्यायचं तें देईन."

काशिनाथचें समाधान झालें. त्याचेंही मत तसेंच होतें. आपण औपचारिकतेनें शारदाबाईला पुस्तक वाचायला सांगितलें याची त्याची त्यालाच लाज वाटली.

तें पुस्तक प्रसिद्ध झालें तेव्हां मधुकर पुनः खवळून उठला. तरवार उपसून त्या लेखकावर आघात करूं लागला. त्या बैठकीला तारिणी हजर असतांनाही तो बेफिकीरपणें आपलें टीकास्त्र सोडतो आहे असें पाहून चंपेला आश्चर्य वाटलें. पण तारिणी कांहींच बोलली नाहीं. मधुकरला वाटलें, कीं आतां आपल्या टीकेचा परिणाम तारिणीवर सुद्धां झाला आहे.

तो जोरजोरानें बोलत होता आणि शारदाबाई त्याला विरोध करीत होती. इतर जमलेली मंडळीही मधुकरवर तुटून पडली होती. तरी तो हटत नव्हता. त्याला काय दुर्बुद्धी झाली कोण जाणे, तारिणीकडे वळून तो म्हणाला, "तुम्ही वाचलं ना हें पुस्तक ? काय वाटलं तुम्हाला ?"

"तेंच आहे माझं मत." तारिणी हंसून म्हणाली, "म्हणजे तुमच्यासारखं नव्हे. माझं मत असं आहे, एवढ्या असामान्य लेखकाच्या पुस्तकावर टीका करायची तुमची पात्रता नाहीं. पुस्तकावर टीका करायचं काम सोडून नुसतं आपलंच काम करीत तुम्ही रहाल तर जगावर मोठे उपकार होतील."

इतक्या लोकांसमक्ष तारिणीनें मारलेला तो फटका त्याला चांगलाच लागला. तो म्हणाला, "कोणत्याही वाचकाला कोणत्याही पुस्तकावर टीका करायचा पूर्ण अधिकार आहे. मी कांहीं लिहीत नाहीं कुठं. पण लिहायला घेईन तर या लेखकाच्या या पुस्तकाच्या चिंध्या चिंध्या करून उडवीन. उगीच स्तोम माजवलंय तुम्ही सर्वांनीं याचं. ओळखीचा आहे वाटतं तुमच्या तो ?"

"हो !" तारिणी म्हणाली, "मी चांगला ओळखतें त्याला. या पुस्तकावरूनच ओळखतें. कशाला हवी प्रत्यक्ष ओळख ? मांणूस कांहीं चिरंजीव नाहीं. वाङ्मय मात्र चिरंजीव आहे—अर्थात् चिरंजीव राहायची त्या वाङ्मयाची पात्रता असली तर! आणखी पांचशें वर्षें तरी कोण विसरणार नाहीं या लेखकाला—मग तो जन्मभर कुठं दडी मारून बसलेला असला तरी हरकत नाहीं." असें म्हणून तारिणी एकदम उठून निघून गेली.

झाला प्रकार तो पूर्वीच्यासारखाच झाला. फक्त तारिणीनें आपल्या मनाचा तोल कायम ठेवला होता तें पाहून चंपेला समाधान वाटलें.

ती हकिकत कळली त्यावेळीं काशिनाथ म्हणाला, "कां या माणसानं एवढं चिडून जावं माझ्यावर ? नमस्कारापुरता सुद्धां त्याचा माझा परिचय नाहीं. पूर्वी नाटकाच्या वेळीं त्याला मी पाहिला होता. आतां इथं येतो तेव्हां जिन्यांत केव्हां केव्हां भेट होते—एवढंच. बरं, तो स्वतः लेखक असता तर असलं वर्तन कदाचित् सयुक्तिक ठरलं असतं. पण तसंही कांहीं नाहीं. विरोधी टीका प्रत्येक पुस्तकावर होतात, नाहीं असं नाहीं, सर्वसामान्य वाचकाला कदाचित् साऱ्याच गोष्टी कांहीं पटायच्या नाहींत—पण इतकं चिंध्या उडवून टाकण्याजोगं माझं पुस्तक गचाळ आहे असं कांहीं मला वाटत नाहीं."

"त्याला अनेक कारणं आहेत—" तारिणी म्हणाली, "तीं कारणं तुला सांगायचा काल अजून आला नाहीं. तीं कारणं काय आहेत याची जाणीव जशी मला आहे तशीच चंपामाईलाही आहे. अगदीं मत्सरी आहे तो माणूस ! मत्सराच्या पायीं तो एकाद्याचा खूनसुद्धां करील ! पण अत्याचार करण्याइतकं धाष्टर्यसुद्धां त्याच्या अंगीं नाहीं."

काशिनाथ मुकाट्यानें तिचें बोलणें ऐकत होता. मधुकरचा आणि त्याचा परिचय नव्हता. अर्थात् त्याच्या स्वभावाबद्दल तारिणीनें मारलेले शेरे योग्य आहेत कीं अयोग्य आहेत हें त्याला ठरवतां येत नव्हतें. तसें पाहिलें तर मधुकरबद्दल त्याला कांहीं कुतूहल नव्हतें. जी चर्चा झाली त्यावरून मधुकरच्या मताला या घरांत कांहीं तरी मान आहे एवढीच त्याला कल्पना आली. तसें नसतें तर तारिणीनें तरी एवढी चर्चा कां केली असती ?

"कां बोलत नाहींस तूं ?" तारिणी म्हणाली.

"मी काय बोलूं ?" काशिनाथ म्हणाला, "माझा त्याचा परिचय नाहीं. त्याचा परिचय करून घ्यायची मला इच्छाही नाहीं—अजून तशी जरूरीच वाटली नाहीं मला. त्यानंही माझ्याबद्दल कधीं विशेषशी विचारपूस केली नाहीं. मी पहातों आहें तें एवढंच, या घरांतल्या कर्त्या माणसाची जागा त्याची आहे. त्या नात्यानं त्याच्या शब्दाला मान आहे, म्हणूनच बऱ्या वाईटाची चर्चा करणं तुला आवश्यक वाटतं."

"तें खरं आहे," तारिणी म्हणाली, "पण माझ्या हितसंबंधाशीं तो झगडतो आहे. आतां स्पष्टच सांगतें—" असें म्हणून तिनें सारी हकिकत

सांगायला सुरवात केली. पूर्वी मधुकरबद्दल आपल्याला काय वाटत होतें, चंपेला काय वाटत होतें, मधुकरकडे पहाण्याची एक विशेष दृष्टि चंपेनें आपणाला कशी दिली, त्याचा आपल्या मनावर काय परिणाम दिला, कोणत्या उद्देशानें तो काशिनाथच्या पुस्तकावर विरोधी टीका करतो असा आपला समज झाला, तें सारें कांहीं तिनें त्याला सांगितलें.

ती हकीकत ऐकून काशिनाथ गंभीर झाला. त्याला अंधुकशी कल्पना होती पण इतक्या व्यवस्थित रीतीनें डाव टाकण्याइतका मधुकर कारस्थानी आहे हें त्याला माहित नव्हतें. त्या चर्चेमुळें त्याच्या अंतःकरणांत कांहीं नव्या भावनांचा उदय झाला. या वातावरणांत आपण किती जपून वागलें पाहिजे याची त्याला कल्पना आली. तो आंतल्या गांठीचा नसला तरी त्याचा स्वभाव बराचसा आत्मपर होता. दुसऱ्या माणसाला आपल्या विश्वासांत घेण्याची अनुकूलता साऱ्या आयुष्यांत न मिळाल्यामुळें स्वतःचे विचार स्वतः-पुरतेच जपून बाळगण्याची त्याला संवय लागली होती.

या नव्या अनुभवामुळें त्याच्या मनांतसुद्धां कांहीं आकांक्षा निर्माण झाल्या होत्या. तारिणीच्या बुद्धिमत्तेनें तो जितका दिपून गेला होता तितकाच तो तिला भीत होता. ती भीति जुन्या अनुभवांतली नव्हती. या भीतीच्या पोटीं जिव्हाळा होता. सहज आपल्या तोंडून एकादा शब्द चुकून जाईल नि तिच्या मनावर आपली इच्छा नसतांही भलताच परिणाम होईल याच गोष्टीला तो भीत होता. कोणत्याही कारणानें तिचें मन दुखावलें असतें तर त्याला मरणप्राय दुःख झालें असतें.

या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन तो म्हणाला, " मोठी चमत्कारिक परिस्थिति आहे ही. हा एकाद्या कादंबरीचा विषयसुद्धां होऊं शकेल. हा एक गुंतवळ आहे. तो सोडवणं मोठं बिकट आहे. तो संशय आहे. कदाचित तसं नसेलही. पण बारकाईनं विचार केला तर अगदींच निःस्वार्थबुद्धीनं तो इथं वागत नसावा असं वाटतं. तुला वाटतो तसलाच कांहीं स्वार्थ असेल—तशी तुझी खात्री असेल तर कां तूं आपल्या आईजवळ बोलून टाकीत नाहींस ? "

" खरंच ! " तारिणी आपल्याशींच म्हणाली, " यापूर्वीच विचारायला हवं होतं हें ! कसं माझ्या ध्यानांत आलं नाहीं हा वेळपर्यंत. एवढ्यासाठींच लेखनाची संवय हवी. प्रत्येक गोष्टीवर साधकबाधक विचार करून निर्णय काढायला म्हणून तरी लेखक व्हावं ! " असें म्हणून ती मोठमोठ्यानें हंसत सुटली.

तिचें हंसणें ऐकून चंपा आंत आली आणि म्हणाली, " काय ग झालं एवढं हंसायला ? "

झालेलें भाषण तिनें चंपेला सांगितलें तेव्हां चंपा म्हणाली, " आतां विचारायला कांहीं हरकत नाहीं. यापूर्वी तसं विचारायला कांहीं आधार नव्हता. उगीच संशय घेतेयस असं म्हटलं असतं तुझ्या आईनं,—" क्षणभर थांबून ती म्हणाली, " पण नको— तूं विचारूं नकोस. मी विचारतें. एकदां या गोष्टीचा शेवटचा निकाल लावला पाहिजे. पूर्वी एकदां बोलतां बोलतां मी उल्लेख केला होता या गोष्टीचा—म्हणजे मधुकरच्या या कारस्थानाचा नव्हे, पण—" ती थांबली, जराशी हंसली, दोघांकडेही तिनें एकदां नजर फेकली आणि म्हटलें, " मधुकर आणि तारिणी यांच्या लग्नाचं—"

" मग काय म्हणाली तेव्हां आई ? " तारिणीनें मधेंच विचारलें.

" सांगूं ? " चंपा अगदीं नाजूक हंसत म्हणाली, " ऐकलं तर घाबरायची नाहींस ? "

" म्हणजे ? " तारिणी तशीच हंसून म्हणाली, " तिला पसंत आहे वाटतं हा संबंध ? "

" अगदींच चुकलीस ! " चंपा म्हणाली, " तुझ्या लग्नालाच मुळीं तिची संमति नाहीं. म्हणजे आपण जिवंत आहें तोंपर्यंत एक तुझं लग्न तरी होऊं नये, किंवा झालं तर तूं तिला सोडून जाऊं नयेस, असं वाटतंय तिला. तुझ्या लग्नाची गोष्ट काढतांच ती रडकुंडीला आली, इतकी हळवी झालीय ती या प्रकरणीं. "

" खरं आहे तें. " काशिनाथ म्हणाला, " पूर्वीचा इतिहास ध्यानीं घेतला तर हें अगदीं स्वाभाविक आहे. "

" पण लग्न झालं—" तारिणी म्हणाली, " तर मी सोडून जाऊं नये असं म्हणण्यांत काय अर्थ ? "

" घरजांवई मिळाला तर ! " असें म्हणून चंपा हसूं लागली. हसतां हसतां तिची नजर काशिनाथच्या चेहऱ्याकडे गेली. तो अगदीं गोरामोरा झाला होता.

" मग आतां तसाच कुणी पाहिला पाहिजे मला. " तारिणी म्हणाली. " केव्हांही मी आईच्या मांडीवर बागडलें नसलें तरी आईला सोडून जायची कल्पना मला मोठी दुःसह होते. प्रश्न आहे तो एवढाच, कीं माझ्या आईचा

घरजांवई होण्याइतका स्वाभिमान विसरणारा, पण मला माझ्या योग्य वाटणारा असा कोण कसा मिळणार ?"

"खरोखरच हा प्रश्न मोठा कठीण आहे." काशिनाथ म्हणाला, "कितीही श्रीमंत माणसाचा कां होईना, घरजांवई होणं कुणाही मर्दाला पटायचं नाहीं. त्याला एक तो माणूस स्वाभिमानशून्य तरी असला पाहिजे किंवा स्वार्थी तरी असला पाहिजे.—किंवा कोणत्याच गोष्टीचा मागला पुढला विचार न करण्याइतका अविचारी तरी असला पाहिजे."

"अगदीं बरोबर आहे तुझं म्हणणं." तारिणी उद्गारली, "पण या तीनही प्रकारांतला कुणी माणूस मला पटायचा नाहीं. मला देखील स्वाभिमान म्हणून कांहीं आहे ना ?—मला सांखळीला बांधून फिरवणारा सुलतान जसा मला नको आहे, तसंच माझ्या हातच्या सांखळीला बांधलेलं कुलुंग कुत्रंही नकोय मला."

"मोठी बिकट समस्या आहे ही !" काशिनाथ म्हणाला, "मी तुझ्या जागीं असतों तारिणी, तर अशा संकटाला तोंड देण्यापेक्षां जन्मभर अविवाहित राहिलों असतों."

तारिणी क्षणभर स्तब्ध राहिली. ती आपल्याशींच विचार करीत असावी. अगदीं गंभीर होऊन ती म्हणाली, "असं पहा माई, तुझ्यासमोर स्पष्ट बोलायला कांहीं हरकत नाहीं, त्याचप्रमाणें याच्याही समोर मी आतां संकोच धरणार नाहीं. मनांतल्या भावना बुद्धीपुरस्सर मारून टाकाव्या असं कांहीं मला वाटत नाहीं. वडिलांच्या इच्छेसाठीं वाटेल त्या मुलीशीं लग्न करणारा माणूस अन् केवळ वडिलाची इच्छा म्हणून स्वतःच्या इच्छेविरुद्ध अविवाहित राहणारी व्यक्ति, दोनही मला सारखेच वाटतात. तसं कांहीं करणं माझ्या तत्त्वनिष्ठेच्या विरुद्ध आहे. खोटं कशाला बोलूं ? जन्मभर अविवाहित राहण्याचं सामर्थ्य माझ्या अंगी नाहीं, इतकंच नव्हे, तर यापुढं आणखी कित्येक वर्षं अविवाहित राहणं सुद्धां मला कठीण जाईल. सक्तीनं मन मारायचं नाहीं मला—तशीच शारीरिक प्रवृत्तीवरही मला सक्ति करायची नाहीं. खोटी ध्येयनिष्ठा मला दाखवायची नाहीं, तसा आत्मसंयमनाचा खोटा बडिवारही मिरवायचा नाहीं. यापुढं लग्नाशिवाय राहणं मला कठिण जाईल. अगदीं लाज सोडून सांगतेंय मी—सहसा असं कुणी सांगणार नाहीं—पण मी माझ्या आईची मुलगी आहें—माझ्या या आईची मी शिष्या आहें—खरं बोलायला मला मुळींच संकोच वाटत नाहीं कीं लाजही वाटत नाहीं !"

तिचें तें भाषण ऐकून चंपेइतकाच काशिनाथही गंभीर झाला. तारिणीच्या बोलण्यांत जर गंभीरपणा नसता तर हेंच बोलणें थट्टेवारीं गेलें असतें. पण ती जें बोलली तें अगदीं अंतःकरणापासून बोलली— मनाचा आवेग अनावर झाल्यामुळें बोलली, असेंच काशिनाथला वाटलें.

तारिणी पुढें बोलत होती, "—अभ्यासांत जोपर्यंत मी गुंतून गेलें होतें तोंपर्यंत मनावर फारसा परिणाम होत नव्हता. तसं पाहिलं तर आतां शिक्षणाचं शेवटचं टोंक मी गांठलंय. हा नवा अभ्यास हातीं घेणं हेंच मुळीं थोतांड आहे. मन गुंतवून ठेववायचा तो माझा सक्तीचा प्रयत्न आहे. आतां ही लपवालपवी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं म्हणूनच मी लाज सोडून सारं कांहीं बोलून टाकलंय." असें म्हणून ती स्तब्ध राहिली.

"आतां याला उपाय?" चंपेनें तिला जवळ घेऊन विचारलें.

तारिणी नुसती हंसली.

हंसतांना तिची नजर कुणीकडे गेली होती तें चंपेच्या चांगलेंच लक्षांत आलें.

काशिनाथ त्यावेळीं आपल्याच विचारांत चूर झाला होता.

चंपेला वाटलें, आतां आपल्या अंतःकरणावरचा भार एकदांचा उतरला.

---

## २० राजीनामे

खोलीबाहेर पाऊल टाकून चंपा दिवाणखान्यांत जाण्याच्या रस्त्यानें जात होती तोंच मधुकर अंग चोरून चुकवून जायचा प्रयत्न करीत असतांना थबकून तिच्या समोर आला. चंपेला वाटलें, तो बहुतेक दाराला कान लावून राहिलेला असावा. तिची आणि त्याची पहिली दृष्टादृष्ट झाली त्यावेळीं त्याच्या मुद्रेवर लांडग्याइतकी क्रूरपणाची छाया चंपेला दिसली होती–पण तितक्यांतच त्याची मुद्रा चित्रपटांतील डिझॉल्व्हसारखी एकदम बदलली आणि नित्याच्या सालस मुद्रेचा आव आणून तो चंपेला म्हणाला, "अजून बाई आल्या नाहींत वाटतं?"

तितक्याच दांभिकपणें हंसून चंपा म्हणाली, "यावेळीं कधीं येतात का त्या?—"

" खरंच ! " बैठकीच्या खोलीकडे जायला निघत मधुकर म्हणाला, " तें मी अगदींच विसरलों होतों. "

" अगदीं पाहिल्यानंच कसे विसरलांत हें ! " चंपा उद्‌गारली.

जात असतांना थांबून एकदम मागें फिरून मधुकर गुरगुरून चंपेच्या अंगावर आला आणि म्हणाला, " अलिकडे चाललेलीं तुमचीं हीं कारस्थानं न कळण्याइतका मी बावळा आहें असं का वाटलं तुम्हाला ? "

" कारस्थानं ? " चंपा उद्गारली, " कारस्थानं ! अन् तीं तुमच्याविरुद्ध ? अन् मी करणार कारस्थानं तुमच्याविरुद्ध ? आपल्याला असे कोण समजलांत तुम्ही मधुकर ? " उत्तरासाठीं ती क्षणभर थांबली.

रागाच्या भरांत आपल्याकडून अविचार झाला याची जाणीव होऊन मधुकर एकदम नरमला आणि म्हणाला, " क्षमा करा हं. मी भलतंच बोलून गेलों. "

" पण कां भलतंच बोलून गेलां ? मी तुमच्याविरुद्ध कारस्थानं करतेंय असं म्हणण्याइतके तुम्ही इथले कोण ? मी या घरची मालकीण आहें— शारदाबाईचा सुद्धां इथं कांहीं अधिकार नाहीं, तें इतर कुणाला नसलं तरी तुम्हांला माहित आहे. असला आरोप केल्याबरोबर लाथ मारून तुम्हांला घराबाहेर काढलं नाहीं हें भाग्य समजा. "

" असं का ? " दांतओठ खात मधुकर म्हणाला, " या घरांत कुणाचा अधिकार किती आहे तें मला माहित आहे. शारदाबाई जोंपर्यंत माझ्यावर विश्वास ठेवताहेत तोंपर्यंत दुसऱ्या कुणाची काडीभर सुद्धां पर्वा करणार नाहीं मी—हें नीट ध्यानांत ठेवा ! "

" कुणाला बजावतोस रे माकडा ? " चंपा एकदम ओरडून म्हणाली.

त्या ओरडीसरशीं तारिणी आणि काशिनाथ धांवतच तिथें आलीं.

" मला बजावतोस ? " चंपा ओरडली, " अशा कोणत्या अधिकाराच्या जोरावर तूं मला बजावतोयस ? "

पुनः मोर्चा बदलून मधुकर म्हणाला, " क्षमा करा हं. शब्दाला शब्द गेला—कठोर शब्दाला कठोर उत्तर आलं, हा कांहीं माझा अपराध नव्हे. कठोर उत्तर येण्याइतकी माझ्याकडून जी चूक झाली त्याबद्दल मी तुमची क्षमा मागतों. "

एक शब्दसुद्धां न बोलतां चंपा आपल्या खोलींत निघून गेली.

त्या दिवशीं मधुकरचा तोल सुटला होता कीं काय कोण जाणे, तो तारिणीला उद्देशून जातां जातां म्हणाला, " असं आहे एकूण ! तेव्हांच ती तरफदारी चालली होती ! तेव्हांच वाटतं मी स्वार्थी न् आपमतलबी ठरलों तो ? "

" हो — हो ! तेव्हांच ! " तारिणी म्हणाली.

" असं असतं हें बायकांचं — " मधुकर पुनः एकदां मान मागें वळवून म्हणाला, " त्यांना मर्द नको असतो—कुलुंग कुत्रं हवं असतं. "

काड्कन् आवाज झाला.

रागाच्या भिरभिरीसरशीं तारिणीनें मधुकरच्या गालाची आपल्या हाताशीं गांठ करून दिली होती.

अगदीं त्याच आवाजाबरोबर काशिनाथ ओरडला, " हं–हं, हें काय ? "

" माफ करा हं ! " तारिणी म्हणाली, " शब्दाला शब्द वाढतो तो असाच बरं मधुकर ! दाराला कान बायका लावीत असतात असं तुम्ही पुरुष म्हणतां पण पुरुषांनासुद्धां—मर्दांनासुद्धां ती तसली खोड असते हें अजून माहित नव्हतं मला. माफ करा हं !—" काशिनाथकडे वळून ती म्हणाली, "चल काशिनाथ, तुला कळायचं नाहीं तें. दारावरचा बुलडॉग गुरगुरला तरी मालकाला त्याची भीति वाटत नाहीं ! " असें म्हणून तारिणी अगदीं अचानकपणें काशिनाथचा हात धरून त्याला ओढीत घेऊन गेली.

जातां जातां तिच्या कानीं शब्द आले, " हें पाणिग्रहण वाटतं ? "

शारदाबाई आली त्यावेळीं मधुकर म्हणाला, " मी आज आपला निरोप घेणार आहें. आपला आजवरचा ऋणानुबंध संपला. एकीनं लाथ मारली—प्रत्यक्ष नव्हे—नुसतं म्हटलं तसं,—अन् दुसरीनं थोबाडींत दिली—प्रत्यक्ष दिली. आजवर आपली जी सेवा केली—निःस्वार्थपणें, एकनिष्ठपणें जी सेवा केली त्याचं हें बक्षिस मिळालं तें भरपूर झालं. आतां मला निरोप द्या. "

" काय झालं ? " शारदाबाईनें विचारलें.

" तें घरच्या मालकिणीला विचारा. " मधुकर म्हणाला, " माझा गैरसमज आज दूर झाला. "

" कसला गैरसमज ? " शारदाबाईनें विचारलें.

" कशाला हवी त्या गोष्टीची वाच्यता आतां ? आजवर मी आपले जे जे व्यवहार केले आहेत त्यांतले जे अपुरे राहिले आहेत ते कुणाला दाखवून देऊं तेवढंच सांगा मला. हा चार्ज देऊन एकदां मला मोकळा होऊं द्या.

आजवर इथं मानानं वावरलों, आपल्या कोणत्याही घरगुती बाबतींत मी कधींही ढवळाढवळ केली नाहीं, या बैठकीपलीकडे कुणाशीं बोलायलासुद्धां गेलों नाहीं, एवढं आपल्याला पटतं ना ? "

अस्वस्थ होऊन शारदाबाई म्हणाली, " हें काय चाललंय मधुकर ? कां असं तेढं बोलतोयस आज ?—" तितक्यांत चंपा आंत आली आणि म्हणाली, " तें मी सांगतें. याला विचार, थोड्या वेळापूर्वी आम्ही बोलत बसलों असतां दाराशीं कान लावून हा कां ऐकत होता ? "

" तें मी सांगतों. " मधुकर म्हणाला, " मी आंत येत होतों. यायचा रस्ताच आहे तो. माझं नांव कानीं आलं—तशींच नाजूक विशेषणं लावून माझं नांव उच्चारलेलं कानीं आलं म्हणून मी थांबलों. काल इथं आलेल्या एका भाडेकरूसमोर माझ्याबद्दल अशी कांहीं चर्चा चालली असेल अशी माझी कल्पना नव्हती. यांना माझ्याबद्दल असं कां वाटतं तें कळावं म्हणून मी थांबलों—बऱ्याच गोष्टी कानीं आल्या—साऱ्यांचा राग माझ्यावरच आहे हें दिसून आलं म्हणूनच तुमचा निरोप घ्यायला आलों. मुद्दाम मी ऐकायला गेलों नव्हतों. मनुष्य स्वभावाविरुद्ध मी कांहीं केलं नाहीं. आपल्याबद्दल कुणी कांहीं वाईटसाईट बोलतंय असं ऐकल्यावर तें शेवटपर्यंत ऐकायची कुणाला जिज्ञासा व्हायची नाहीं ? या तिघांचं भाषण मी ऐकत राहिलों—आड राहून ऐकलं तें कांहीं मी नाकबूल करीत नाहीं पण तेवढ्यासाठीं यांनीं माझ्यावर लाथ उगारावी आणि आपल्या तारिणीबाईनीं माझ्या थोबाडींत भडकावावी हें मात्र मला मोठं विलक्षण वाटलं. "

" नुसतं ऐकण्यासाठीं नव्हे, " आतां मस्तक शांत झालेली चंपा म्हणाली, " तीं बक्षिसं मिळालीं तीं तुझ्या उद्गारांबद्दल. मी नुसती बोलूनच राहिलें हें भाग्य समज—"

" काय केलंस हें ? " शारदाबाई चंपेला म्हणाली, " तुमचं कांहीं बिनसलं होतं तर सुध्या बोलानं सारं कांहीं करतां आलं असतं—"

" मुळींच नाहीं." चंपा म्हणाली, " या माणसाचे ते उद्गार तूं ऐकले नाहींस म्हणून असं म्हणतेयस. काय झालंय तें तुला मी मग सविस्तर सांगेन—" असें म्हणून चंपा निघून गेली. त्यावेळेपुरतें तिनें मस्तक शांत ठेवलें होतें खरें, पण यापुढें त्याच्या तोंडचे कोणत्याही प्रकारचे शब्द ऐकूं आले असते तर तिला राग आवरतां आला नसता असें वाटल्यामुळें ती निघून गेली.

" जाऊं दे ! " शारदाबाई मधुकरला उद्देशून म्हणाली, " भरल्या घरांत असं हें व्हायचंच. कांहीं मनावर घेऊं नकोस तें. मी ' जा ' असं म्हटलं नाहीं तोंपर्यंत जायची कांहीं जरुरी नाहीं. मला तुझी जरुरी आहे. यांना कांहीं वाटत असलं तरी मला तसं वाटत नाहीं तोंपर्यंत तुला जायला नको कांहीं ! आजचा दिवस जा वाटेल तर—उठलेलं वादळ तितक्यांत निवळून जाईल—माथीं सर्वांचींच भडकली आहेत. यावेळीं कुणाचीच समजावणी करणं कांहीं बरं नव्हे. काय झालंय त्याची एकदां मी विचारपूस करतें. आतां कांहीं बोलूं नकोस. उद्यां ये याच वेळीं. "

अगदीं नाटकी थाटांत ' जशी आज्ञा ' असें म्हणून मधुकर निघून गेला.

त्या दिवशीं शारदाबाईनें त्या बाबतींत कुणाशीं कांहींच चर्चा केली नाहीं. कितीतरी वेळ ती नुसती विचार करीत बसली होती. त्या दिवशीं इतर कुणी मंडळी येणार नव्हती. मनाला कांहींच विरंगुळा नव्हता म्हणूनच ती विचार करीत बसली होती. पूर्वींच्या साऱ्या इतिहासाचा आढावा घेतांना तिचें मन कासावीस होऊं लागलें होतें.

तारिणीच्या जन्मापासूनची सारी हकिकत तिला आठवली. तारिणी कशी कशी वाढत गेली, कसा अभ्यास करूं लागली, कशी परीक्षा पास झाली, आतां एक विशेष दर्जा आल्यामुळें तिच्या वृत्तींत कसा बदल झाला, याचा ती आढावा घेऊं लागली. तारिणीच्या वृत्तींत बदल झाला तो दर्जामुळें कीं वयामुळें, याचें निश्चित निदान तिला ठरवतां येईना. आपल्या परिस्थितीवरून तारिणीच्या बुद्धीच्या परिणतीची अटकळ करणें योग्य झालें नसतें हें तिला कळत होतें. आतां तिचें लग्नाचें वय झालें होतें—किंबहुना लग्नाचें वय उलटून गेलें होतें. पूर्वींच्या काळांत एवढ्या मुलींना तीनतीन मुलें झालेलीं होतीं. तो काळ बदलला असला तरी माणसाचा स्वभाव, माणसाची वृत्ति, माणसाच्या भावना कांहीं अगदींच बदलत नाहींत. परिस्थितीशीं मिळतें घेण्यासाठीं मानवी भावनांविरुद्ध झगडून आजच्या पिढींतल्या मुली आपल्या जीवनावर सक्तीनें अत्याचार तर करीत नाहींत ना, असा प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला.

त्या प्रश्नाचें उत्तर नव्या पिढीकडून मिळायला पाहिजे होतें. पुढल्या काळावर नजर ठेवून, पुढल्या काळाला अनुरूप अशी वृत्ति तयार करण्याची आजच्या पिढीची जी जाणीव होती, तिच्याशीं जुन्या पिढीला समरस होतां येत नाहीं याची तिला कल्पना होती. दृष्टि पुरोगामी असली, वृत्ति पुरोगामी

असली, तरी जुन्या काळांत वावरलेल्या जीवाला तरुणांच्या भावनेचें यथातथ्य आकलन करतां येतें कीं नाहीं, याचा निश्चित उलगडा तिला करतां येईना. कुठें तरी रस्शीखेंच होते आहे, त्या ओढाताणींत दोन पिढ्या दोन दिशांना झुकता-हेत—जुन्या पिढीची दृष्टि कितीही पुरोगामी असली तरी नव्या पिढीच्या दृष्टीनें जुनी माणसें प्रतिगामी ठरताहेत कीं काय, असेंही क्षणभर तिला वाटूं लागलें.

सक्ति तिला आवडत नसे. तारिणीला तिनें पूर्ण स्वातंत्र्य दिलें होतें. आपल्या विशिष्ट विचारांचा पगडा तिच्या मनावर बसलाच पाहिजे असा आग्रह तिनें धरला नव्हता. तारिणीची मनोवृत्ति कोणत्या दिशेनें झुकते आहे याचें निरीक्षण करीत ती राहिली नव्हती. तें काम तिनें अगदीं नकळत चंपेवर सोंपवलें होतें—म्हणजे चंपेनें आपणहून ती जबाबदारी पत्करल्यामुळें त्या बाबतींत ती उदासीन राहिली होती. एक क्षणभरच तिला वाटलें, ही आपली चूक झाली का?

दुसऱ्या दिवशीं चंपेनें सारी हकिकत तिला सांगितली. मधुकरला हटकण्यांत चंपेचें कुठेंतरी चुकलें असें तिला वाटत होतें तरीही ती म्हणाली, "झालं हें कांहीं बरं झालं नाहीं. मधुकरमुळं माझे व्यवहार अडून राहतील असं कांहीं नाहीं. पूर्वी सारे व्यवहार तूंच पहात होतीस—तो पत्कर मधुकरनं घेतल्यामुळं तुझ्यावरचा तेवढाच बोजा कमी झाला होता. मला तेवढंच समाधान वाटत होतं. आज उगीच कांहींतरी क्षुल्लक कारण काढून मधुकरला घालवून देणं मला कांहीं बरं दिसत नाहीं. तूं कांहीं बोलली असलीस तरी चालेल, तूं वडील माणूस आहेस, पण मला वाटतं, तारिणीनं मधुकरची क्षमा मागितली पाहिजे. तिचं वर्तन अगदींच असभ्यपणाचं झालंय. चीड आली असेल कदाचित पण शब्दांनीं काम भागलं असतं तिथं असा अत्याचार तिनं करायला नको होता. या तिच्या भडकपणाचं तुला कौतुक वाटत असेल पण मला हें तिचं वर्तन बेशिस्तीचं वाटतं. शिष्टाचाराच्या बाबतींत नवी पिढी तितकीशी काटेकोर नाहीं हें मी जाणतें. एकदम ताडफाड करून टाकण्याची वृत्ति आजच्या पिढीला स्वाभाविक आहे. पण माझ्या मुलीनं असं कांहीं केलं अन् मी तिला शिक्षा लावली नाहीं, तर माझ्या दृष्टीनं मी गुन्हेगार ठरेन. बायकांनीं बायकासारखंच वागलं पाहिजे—"

"आणि पुरुषांनीं कसं वागावं?" चंपेनें विचारलें, "त्यांनीं माणसासारखं वागूं नये वाटतं? पुरुष असो कीं बायको असो, दोघंही माणसंच आहेत. त्यावेळची त्याची मुद्रा तूं पाहिली असतीस, त्याच्या त्या शब्दांतलं विष तुझ्या

कानाला झोंबलं असतं, तर तूं तारिणीपेक्षांही भडकली असतीस. उपकाराच्या जाणिवेला देखील कांहीं सीमा आहे. ती सीमा ओलांडायची तुझी तयारी नसली तर तूं स्वस्थ बैस. मधुकर इथं राबतो आहे यांत त्याचा डाव आहे असा यापूर्वी मला संशय होता, पण आतां माझी खात्री झाली. आजवर तो स्वस्थ होता, अस्वस्थ व्हायंला कांहीं जागा नव्हती, कांहीं कारण नव्हतं—काशिनाथकडे तो ढुंकून पहात नाहीं, त्याला हिशेबांतही घेत नाहीं, असं तुझ्याप्रमाणें मलासुद्धां वाटत होतं पण काल तो माझा भ्रम दूर झाला. यापुढं घरचं वातावरण शांत ठेवण्याच्या दृष्टीनं तो इथं राहणं केव्हांही बरं होणार नाहीं. तारिणीचा मधुकरबद्दलचा तिटकारा आतां विकोपाला गेला आहे असं निदान मला तरी वाटतं. ती अविचारी नाहीं. तात्कालिक परिणामामुळं भडकून जाऊन तिनं असं कांहीं केलं असं मला वाटत नाहीं. मला वाटतं, मधुकरनं चिडून निघून जावं असाच तिचा उद्देश होता म्हणून बुद्धिपुरस्सर तिनं हा अत्याचार केला. यापुढं जास्त ताणून धरणं बरं नाहीं. आम्ही आतां जाणारीं माणसं आहोंत. हा सारा संसार तिचा आहे—जबाबदारी तिची आहे, आतां यापुढं तिचं तिनंच पाहिलं पाहिजे. या साऱ्या गोष्टी ध्यानीं घेऊन जें कांहीं करायचं तें कर. माझा कसलाच आग्रह नाहीं." असें म्हणून चंपा स्वस्थ राहिली.

शारदाबाई म्हणाली, "हा प्रश्न अचानक माझ्यासमोर आला आहे. यापूर्वी या गोष्टीचा मी फारसा विचार केला नव्हता. एकदां तुझं माझं बोलणं झालं होतं तेवढंच. क्षणभर माझ्या मनांत आलं होतं, कीं असं कांहीं व्हावं. घरजांवई आणण्याइतकी मी श्रीमंत नाहीं. आपण सुखासमाधानानं राहातों आहों एवढंच. त्यांत आणखी एक माणूस येऊन राहिला तर विशेष बोजा वाटायचा नाहीं. आज काशिनाथ रहातोच आहे कीं नाहीं आपल्या इथं ! माझा समज होता, कीं मी सांगितलं असतं तर कदाचित् तारिणी या संबंधाला कबूल झाली असती. तरीही मी त्याबद्दल साशंक होतें. कदाचित तसं सांगणं सुद्धां माझ्याकडून झालं नसतं. सांगायचं असतं तर मी सांगितलं असतं तुलाच ! पण तें तुझंमाझं भाषण झालं तेव्हांपासून माझा बेत बदलला. कांहींच करायचं नाहीं या बाबतींत, असं ठरवून मी स्वस्थ बसलें. मला वाटतं तीच माझी चूक झाली. आतां एकदां तारिणीलाच विचारून पहातें. मधुकरचा प्रश्न आतां राहिलाच नाहीं—पण तिच्या मनांत काय आहे याचा तरी अंदाज घेऊंदे मला."

चंपेनें तारिणीला शारदाबाईकडे पाठवून दिलें त्यावेळीं तिनें सरळ सरळ तो प्रश्न तिला विचारला. ती म्हणाली, " असं पहा तारिणी, या कालच्या प्रकरणामुळं आजवर न विचारलेली एक गोष्ट तुला विचारणं मला भाग पडलंय. मधुकरचं आणि तुझं लग्न व्हावं असं केव्हां केव्हां माझ्या मनांत येत असे. त्यावेळीं तरी त्यांत कांहीं व्यंग नव्हतं. कालच्या प्रकारानंतर आतां या गोष्टीचा पुनः विचार करावा असं मला वाटूं लागलंय. मधुकर काल जायला निघाला होता त्याला मी ठेवून घेतलंय. माझ्या कामासाठीं त्याची जरुरी आहे. आज तो जें काम करतोय, जेवढा व्याप त्यानं वाढवलाय, तो आवरायला चंपेला कठीण जाईल. तुझ्याकडून हीं कामं उरकायची मला तरी खात्री नाहीं. कालच्या तुझ्या वागण्यावरून आम्हांला वाटूं लागलंय, कीं मधुकर यापुढं इथं आलेला तुला खपायचं नाहीं. खरं ना हें ?"

" अगदीं बरोबर !" तारिणी म्हणाली, " यापुढं त्यानं या घरांत पाऊल सुद्धां टाकूं नये असं मला वाटतं.—त्याचं अन् माझं लग्न व्हावं असं तुला वाटलं तरी कसं आई ?"

" कां वाटूं नये ?" शारदाबाई म्हणाली, " जगाच्या दृष्टीनं तुमची जोडी जुळण्यांत कुठं व्यंग नव्हतं. तुझ्याइतक्याच परीक्षा दिल्यायत त्यानं—"

" काय आहे परीक्षेजवळ ?" तारिणी उद्गारली, " काशिनाथ मॅट्रिकसुद्धां झालेला नाहीं पण त्याची योग्यता आहे का मधुकरला ?"

" काय कमी आहे मधुकरांत ?" शारदाबाईनें म्हटलें, " बाहेरच्या व्यवहाराच्या दृष्टीनं आज मधुकरला जो मान आहे तो कितीही सुंदर पुस्तकं लिहिलीं तरी कांहीं काशिनाथला मिळायचा नाहीं. उद्यां कुठं नोकरीचा अर्ज करायचा असला तर मधुकरला कुणीही सहज पत्करील, तेंच काशिनाथला आज एकाद्या शिपायाइतक्या पगारावर कॉलेजांतली कारकुनी करावी लागतेय ना ?"

" असं तूं तरी म्हणूं नयेस आई—" तारिणी म्हणाली, " नोकरीच्या दर्जावरून काय माणसाचा दर्जा ठरवायचा ? आजचीं जोडपीं जशीं जुळतात तशी माझी जोडी नको आहे जुळायला. आधीं वृत्ति जुळली पाहिजे—म्हणजे दोघांच्या वृत्ती एकाच प्रकारच्या पाहिजेत असं नाहीं माझं म्हणणं—भिन्न वृत्तीचीं दोघं असलीं तरीही एकमेकांबरोबर एकमेकांना मिळतं घेतां येईल असा कांहीं तरी दुवा तिथं पाहिजेय. सुलतानी गाजवणारा नवरा मला नकोय तसा लॅपडॉगही नकोय, असं मी परवांच सांगितलं तेंच तुला पुनः

सांगतेंय. मला जो जोडीदार मिळेल त्याला माझ्याशीं जोडीनं समांतर रेषेंत राहातां आलं पाहिजे.— मग तो अगदीं अशिक्षित असला तरी देखील त्याचं मला कांहीं वाटायचं नाहीं."

" तसा कुणी आढळलाय का तुला ?" शारदाबाईनें विचारलें.

" एवढी घाई कसली आलीय ?" तारिणी हंसून म्हणाली, " केव्हां एकदां मी घरांतून निघून जाईन असं का वाटूं लागलंय तुला ?"

" काय म्हणतेस हें तारू ?" शारदाबाई गहिंवरून म्हणाली, " माझा हट्ट मला चालवतां आला असता तर तूं लग्नच करूं नयेस असं मी म्हटलं असतं. पण चंपा म्हणते कीं तुझी कांहीं तशी तयारी नाहीं. लग्नच करायचं तर उगीच दिवसगत कां लावायची ? मुलीचं वय वाढतं तसतसा समवयस्क नवरा तिला मिळायचा संभव कमी. जोडपं समवयस्क असावं असं माझं ठाम मत आहे. पुरुषांना आपली बायको आपल्यापेक्षां लहान वयाची हवी असते, आपल्यापेक्षां कमी योग्यतेची हवी असते, ती तिच्यावर अनिर्बंध सत्ता गाजवतां यावी म्हणून. म्हणूनच मला तें आवडत नाहीं. एकमेकांनीं एकमेकांवर सत्ता गाजवावी एवढं सामर्थ्य असल्याशिवाय जोडीच जुळवूं नये."

" अगदीं हेंच आहे माझं मत." तारिणी म्हणाली, " अगदीं अशी घाईला येऊं नकोस तूं. यापूर्वीं या बाबतींत मी उदासीन होतें पण आतां मी या गोष्टीचा विचार मन लावून करूं लागलेंय. तुझ्या साऱ्या इच्छा पुऱ्या होऊन माझं लग्न माझ्याही आवडीप्रमाणं होईल असं वाटूं लागलंय मला—"

" कुणी आढळलाय का असा ?" शारदाबाईनें उत्सुकतेनें विचारलें.

" तें आजच सांगतां यायचं नाहीं—" तारिणी म्हणाली, " पण नाहीं असंही मी म्हणत नाहीं. यापेक्षां सध्यां मला कांहीं विचारूं नकोस. माझ्यावर विश्वास आहे ना तुझा ? झालं तर ! तुम्हां दोघींनाही समाधान वाटेल असंच घडायचा योग दिसतोय. पण एवढं कर आई, मधुकर इथं आहे तोंवर या घरचं वातावरण शुद्ध राहायचं नाहीं. माईला त्रास पडला तरी पत्करेल पण त्याला आतां निरोप दे."

या पेंचातून कसें पार पडावें या चिंतेंत शारदाबाई होती. पण अगदीं अचानकपणें तें संकट टळलें.

मधुकरचें पत्र आलें. ' यापुढें आपण तिकडे येणार नाहीं ' असें त्यानें कळवलें होतें. केलेल्या व्यवहाराचा सर्व तपशील देऊन एक भली मोठी

जंत्री त्यानें त्या पत्रासोबत पाठवली होती. अपुरे राहिलेले व्यवहार पुरे कसे करावे याचाही खुलासा त्यांत केला होता.

झालें तें बरें झालें असें शारदाबाईला वाटलें. अप्रिय गोष्ट नाइलाजानें करण्याचा प्रसंग टळला. तरीपण तिला एकंदरींत बरें वाटलें नाहीं. मधुकरसारखा कामसू माणूस हातचा गेल्यामुळें तिला वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. त्याची उणिव भरून येण्याइतका दुसरा कुणी मिळेल असें तिला वाटत नव्हतें.

मधुकर यायचा बंद झाल्यापासून बैठकीची रंगत जमेनाशी झाली. एक-दोन वेळ तिनें काशिनाथला बोलावलें, तो येऊन बसलाही, पण स्वस्थ बसून इतरांची चर्चा ऐकण्यापलीकडे त्यानें कांहींच केलें नाहीं. तें पाहून शारदाबाई त्याला म्हणाली, " तूं कांहींच भाग घेत नाहींस यांत काशिनाथ ? तोंडसुद्धां कां उघडीत नाहींस ? "

" मला तें जमत नाहीं. " काशिनाथ ओशाळून म्हणाला, " माझी भूमिका टीकाकाराची नाहीं—दोषैकदृष्टीची नाहीं. कसलंही पुस्तक असलं तरी त्यांत जेवढं कांहीं चांगलं असेल तेवढंच माझ्या नजरेंत भरतं. दोष मला दिसतात, नाहीं असं नाहीं, पण त्या दोषांची वाच्यता करणं मला आवडत नाहीं. माझा तो स्वभावच नाहीं. "

" असं कसं म्हणतोस ? " शारदाबाई म्हणाली, " गुणदोषांची छाननी केल्याशिवाय नवं साहित्य निर्माण करणं धोक्याचं आहे असं नाहीं का तुला वाटत ? "

" माझी दृष्टीच वेगळी आहे. " काशिनाथ म्हणाला, " इतर लेखकांशीं मला तुलना करून पहायचं नाहीं. मी माझ्यापुरतं पहातों. माझी चढाओढ आहे ती माझ्याशींच. मी जें कांहीं एका पुस्तकांत लिहिलंय त्यापेक्षां माझ्या दुसऱ्या पुस्तकांत मला जास्त कांहीं लिहितां आलं पाहिजे, जास्त निर्दोष लिहितां आलं पाहिजे—निदान पूर्वी लिहिलं त्यापेक्षां कांहीं वेगळं लिहितां आलं कीं माझं समाधान होईल. माझे दोष मला कळतात म्हणूनच माझ्या नजरेला आलेले ते माझे दोष मला टाळतां आले कीं झालं. दुसऱ्यानं दाखवलेले दोष मला पटत नाहींत. क्षमा करा—हें माझं धाष्टर्य आहे असं वाटेल तुम्हांला पण माझा आत्मविश्वास थोडासा जबर आहे. अगदीं मन मोकळं करून बोलायचं, म्हणजे मला जें पटतं त्याला कुणी विरोध केला तर त्याची मी खिजगणती बाळगणार नाहीं. दुसऱ्याच्या

टीकेला अनुसरून स्वतःच्या लेखनांत सुधारणा करण्याची वृत्ति मला पटत नाहीं. ती वृत्ति चुकीची असेल पण माझं हें असंच चालायचं. सर्वसामान्य लेखकाचे सिद्धान्त मला पटत नाहींत. सवतासुभा आहे माझा. मला वाटेल तेंच मी लिहिणार. कुणाच्या टीकेला हार जायचा नाहीं ! "—आपल्या भाषणांत फाजील अभिमान दिसून आला याची जाणीव होऊन तो म्हणाला, "—मला क्षमा करा. मी असं बोलायला नको होतं. आजवरच्या भेकड-पणाच्या पार्यीच मी असा दुराग्रही बनलोंय. तो भेकडपणा राखण्यासाठींच मला दुराग्रही बनावं लागलं होतं. तो माझा जन्मजात स्वभाव होता. त्याच्या-वर भेकडपणाचं आवरण पडलं होतं. तें आवरण निघालं तेव्हां मी काय आहें तें मला अचूक कळलं. माझी ओळख मला पटली. ही सारी तुम्हा सर्वांची कृपा आहे. त्या कृपेच्या जोरावरच माझं ब्रीद न सोडण्याइतकं सामर्थ्य आतां माझ्याठायीं प्राप्त झालंय ! "

त्याचा तो बळकट आत्मविश्वास पाहून शारदाबाईचें हृदय भरून आलें. उत्तेजनपर कांहींतरी बोलावें असें एकदां तिला वाटलें होतें पण ते औप-चारिक वाटेल असा संशय येऊन ती म्हणाली, " ठीक आहे ! तुझ्या मतावर सक्ति करायची माझी इच्छा नाहीं. मी ज्या परिस्थितींत लेखनकार्य सुरू केलं त्या परिस्थितींत मला लोकानुवर्ति व्हावं लागत होतं. तो काळ आतां बदललाय. आमच्या पिढींतल्या लेखकांनीं जे धक्के खाल्लेयत त्यामुळं तुम्हां नव्या लेखकांना बळकटी येणार आहे. क्षेत्र वाढलं, व्याप वाढला, विषय वाढले आणि त्याबरोबरच अवलोकनाची व्याप्ति अफाट झाली. त्या अफाट प्रदेशाला कवटाळायचं सामर्थ्य आतां आमच्यांत राहिलं नाहीं. म्हणूनच वाटतं, कीं तूं म्हणतोस तें बरोबर आहे. तसंच चालूं दे. वाटलं तर बैस या बैठकींत, नाहींतर बसूं नकोस. माझा कसलाच आग्रह नाहीं. "

त्या दिवसापासून काशिनाथ त्या बैठकींत बसायचा बंद झाला.

बैठका सुरू होत्या. चर्चा सुरू होती. नवीं नवीं पुस्तकें रोज रोज येत होतीं. शारदाबाईची वाङ्मयनिर्मितिसुद्धां झपाट्यानें सुरू होती—सर्वत्र गडबड उठून राहिली होती. जो तो आपापल्या कामांत चूर होता.

काम नव्हतें काय तें चंपेला ! तरीपण अलीकडे मधुकरचें काम करावें लागत असल्यामुळें तिला तेवढाच विरंगुळा होता.

---

# २१ मिलाफ

विश्वविद्यालयाच्या इतिहासांत डी. लिट्‌ची पदवी घेणारी पहिली स्त्री या नात्यानें तारिणीचा चोंहीकडून गौरव होऊं लागला. सर्वांआधीं कॉलेजनें तिचा गौरव केला, मुंबई मराठी साहित्य संघानें गौरव केला, निष्क्रिय ठरलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेनें सुद्धां गौरव केला. इतर किरकोळ गौरव झाले होते ते पुष्कळच.

या गौरवामुळें अभिमानानें फुलून जाण्याच्या ऐवजीं तारिणी कंटाळून गेली होती. या साऱ्या औपचारिकतेची तिला शिसारी येत होती. आज गौरवामागून गौरव झाले, उद्यां सारं कांहीं विसरलं जाईल, कांहीं तरी नवा प्रसंग येईल, नवी व्यक्ति नवी कमाई करील अन् मग त्या व्यक्तीचा गौरव सुरू होईल, त्यावेळीं कुणाला आपली आठवण सुद्धां होणार नाहीं, असें वाटून ती या साऱ्या गौरवांकडे उपेक्षेच्या नजरेनें पहात होती.

एकाच व्यक्तीनें तिचें अभिनंदन केलें नाहीं. गोपीनाथ येऊन गेला, शरयू येऊन गेली, मधुकरचें सुद्धां पत्र आल्यावांचून राहिलें नाहीं पण काशिनाथच्या तोंडून अभिनंदनाचा एक शब्दसुद्धां निघाला नाहीं. ती बी. ए. झाली त्यावेळीं गोपीनाथनें असेंच केलें होतें. तसेंच का हें, असा विचार क्षणभर तिच्या मनांत आला. त्या विचारानें तिला भंडावून सोडलें. एकदां या गोष्टीचें निराकरण करून घेतल्याशिवाय मनाचें समाधान होणार नाहीं असें वाटून तिनें काशिनाथला तसें विचारलें—गोपीनाथचा उल्लेख करून विचारलें. त्यावेळीं तो म्हणाला, " तुझ्या आईनीं केलं का तुझं अभिनंदन ?—मग मी कशाला करूं ? अभिनंदन करण्याइतका परकीपणा आतां राहिला नाहीं माझ्याठायीं. अन् अभिनंदन तरी कसलं .करायचं ? हें तुझं थीसीस वाचून ज्यानीं तुला ही पदवी दिली तीं माणसं कोण आहेत तें मला माहीत आहे. तुझं थीसीस वाचायची सुद्धां त्यांची लायकी नाहीं. असल्या माणसांनीं दिलेल्या पदवीबद्दल कसलं अभिनंदन करायचं ?—" त्या माणसांबद्दल वाटत असणारा तिटकारा त्याच्या प्रत्येक शब्दांत मूर्तिमंत दिसून येत होता.

त्या उत्तरानें तारिणीचें समाधान झालें.

पदवीधरांवर काशिनाथचा रोष असे. पदवी मिळतांच ते कर्तृत्वशून्य होऊन बसतात, अभ्यासूवृत्ति विसरतात, असा त्याचा दावा होता त्याची तिला आठवण झाली. ती म्हणाली, "ही एवढी मोठी पदवी मिळालीय म्हणून मी माझी अभ्यासूवृत्ति सोडीन असं मात्र समजूं नकोस. मी माझ्या आईची मुलगी आहें. तुझं उदाहरण माझ्या डोळ्यांसमोर आहे—" क्षणभर थांबून ती म्हणाली, "—तुझ्या उदाहरणामुळंच माझी अभ्यास करण्याची वृत्ति बळावलीय. आम्ही सारींच माणसं अभ्यासू आहोंत. पदवी मिळाली म्हणून माझा अभ्यास सुटेल असं मुळींच समजूं नकोस. पदव्या मिळवण्याच्या वेडापायीं मी ही मोठ्यांतली मोठी पदवी मिळवली--मनांत आणलं तर एका सामान्य मुलीला काय करतां येतं याची प्रचीति जगाला दाखवून दिली—एवढंच!"

"त्या गोष्टीचा मात्र अभिमान वाटतो मला." काशिनाथ म्हणाला, "तुला जें करतां आलं तें अनुकूलता असती तर मलासुद्धां करतां आलं असतं असा विश्वास आला मला."

"तें खरं आहे." तारिणी म्हणाली, "पण मी अनुभवानं सांगतें, कीं त्यांत कांहीं अर्थ नाहीं. परीक्षा देणं ही एक कला आहे. ती कला ज्याला साध्य झाली आहे तो वाटेल ती परीक्षा देऊं शकेल. आज मला हा प्रश्न पडला आहे, मी डी. लिट् झालें, कदाचित् मला याच आमच्या कॉलेजांत उद्यां प्रोफेसर नेमतील—पण पुढं काय! एम्. ए. झालेलाही प्रोफेसर होतो, पी. एच. डी. झालेलाही प्रोफेसर होतो, डी. लिट्. झालेलाही प्रोफेसर होतो—एवढंच काय, पण परिक्षेसाठीं ज्यांनीं जो विषय घेतला नाहीं त्या विषयाचा प्रोफेसर म्हणून आज बी. ए. सुद्धां नेमले जातात—मग कशाला हा एवढा उरस्फोड केला मी डी. लिट् व्हायचा? आज मी पाहतेंय–प्रत्यक्ष मला दिसून येतंय, कीं तुझ्या व्यासंगाशीं मी पासंगालाही लागणार नाहीं. पण उद्यां तुला कुणी कारकून होण्यापलीकडे युनिव्हर्सिटीच्या वरच्या क्षेत्रांत पाऊलसुद्धां टाकूं देणार नाहींत. उद्यां तुझं पुस्तक एम्. ए. च्या परिक्षेला लागेल, तें शिकवण्यासाठीं या प्रत्येकाला त्याचा अभ्यास करावा लागेल, पण तूं प्रत्यक्ष समोर आलास म्हणजे नॉनमॅट्रिक म्हणून तुला खर्डेघाश्या कारकुनांच्या जागींच बसवतील. तें पाहूनच मला तिटकारा आला अन् म्हणूनच मी एक गंमत केली—" असें म्हणून ती हुरळल्याप्रमाणें हसूं लागली.

"काय केलंस!" काशिनाथ बावरून तिच्याकडे पहात म्हणाला.

" तें असं झालं." तारिणीनें सांगायला सुरवात केली. " काल प्रिन्सिपॉल-साहेबांनीं मला बोलावलं. प्रोफेसरशिप देण्याचा प्रश्न काढला. तशी आज जागा खालीं नाहीं खरी पण मुद्दाम माझ्यासाठीं अशी जागा अस्तित्वांत आणायला कमिटी तयार आहे असं सांगितलं त्यांनीं. त्यांना वाटलं होतं कीं मी एकदम खूष होईन. मी खूष झालेंच—पण त्याचं कारण मात्र निराळं होतं. हीच संधि पाहिजे होती मला. पहिल्यानं मी गेलें त्यावेळीं नुसती फर्स्टक्लास एम्. ए. होतें. त्यावेळीं नुसती लेक्चररशिप देतांनासुद्धां किती जिवावर आलं त्यांच्या! मला मराठीच्या प्रोफेसरची जागा हवी होती. फ्रेंच घेऊन बी. ए. झालेल्या माणसाला मराठीचा प्रोफेसर नेमतात. तें मात्र या कमिटीला पटतं.—आतां मी डी. लिट् झालें, तेव्हां त्यांनीं मला प्रोफेसरची जागा देऊं केली. पण ती इंग्रजीच्या प्रोफेसरची—मराठीच्या नव्हे, याचीच मला मोठी गंमत वाटली. मग मी काय केलं असं वाटतं तुला?—"

तो कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " असलेल्या लेक्चरर-शिपचा सुद्धां राजीनामा देऊन निघून आलें. शिसारी आली मला या असल्या ढोंगांची!"

काशिनाथ स्तब्ध बसून राहिला होता. कोणत्याही प्रकारचा परिणाम आपल्या मनावर झाल्याचें त्यानें दिसूं दिलें नाहीं. तें पाहून तारिणीनें विचारलें, " कांहीं बोलत नाहींस?"

" काय बोलायचं?" काशिनाथ म्हणाला, " या पूर्वींच हें व्हायला पाहिजे होतं. तूं लेक्चरर म्हणून राहिलीस हेंच मला पटत नव्हतं—छान झालं!—" तारिणीच्या नजरेकडे कांहीं वेळ टक लावून पहात तो म्हणाला, " आतां काय करणार आहेस? लेखनाला सुरवात करणार आहेस?"

" काय करणार आहें मी!" एकाद्या आजीबाईचा आव आणून तारिणी म्हणाली, " मोठी समस्या आलीय ही माझ्यापुढं. डी. लिट्. झाल्यावर माणसानं काय करायचं! तुला विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तूं मॅट्रिकसुद्धां झालेला नाहींस. कोणती गोष्ट केल्यामुळं कोणत्या पदवीधराचा दर्जा कोणत्या-प्रकारें बिघडतो किंवा वाढतो, हें कळायला जगाच्या दृष्टीनं तूं पात्र नाहींस. आईची तीच स्थिती! चंपामाईलाही विचारण्यांत अर्थ नाहीं. विचारण्या-जोगे दोघे होते, पण तेही आतां दुरावले आहेत. तेव्हां म्हटलं स्वतःलाच विचारावं, स्वतःच मनाशीं ठरवावं, नोकरी सोडून तर आलेंच आहें—आतां

वेळ भरपूर मिळेल, वाचायलाही भरपूर मिळेल अन् लिहायचं म्हटलं तर लिहायलाही भरपूर मिळेल. पण तेवढ्यानं समाधान व्हायचं नाहीं माझं. बाकीचे-सुद्धां लिहिताहेत. मग त्यांच्यांत अन् डी. लिट्. झालेली जी मी, तिच्यांत काय फरक ? कांहींतरी संशोधन करायचं, पण हें असलं वाङ्मयीन संशोधन करून मी आणखी काय मिळवणार ? शास्त्रीय विषय असता तर गोष्ट निराळी होती. एकदां माझ्या मनांत आलं होतं, कीं पुनः मागं जाऊन सायन्सचा कोर्स घ्यावा—पण ती आवड नाहीं मला. आवड नसलेला विषय घेतल्यामुळं कधीं न घेतलेलं अपेशाचं माप पदरांत यायचं. त्या सर्व गोष्टींचा विचार करून मी ठरवलं—काय ठरवलं असेल असं तुला वाटतं ? "

गंभीर होऊन काशिनाथ म्हणाला, " कुणाच्याही मनोवृत्तीचा मला अचुक अंदाज काढतां येतो असं शाबीत करायची मला आवड नाहीं. कुणाचं मार्गदर्शन करण्याचीही मला पात्रता नाहीं. मग मी कसं देऊं तुझ्या प्रश्नाचं उत्तर ? "

" ऐक तर—" तारिणी म्हणाली, " सायन्सचा कोर्स घेण्यासाठीं मागं जायचा विचार ज्यावेळीं मनांत आला, तो यशस्वी होणार नाहीं असं ज्यावेळीं वाटलं, त्यावेळीं त्याहीपेक्षां मागं जायचं मी ठरवलं. म्हटलं, अगदीं अज्ञानाच्या कालांत जावं—त्या कालांत जाऊन पाहिलं त्यावेळीं एकच मार्ग पुढं दिसला—अन् ठरवलं—आतां यापुढं एकच उद्योग—लग्न करायचं अन् संसार थाटा-यचा. कुणाची तरी पेजेची आणि शेजेची सोबतीण होऊन सुखानं कालक्रमण करायचं. मधूनमधून वेळ मिळाला—मला वाटतं या नोकरींत भरपूर वेळ मिळतो—तर कांहींतरी लिहायचं. तेवढीच मदत होईल संसाराला—कसं ? "

काशिनाथनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तारिणी थट्टेनें बोलते आहे कीं खरोखरच तसें तिनें ठरवलें आहे याचा अंदाज त्याला झाला नाहीं. तो म्हणाला, " मी सांगितलं ना तुला, कीं कुणालाही मार्गदर्शन करण्याची माझी पात्रता नाहीं. सुविद्य आणि सज्ञान माणसाला कुणी उपदेश करूं नये. इतकंच नव्हे, तर त्याच्या वर्तनावर माझ्यासारख्या माणसानं बरंवाईट मतही देऊं नये. ज्याच्या त्याच्या वागणुकीबद्दल जो तो जबाबदार असतो. ती जबाबदारी ओळखून त्यानं वागावं—"

तारिणी हंसून म्हणाली, " मग हा माझा निश्चय बेजबाबदारपणाचा वाटतो का तुला ? "

" तें मला सांगतां येणार नाहीं." काशिनाथ म्हणाला, " आयुष्यांतला एवढा महत्त्वाचा काल परीक्षा देण्यासाठीं घालवल्यानंतर कुणाही व्यक्तीनं शेजघरांत आणि पेजघरांत कोंडून पडणं योग्य आहे कीं अयोग्य आहे याचं उत्तर विचार केल्याशिवाय मला देतां यायचं नाहीं. लग्न केल्यानं कांहीं बिघडत नाहीं. आज दिसून येतंय तें असं—पदवीधर तरुणींबरोबर लग्न करणारे तरुण, लग्नापूर्वीं ती नोकर असली तर लग्न झाल्याबरोबर तिला नोकरी सोडायला सांगतात. आर्थिकदृष्ट्या आपली बायको स्वतंत्र व्हावी हें सुशिक्षित नवऱ्यांना सुद्धां पटत नाहीं. त्यांना ती आपल्या मुठींत पाहिजे असते. वेणीसाठीं दोन आणे पाहिजे असले तर ती सुद्धां आपल्यापाशीं याचना केली पाहिजे इतकी ती परावलंबी राहावी, असं त्यांना वाटत असतं. अशीं शेंकडों उदाहरणं मी पाहिलीं आहेत. म्हणून म्हणतों, कीं लग्न करायचं असलं तर खुशाल कर पण परावलंबी राहूं नकोस. नवरा म्हणजे कुणी परका नाहीं हें खरं, पण स्वातंत्र्याचा प्रश्न आला कीं हा जिव्हाळ्याचा जीवसुद्धां कसा 'ब्रिटीश सरकार' बनतो तें मी पाहिलंय—" बोलतां बोलतां त्याला आपल्या जुन्या वृत्तीची आठवण झाली आणि भानावर आल्यासारखें करून तो म्हणाला, "—छे: छे: चुकलोंच मी ? कुणाला उपदेश करायचा नाहीं असं म्हटलं तरीसुद्धां जें बोलूं नये असं वाटत होतं तें बोलून गेलों !—" असें म्हणून तो पुन: स्तब्ध राहिला.

त्याची ती वृत्ति पाहून तारिणीला मनांतल्या मनांत हसूं आलें. अजून जुन्या परिस्थितीचा पगडा मनावरून न सुटल्यामुळें त्याचा निघडेपणा कुठें ना कुठें तरी अडतो आहे हें पाहून तिला वाईट वाटलें. ती म्हणाली, " आतां हें पुरे झालं. जुन्या व्यसनाप्रमाणें जुन्या वृत्ती सोडणंसुद्धां माणसाला कठीण जातं खरं. पण मी म्हणतें, आतां हें पुरे झालं. आतां बोल ना एकदां मन मोकळं करून."

काशिनाथ अधिकच गंभीर झाला. किती तरी वेळ तो नुसताच तिच्या तोंडाकडे शून्य दृष्टीनें पहात तटस्थ होऊन बसला होता.

कांहीं वेळानें त्याच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडले, " नाहीं !—नकोच ! —मला क्षमा कर तारिणी, हा प्रश्न मला विचारूं नकोस ! "

" कां—? " तारिणीनें अगदीं अंत:करण पिळवटून विचारलें. त्या एकाच अक्षरांत तिच्या अंत:करणांतील वृत्तीचें सारसर्वस्व उतरलें होतें. अधिकारानें प्रश्न करण्याप्रमाणेंच काकुळतीचा केंविलवाणा सूर त्या एका अक्षरांतच सांठवला होता.

एक मोठा सुस्कारा सोडून काशिनाथ म्हणाला, " ऐक!—मी पूर्वी दुबळा होतों—भित्रा होतों—या नव्या वातावरणांत आल्यापासून माझा तो दुबळेपणा गेला पण भित्रेपणा मात्र पूर्णपणें नाहींसा झाला नाहीं. तो जाईल—पण जायला वेळ लागेल. तो भित्रेपणा जाण्याइतका जगाच्या व्यवहाराबद्दलचा माझा आत्मविश्वास अजून बळकट झाला नाहीं. तो बळकट व्हायला माझ्याठायीं जी पूर्णता आली पाहिजे ती अजून आलेली नाहीं. कुठंतरी अपूर्णता आहे माझ्यांत. ती कुठं आहे याचा ठाव घ्यायचा मी प्रयत्न करतोंय. साधारण कल्पना आलीय मला—"

"—कीं प्रकृतीशिवाय पुरुष अपुरा आहे!" तारिणी उद्गारली.

तें ऐकून काशिनाथ अगदीं अस्पष्टपणें आपल्याशींच हंसला आणि लगेच गंभीर होऊन म्हणाला, " तसंही असेल कदाचित. नवी सृष्टी निर्माण करतांना कोण जो विधाता म्हणून आहे म्हणतात त्याला कोणत्या प्रकारचे कष्ट पडत असतील तें कांहीं सांगतां यायचं नाहीं; पण नवी कथा निर्माण करतांना लेखकाला ज्या प्रसूतिवेदना होतात त्या जितक्या दुःखदायक असतात तितक्याच त्या निर्मितीचा कैफ आणणाऱ्या असतात. जीवाला जन्म देणाऱ्या मातांना सुद्धां कदाचित् तसंच वाटत असेल.—त्या दुःखाच्या आणि कैफाच्या भावनेनं जेव्हां मी माझ्याकडे पाहतों तेव्हां त्या विधात्याची मला कींव येते. कसलं हें असलं पात्र घडवलंय त्यानं? पुढं काय होणार आहे त्याचं! कीं असाच तो कथाकादंबऱ्या लिहित मरणार शेवटीं?—हंः! मोठी गंमत आहे नाहीं तारू?"

" आत्तां जागा झालास." तारिणी म्हणाली.

" जागा झालों?" काशिनाथनें विचारलें, " म्हणजे?"

" काय म्हटलंस मला आतां?"

" काय म्हटलं? कांहीं चुकलं कीं काय माझं?—नाहीं—तसं कांहीं मी विशेष म्हटलं नाहीं. खरोखरच मला तसं वाटतं. चुकीची भूमिका निर्माण केल्यामुळं लेखकाला जसा पश्चात्ताप होतो तसा माझ्यासारखा माणूस निर्माण केल्यामुळं विधात्याला पश्चात्ताप होत असला पाहिजे! नाहीं?"

" तो राहूंदे तुझा विधाता!" तारिणी हंसून म्हणाली, " मला तूं 'तारू' म्हटलंस तें आठवतं का तुला?"

चट्कन आठवण होऊन काशिनाथ इतका ओशाळला, कीं त्याच्यानें

तारिणीच्या डोळ्याला डोळासुद्धां देववेना. खालच्या मानेनें तो म्हणाला, "खरंच का मी असं म्हटलं ? माफ कर हं. नकळत बोलून गेलों मी तसं—"

"नकळत नव्हे !" तारिणी त्याच्या हनवटीखालीं हात घालून त्याचा चेहरा न्याहाळीत म्हणाली, "नकळत नव्हे ! अगदीं स्वाभाविकपणें झालं तें. असं असतं हें ! स्वाभाविकपणें जे उद्गार तोंडांतून येतात ते बळेंच दाबून ठेवून माणूस जें बनावट बोलतो त्याला तुम्ही लेखकलोक 'कला' म्हणतां. तसला कलाकार नकोय व्हायला माझा काशिनाथ !"

काशिनाथच्या अंगाला दरदरून घाम सुटला. त्याची जीभ कोरडी पडली होती. नखशिखान्त तो थरथर कांपत होता. ओलावलेल्या नजरेनें जीव डोळ्यांत आणून तो तारिणीकडे पहात राहिला होता.

असल्या प्रसंगांचीं वर्णनें त्यानें आपल्या पुस्तकांत केलीं होतीं. त्याला वाटलें कीं ती आपली सर्वस्वी चूक होती. ही अनुभूति अगदींच वेगळी होती. कुणाच्याही लेखनांत त्यानें ती वाचली नव्हती. कलात्मक लिखाण म्हणून ज्याला म्हणतात तें असेंच असतें का ? त्याला निश्चयपूर्वक वाटलें, अनुभूतिहीन कल्पना अवास्तव असल्याची जाणीव झाल्याशिवाय वास्तव आणि यथार्थ लेखन व्हायचें नाहीं.

ती विशिष्ट प्रकारची जाणीव आणि त्या प्रसंगानें उत्पन्न झालेली भावना या दोहोंच्याही मिलाफानें त्याच्या मनावर आणि देहावर जो परिणाम झाला होता त्याच्या कैफांत त्याचें भान हरपून गेलें होतें.

त्या वेळीं काय झालें तें त्याला कळलें नाहीं.

* * * *

दोघीही आईना यावेळीं कांहींच कळवायचें नाहीं असें त्यानीं ठरवलें. कुणाला नकळत जाऊन त्यांनीं चौदा दिवसांची नोटीस दिली.

काशिनाथ आपल्या परीनें घाबरला होता. वडीलमाणसांच्या मर्जीविरुद्ध किंवा त्यांना नकळत कोणतीही गोष्ट करण्याची त्याला जशी भीति वाटे त्याचप्रमाणें आवडती गोष्ट वडील माणसांच्या नकळतच करीत राहायची त्याची संवय होती. म्हणूनच त्याच्या मामाच्या घरांतल्या माणसांना तो लेखक झाल्याचें अजूनपर्यंत कळलें नव्हतें. त्या वृत्तीला अनुसरूनच आपल्या आयुष्यांतल्या लेखनाप्रमाणेंच अत्यंत जिव्हाळ्याच्या असलेल्या विषयाबद्दल कुणाला कांहींच न कळवण्याचा जो प्रस्ताव तारिणीनें केला त्याला त्यानें संमति दिली.

मुद्दाम वर्तमानपत्रांतल्या लग्नाच्या नोटिसा कोण असें वाचीत होतें ! पण सदोदित तत्परतेनें आपल्या हितसंबंधावर लक्ष ठेवणाऱ्या मधुकरच्या नजरेला ती नोटिस आली. काशिनाथ कॉलेजांतून बाहेर पडण्याच्या वेळेला त्याला रस्त्यांतच गांठून तो म्हणाला, " हा काय अविचार करतोयस त्याची कल्पना आहे का तुला ?"

काशिनाथला आतां आत्मविश्वास आला होता. तो म्हणाला, " कोणतीही गोष्ट मी अविचारानं करीत नसतों !"

" तुला तिचा पूर्वेतिहास आहे का माहित ? " मधुकरनें विचारलें, " ज्या पोरीशीं तूं लग्न करणार आहेस तिनं आपल्या आयुष्यांत कसकसले चाळे केले होते तें माहित आहे का तुला ? "

" हें पहा मधुकर, " काशिनाथ म्हणाला, " तुमचा माझा परिचय नाहीं. तुम्ही मला ओळखत असाल पण मी कांहीं तुम्हांला ओळखत नाहीं. ज्या विशिष्ट परिस्थितींत तुम्ही शारदाबाईचं घर सोडलंत, ती ध्यानांत घेतली म्हणजे यावेळीं तुम्ही तिच्यावर कसलेही आरोप केलेत तरी ते मला खरे वाटायचे नाहींत—"

" पण पुराव्यानिशीं मी पटवून दिलं तर ? " मधुकरनें विचारलें.

" कांहींच उपयोग व्हायचा नाहीं त्याचा—" काशिनाथ म्हणाला, " मरणाऱ्या जिवाची शेवटची घरघर असते तसली ही धडपड आहे तुमची. जें एकदां ठरलंय त्यांत आतां बदल व्हायचा नाहीं. तुम्हीच काय—प्रत्यक्ष तिनं सुद्धां जरी मला कांहीं सांगितलं तरी सुद्धां त्याचा परिणाम व्हायचा नाहीं माझ्या मनावर. येतों—नमस्कार ! " असें म्हणून त्याला सोडून काशिनाथ दुसऱ्या बाजूला वळला.

नुसत्या दृष्टिक्षेपानें माणसाला जाळून टाकतां आलें असतें तर मधुकरनें काशिनाथला त्यावेळीं उभा जाळला असता.

* * * *

चंपेला एका बाजूला घेऊन शरयू म्हणाली, "माझ्या घरच्या माणसांनीं मला अवज्ञाच करायला शिकवलं पहिल्यापासून ! मी तुझी सुद्धां अवज्ञाच करणार. तूं इतकं सांगितलंस—जीव तोडून सांगितलंस—तेवढंच ऐकायचं नव्हतं मला."

" म्हणजे ! केलंस तरी काय तूं ? " चंपेनें घाबरून विचारलें.

" तुला मी सांगितलं होतं तसंच केलं ! " असें बोलतांना शरयू ज्याप्रकारें हंसत होती तें पाहून चंपेच्या अंगावर कांटा उभा राहिला. शरयू पुढें म्हणाली, " पुरुषांचा सूड उगवण्यासाठीं स्त्रीजातीच्या अभिमानानं—नव्हे कलावंतिणींच्या जातीच्या अभिमानानं—मी नवऱ्याच्या जागीं हा कोणता पगारी माणूस नेमलाय तें माहित आहे का तुला ? "

कोरड्या जिभेनें चंपेनें विचारलें, " एवढा अधःपात झाला का गोपीनाथचा ? "

" नाहीं ! " शरयू म्हणाली, " गोपीनाथ दुबळा असला तरी इतका हलकट नाहीं. जगाच्या दृष्टीनं हलकटपणाची परमावधी करणारी ही नोकरी ज्यानं मोठ्या खुषीनं पत्करली—यत्किंचितही आढेवेढे न घेतां पत्करली—त्या माणसाला तूं ओळखतेस—पण तो गोपीनाथ नव्हे. एक महिना झाला या गोष्टीला. गोपीनाथचा ब्लॉक अजून त्याच्या बापानं अंगावर ठेवला होता तो सोडायच्या वेळीं मी घेतला—पोटभाडेकरू म्हणून घेतला—तिथं रहात असतें मी. तेंच घर आईकडे असलं तरी माझं शेजघर हें आहे आतां. पूर्वी आमच्या घरांत आमचे ' शेटी ' रात्रीं येत असत. दिवसा मालकिणी म्हणून मिरवणाऱ्या आमच्या आयामावश्या पायाच्या दासी होऊन त्या ' शेटी 'च्या सेवेला रुजू होत. आतां ' शेट ' मी आहें आणि मधुकर तिथं रात्रीं येतो—"

" मधुकर ! ! " थक्क होऊन चंपा उद्गारली.

" हो ! हो ! मधुकर ! ! " शरयू विकट हास्य करीत म्हणाली, " मी ' शेट ' आहें त्याची '—शेटाणी ' म्हण हवी तर ! अन् तो पायाचा दास आहे माझा. तुला पटायचं नाहीं तें—पण मी माझा हट्ट पुरा केला. आजवर कुणाला तें कळलेलं नाहीं. पुरुष ज्याप्रमाणें चोरटेपणानें हे व्यवहार करतात तसेच मी करतें. कदाचित उद्यां उघडकीलाही येईल. नैसर्गिक रीतीनं नव्हे—तसं कांहीं व्हायचं नाहीं ही खबरदारी घेतलीय मी—माझ्या या अस्वाभाविक दुष्टपणाचा वंश पुढं वाढूं नये याची खबरदारी घेतलीय मी—" तिच्या पायावर डोकें ठेवून ती वर उठली आणि दोन्ही हात तिच्या गळ्याभोंवतीं टाकून ओक्साबोक्शीं रडून म्हणाली, " क्षमा कर. मी महान् अपराधी आहे—[illegible] आहे. [illegible] कांहीं बोलूं नकोस. तूं मला जें विशेषण दिलंस तें माथींच लावून घेतलंय मी. मी माझा हट्ट पुरा केला—माझा हट्ट मी असाच [illegible] ठेवणार [illegible] सूड उगवण्यासाठीं माझ्या जातीला मी हा एक धडा

तर घालून देत नाहीं ना, अशी कल्पना येतेय माझ्या मनांत!—" पुनः एकदां तिनें चंपेच्या पायांवर मस्तक ठेवलें आणि तिच्या प्रत्युत्तराची वाट न पहातां ती आली तशी तडक निघून गेली.

* * * *

शारदाबाई आपल्या बैठकीच्या खोलींत एकटीच बसली होती. तिच्या नव्या पुस्तकांचें लिहिण्याचें काम सुरू होतें. आंत कुणीतरी आलें म्हणून लिहितांना तिनें वर पाहिलें त्यावेळीं काशिनाथ आणि तारिणी येऊन आपल्या पुढें उभीं राहिलीं आहेत असें तिला दिसून आलें.

तिची त्यांची नजरानजर होतांच दोघांनींही एकाच वेळीं तिच्या पायांवर डोकें ठेवून नमस्कार केला. शारदाबाई चकित होऊन नुसती पहात राहिली.

शारदाबाईच्या गळ्याभोंवती हात टाकून तारिणी तिच्या मांडीवर बसली आणि म्हणाली, " पाहिलास ? हा जांवई आणलाय मी तुझ्यासाठीं."

" खरंच ! " शारदाबाई उद्गारली.

काशिनाथ नुसता हंसला त्यावेळीं त्याचा हात धरून ओढून शारदाबाईनें त्याला आपल्याजवळ बसवून घेतलें आणि म्हटलें, " खरंच का रे ?"

जुन्यावृत्तीची आठवण होऊन अगदीं घाबरटपणानें एक क्षणभरच तिच्या डोळ्याला डोळा देऊन पुनः मान खालीं घालून काशिनाथ हंसला.

नुसत्या मानेनेंच त्यानें होकार दिला.

इतक्यांत चंपा आंत आली. तिला पाहतांच शारदाबाईनें विचारलें, " कळलं ना तुला हें ?"

" मीच तर गेलें होतें ना त्यांच्याबरोबर. माझीच सही आहे त्यांच्या सर्टिफिकेटवर पालक म्हणून ! कळलं ?"

दोघांनाही दोन बाजूंनीं जवळ कवटाळून शारदाबाई उद्गारली, " आई-बापांना मुलींच त्रास पडूं न देतां सारींच मुलं जर अशीं लग्न करून येऊन आशीर्वाद मागतील तर केवढा सुखी होईल आमचा संसार !"

